# ।। प्रार्थना ।।

श्री अनंता मधुसूदना । पद्मनाभा नारायणा ।
जगव्यापका जनार्दना । आनंदघना अविनाशा ।
सकळ देवाधिदेवा । कृपाळूवा जी केशवा ।
महानंदा महानुभवा । सदाशिवा सहजरूपा ।
चक्रधरा विश्वंभरा । गरूडध्वजा करूणाकरा ।
सहस्त्रपादा सहस्त्रकरा । क्षीरसागरा शेषशयना ।
कमलनयना कमलापति । कामिनी मोहना मदनमूर्ती ।
भवतारका धरित्या क्षिती । वामनमूर्ती त्रिविक्रमा ।
अगा ये सगुणा निर्गुणा । जगज्जनित्या जगज्जीवना ।
वसुदेव देवकी नंदना । बाळरांगणा बाळकृष्णा ।
तुका आला लोटांगणी । मज ठाव द्यावा जी चरणी ।
हेचि करितसे विनवणी । भवबंधनी सोडवावे ।
नमामि सद्गुरूं शान्तम । सच्चिदानंद विग्रहम् ।
पूर्णब्रह्म परानंदम् । इशम् आलंदी वल्लभम् ।।
ॐ नमो ज्ञानेश्वरा । करूणाकरा दयाळा ।
तुमचा अनुग्रह लाधलो । पावन झालो चराचरी ।
मी कळाकुसरी काहीच नेणे । बोलतो वचने अतिभाविक ।
एका जनार्दनी तुमचा दास । त्याची आस पुरवावी ।।



प. पू. अण्णा घाणेकर कृत

# आत्मचिंतन

(भाग - १)

- संकलन -

सौ. प्रज्ञा गुरुनाथ कुलकर्णी

# – आत्मचिंतन (भाग–१) –

**अक्षर जुळवणी –**
श्री. समीर सदानंद गद्रे / श्री. सागर सदानंद गद्रे.
श्री महालक्ष्मी एंटरप्रायझेस
प्लॉट नं. ३४८, सोसा. नं. २, आर. के. नगर, कंदलगाव रोड,
कोल्हापूर - ४१६०१३. ९४२२०४८९१८.

---

**मुद्रक/फोटो टाईप सेटींग –**
श्री. अशोक डी. चव्हाण.
प्रिंट डेस्क, ६५, प्रभानंद कॉम्प्लेक्स,
टेंबे रोड, सावित्रीबाई फुले दवाखान्याजवळ, कोल्हापूर - ४१६१०२.
© ०२३१-२६४२६४० ९८२२०८७६९६

---

सौ. प्रज्ञा गुरुनाथ कुलकर्णी,
''श्रीराम'' ५६१, जोशी गल्ली, गांवभाग, सांगली - ४१६ ४१६
© ०२३३-२३३२५८०

---

**आवृत्ती –** पहिली
गोकुळ अष्टमी, शके १९३३

---

**स्वागत मूल्य** (खाजगी वितरण) - रू. १००/- (सोबत भजनाची सीडी विनामूल्य)

---

**मुखपृष्ठ –** श्री. अशोक चव्हाण.

---

**ग्रंथ प्राप्तीचे ठिकाण –** १) श्री. सद्‌गुरु ब्रह्मानंद स्वामी समाधी मंदिर, नवबाग, कागवाड, जि. बेळगांव ) © (०८३३९)२६४०९०, ०९३७१९७५५५६
२) मे. भारत होजिअरी, दत्त-मारूती रोड, सांगली - ४१६४१६ ) © (०२३३) २३७२६७२



श्री ज्ञानेश्वर माऊली संजीवन समाधी क्षेत्र आळंदी

# अर्पण पत्रिका

''भरोनि सद्भावाची अंजुळी।

मियां वोंवियाफुलें मोकळीं।

अर्पिलीं अंध्रियुगुलीं। विश्वरूपाच्या।।''

ज्ञा. अ. ११-७०८

ज्यांच्या सहवासाने व पूर्ण कृपाशीर्वादाने,

परब्रह्मस्वरूप श्री पांडुरंगाची असीम

प्रेमभक्ती निर्माण झाली, ज्यांनी

कटाक्षाने आत्मचिंतनास प्रवृत्त केले

त्या वैकुंठवासी

गुरुवर्य

प्राचार्य, शं. वा. तथा सोनूमामा दांडेकर

यांना ही विचार सुमनें

कृतज्ञतापूर्वक समर्पित

- संतचरणरज

अण्णा





श्री स्वामी जगद्गुरु शंकराचार्य पीठ करवीर

'विकृती' १९३२
ज्येष्ठ कृ. ४ बुधवार
दि. ३०/०६/२०११

श्री. अण्णा घाणेकर,

पीठस्थ देवतेचे उत्तम आशीर्वाद व आमचे 'नारायण-स्मरण'

आपले स्फूट चिंतन अल्पांशाने पाहिले, आनंद झाला. आपले हे चिंतन म्हणजे परिपक्व भक्तीचे ज्ञानात झालेले पर्यवसान होय. खरे तर ज्ञानोत्तर भक्तीची अवस्था म्हणजे भगवंताशी सायुज्यता. संतांच्या भाषेत बोलायचे झाले तर **'हेचि भक्ति हेचि ज्ञान । एक विठ्ठलचि जाण'** ।

प्रेममार्ग (भक्ती) जसा नामस्मरणाचा आहे, तसा गुणगानाचाही आहे आणि गुण कळायचे म्हटले की ज्ञान आवश्यक आहेच. संतश्रेष्ठ तुकाराम महाराज म्हणतात, 'ज्याचे रुप नाही ठावे । त्याचे नाम कैसे घ्यावे ।'. याचाच अर्थ ज्याच्यावर प्रेम करायचे त्याचे ज्ञान असावयास हवे. म्हणून म्हणतात, **महात्म्य ज्ञानपूर्वक स्नेहाख्यांत: करण वृत्ति विशेष: भक्ति: ।** शिवाय भक्ति हे शास्त्र आहे. ती कशी करावी हेही ज्ञानच आहे.

चित्तशुद्धीसाठी भक्तीची गरज आहे. शुद्धचित्ताने सत्त्वगुण वाढीस लागतो व **सत्त्वात संजायते ज्ञानम् ।** प्रमाणे ज्ञान होते व ज्ञानाचा परमेश्वरासी अभेद असल्याने आत्मप्राप्ती होते. भक्ती हा शरीरधर्म झालेवर ज्ञानोत्तर भक्ती होते. परिणाम, अहंकार उत्पन्न होत नाही.

विहित आचरणाचा त्याग वा अनादर करून जर भक्ती होत असेल वा केली जात असेल तर ती काय कामाची ? म्हणूनच श्री संत एकनाथ महाराज म्हणतात की, **'स्वधर्माचे आचरण । हीच थोर भक्ति जाण ।'** व स्वधर्माचा खुलासा करताना संतश्रेष्ठ तुकाराम महाराज म्हणतात - **'काही टाण्याटोण्या विप्र शिष्य होती । उघडी फजिती स्वधर्माची ।।'** म्हणून आम्हास म्हणावेसे वाटते की जन्मजात स्वधर्माचे अनुष्ठान जाणून घेऊन त्या बरहुकूम केले तरी आत्यंतिक आनंदाची प्राप्ती होईल. श्री प.प.ब्र. वासुदेवानंद सरस्वती महाराज सप्तशती गुरुचरित्रात म्हणतात - **'तो आजार करूनि तरे ।**

**धर्म एव हतो हन्ति । धर्मो रक्षति रक्षित: ।।'** हे वर्म-मर्म लक्षात ठेवून सर्वांनी सदाचरणी रहावे हीच पीठस्थ देवतेचे चरणी प्रार्थना. पुनश्च एकदा नारायण-स्मरण सर्वांस विदित व्हावे.

महानुशासनम् वरीवर्ति
**श्री. जगद्गुरू शंकराचार्य,**
करवीर पीठ, कोल्हापूर

**स्वामी गोविन्ददेव गिरि**
(आचार्य किशोर व्यास)

।।श्री हरि:।।



**धर्मश्री,** मानसर अपार्टमेंटस
पुणे विद्यापीठ मार्ग, पुणे ४११ ०१६
दूरभाष : (०२०) २५६५२५८९
फॅक्स : (०२०) २५६७२०६९

# आनंदाचे डोही आनंदतरंग !

भगवद्भक्त श्रद्धेय अण्णा घाणेकर यांच्या कीर्तन-प्रवचन प्रवासात भक्तिच्या गंगेतून साकार झालेली १५० चिंतने म्हणजे भक्तीच्या वाटेवरील अमृताचे सिंचन आहे. भक्ताने या सिंचन पर्वणीचा लाभ घेतला तर जीवनाचे नक्कीच सोने होईल इतके अनमोल असे हे धन आहे. भक्ताच्या ठायी शरणागति, व्याकुळता उद्भवल्यानंतर भक्तीची मंदाकिनी कशी उत्स्फूर्तपणे आनंदाची कारंजी उधळू शकते याचा प्रत्यय प्रस्तुतच्या चिंतन वाचनाने सहज येईल इतकी ती समर्थ, रसरसलेली व परिपूर्ण आहेत.

भक्तीच्या मार्गाने जाताना चित्ताच्या शुद्धीसाठी नामजपाचे महत्त्व सर्वमान्य आहे. चित्त शुद्ध झाल्याखेरीज भक्तीचा महिमा पटत नाही, पटणार नाही. अण्णांनी 'चिंतनां'चे वर्गीकरण करताना स्वत:च्या ठायी अवतरलेल्या सहज भक्तीचे अत्यंत उदात्त असे दर्शन तर घडविले आहेच परंतु वाचक त्याच्याशी इतका एकरूप होऊन जातो की, काही काळ या भौतिक विश्वाचे विस्मरणदेखील होऊन जाते. सोप्या, प्रचलित आणि सर्वसामान्यांना अवगत होऊ शकेल अशा शब्दांनी भक्ति माहात्म्य कथन करताना भक्तीचे शास्त्रदेखील स्पष्ट केले आहे. **'नामात इतका आनंद होतो की आनंदच नाम बनते'** हे खऱ्या भक्ताचे लक्षण लेखकाठायी जाणवते.

आपल्या विवेचनाच्या ओघात अण्णांनी गुंफलेली शब्दसुमने भक्तीचा सुगंध अधिकच वृद्धिंगत करतात. जसे - **'आनंदाच्या दोंदावरच जीव रमत राहतो. आनंदच स्वत:चा आनंद उपभोगतो'** (चिंतन १७). **'एक महाशक्ती, अमृतशक्ती, स्वानंदशक्ती आपल्या ज्योतिर्मय ऐश्वर्याने आपल्या अंत:करणाच्या ऊर्ध्व प्रांतात सतत वास करून असते'** (चिंतन ४४). **'आरशात सूर्य नाही येत, तर प्रतिबिंब येते. फक्त प्रतिबिंबाच्या योगानेच आरसा झळाळून उठतो. पण भक्ताच्या सर्वांगात भगवंताचे प्रतिबिंब नाही, तर प्रत्यक्ष भगवंतच येतो'** (चिंतन ७२). **'अमृतभक्तिप्रेमसुख प्राप्त झाले की मनुष्य अंतिम वेदशास्त्रांच्याही पलीकडील असतो. जे परमतत्त्व (म्हणजे भगवंत) अगम्य आहे, अनंत आहे, अबाधित आहे, शाश्वत आहे, निरंजन आहे, ते भावगम्य होते, सुखावते, बोध करते, आनंद वाढतो. या सर्वांमधून भक्तिप्रेमभाव वाढतो'** (चिंतन १२६) इत्यादी अशी असंख्य शब्दकुसुमे संपूर्ण ग्रंथातून विखुरलेली असून एका अननुभूत सारस्वत विश्वाच्या सहज स्पर्शातून भक्तीची ऊर्मी सहज जागृत होते.

संपूर्ण १५० चिंतने वाचताना कुठेही काठिण्य, कंटाळा, शब्दांची ओढाताण, अनावश्यक विस्तार अथवा काल्पनिक रंगावली जाणवत नसून एका भगवद्भक्ताच्या अंतर्यामी उगम पावलेल्या भावभक्तीची गंगा येथे दुथडी भरून वाहताना, उचंबळून येत आहे असा प्रत्यय येतो. याचे श्रेय प. पू. अण्णा घाणेकर यांच्या भक्ति रसामृताला द्यायलाच पाहिजे. अण्णांचे मन:पूर्वक अभिवादन ! इति लेखन सीमा.

चैत्र कृ. ११
श्रीवल्लभाचार्य जयंती
दि. २८/०४/२०११

श्रीज्ञानेश्वरपदाश्रित
स्वामी गोविंददेवगिरि:
(स्वामी गोविन्ददेव गिरि)

॥ ॐ ॥

## ज्यांच्या आत्मचिंतनावर हा पूर्ण ग्रंथ आधारित आहे त्या प. पू. आनंद रामचंद्र तथा आण्णा घाणेकर यांचा

# – अल्प परिचय –

'शुद्ध बीजापोटी । फळे रसाळ गोमटी ॥' या जगद्‌गुरू तुकाराम महाराजांच्या उक्तीप्रमाणे प. पू. आण्णांचा जन्म जमखंडी (कर्नाटक) येथे श्रावण व!!८ गोकुळअष्टमी शके १८५३ (दि. ४ सप्टें. १९३१) रोजी कुलवान, शीलसंपन्न, शिक्षकी पेशाद्वारे ज्ञानदानात तत्पर अशा सत्पुरूषाच्या पोटी झाला. प्राथमिक शिक्षण जमखंडी येथे व नंतरचे तत्वज्ञानातील उच्चतम (एम. ए.) पदवीपर्यंतचे शिक्षण पुणे येथे झाले.

वैदिक धर्माच्या व्याख्येनुसार; व्रतबंध होताच 'द्विजत्व' प्राप्त झाले. त्याचवेळी वारकरी पंथाचे अध्वर्यु, ज्ञानीभक्त वै. शं. वा. दांडेकर यांचा अनुग्रह व पुढे सलग तीस वर्षे त्यांचा निकटचा सहवास लाभला. त्या उपदेशाने व वातावरणाने प्रभावीत होऊन आजन्म ब्रह्मचर्यव्रत स्विकारले व निभावले.

''स्वाध्याय'' ही एक परमार्थातील दैवी संपत्ती व अध्यात्ममार्गातील महत्वाची पायरी लगेच चढावयास सुरूवात केली. प्रदीर्घ कालपर्यंत उपनिषदें, षड्‌दर्शने, ब्रह्मसूत्रे, शांकरभाष्य, गीता, भागवत्, ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा, नाथ भागवत्, स्वामी रामदासांचे ग्रंथ इ. अनेकानेक ग्रंथांचे सखोल अध्ययन, चिंतन केले. याला सत्संग व सत्श्रवणाची अभूतपूर्व अशी जोड दिली. सुजलाम्, सुफलाम् होण्यासाठी भूमी तत्पर झाली.

''अंतरीचे धावे स्वभावें बाहेरी'' या उक्तीनुसार कीर्तने, प्रवचने, भागवतकथा, ग्रंथांची पारायणे, पंढरीची आषाढी-कार्तिकी वारी या माध्यमातून ''लोकसंग्रह'' सुरू झाला (आषाढी-कार्तिकी वारी सलग ५८ वर्षे हा एक विक्रमच! हा ''विक्रम'' अजूनही चालू आहेच.)

मध्यंतरीच्या काळात ''वृत्ती'' सांभाळण्यासाठी सुमारे १६ वर्षे नोकरी केली. पण तिचा ''प्रवृत्ती''च्या वाटचालीत अडथळा येऊ लागल्याने नोकरीला कायमचा रामराम ठोकला.

भगवान श्रीकृष्ण श्रीमद्भागवत ग्रंथाद्वारे उद्धवाला उपदेश करतात की, नामस्मरण व सत्संग याद्वारे माझी जशी लवकर प्राप्ती होते तशी अन्य कोणत्याही साधनानीं होत नाही. (स्कं. ११-अ, ११ व १२) हाच धागा पकडून प. पू. आण्णांनी तरूणपणीच ध्यास घेतला. त्याचे फलित म्हणून गुरूदेव रानडे, वै. ह.भ.प. सानोपंत दांडेकर, वै. ह.भ.प. धुंडामहाराज देगलूरकर, योगीराज वामराव गुळवणी, स्वामी स्वरूपानंद, नानामहाराज तराणेकर, काकासाहेब तुळपुळे, दादा महाराज देशपांडे, म्हादबा पाटील, अण्णासाहेब कुलकर्णी,

काकासाहेब कारखानीस, प्रा. न. ग. दामले इ. अनेकानेक सत्पुरूषांचा सहवास, मार्गदर्शन त्यांना लाभले. आध्यात्मिक उन्नती हे गोड फळ त्यांना मिळालेच!

१९७० साली त्यांना परदेश-वारीचा योग आला. लंडन व केंब्रीज येथे ३/३ महिने भारतीय तत्वज्ञानावर अभ्यासपूर्ण प्रवचने केली.

व्यासपीठावर मिळालेल्या ऐच्छिक दक्षिणेतून वेद पाठशाळा, वारकरी शिक्षण संस्था आळंदी, देवस्थाने, तीर्थस्थळे, हुषार परंतु गरीब शिक्षणार्थी विद्यार्थी यांना सढळ हाताने मदत करीत आहेत.

एवढे मोठे व्यक्तिमत्व असल्यावर पुरस्कार, सत्कार यांनी पाठ सोडली असती तरच नवल! शंकराचार्यांचे करवीर पीठ, कांची पीठ, सुर्णवल्ली पीठ अशा अनेक नामवंत धार्मिक संस्थांनी त्यांना गौरविले. पण प. पू. आण्णांचा स्थायीभावच असा आहे की, प्रसिद्धी माध्यमांपासून (विशेषत: टी. व्ही.) ते दूर राहणेच पसंत करतात. माऊलीची शिकवणच पहा ना -

**पूज्यता डोळा न देखावी । स्वकीर्ती कानी नायकावी ।**
**हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोकां ।।**

ज्ञाने. अ. १३-१८८

**जीवन हेतू –** शेवटच्या श्वासापर्यंत बिदागी न ठरवता प्रवचन, किर्तन, भजन या माध्यमातून आत्मविद्येचे प्रबोधन करण्याचा निश्चय आहे. उरलेला सर्व वेळ जास्तीत जास्त नामस्मरणात.

***

# चिंतकाचे हृद्गत...!

**पूर्वजन्मी सुकृते थोर केली । ती मज आणि फळासि आली ।।१ ।।**
**परमानंद आजी मानसी । भेटी झाली या संतांसी ।।२ ।।**

श्रीगुरु ज्ञानेश्वरमहाराजांच्या अमृतवाणीचा प्रत्यक्ष अनुभव म्हणजे, उपनयनाच्या पवित्र पर्व काळी वै.ह.भ.प. प्राचार्य शं. वा. तथा मामा दांडेकरांसारख्या बंदा रुपाया संताची श्रीसद्गुरुची भेट. वय त्यावेळी आठ.

सद्गुरुकृपाप्रसाद आशीर्वादाने 'सबीज नाम' मिळाले. वारकऱ्यांचा उघडा मंत्र **''रामकृष्ण हरि''**. नामस्मरणाची साधना. नामानीच नामाची, सगुण साकार, सावळ्या सुंदर श्रीपांडुरंगाची स्वरूपत: ओळख झाली. नामस्मरणानी ती सतत वाढतच गेली. नामरुपाचा मेळ बसू-जमू लागला. श्रीगुरुंच्या अगाध कृपावर्षावाने आपल्यात चैतन्य रुपाने वास करणाऱ्या आत्मारामाची आणि विश्वात भरून असलेल्या पण व्याप्य-व्यापक-निरपेक्ष परमात्म्याची अभेदता अंगी बाणली.

श्रीगुरूसामर्थ्य, पारमार्थिक वैभव अगम्य. नामस्मरणाबरोबर गुरूवर्यांनी आत्मचिंतनाची वाट दाखवली. चिंतन सुरू झाले. चिंतनावर, अभ्यासावर त्यांचा फार कटाक्ष. प्रथम कंटाळा यावयाचा !! पण **''भागलिया मज वाहतील कडिये''** या तुकोबारायांच्या वचनाचे खरेपण श्रीगुरूंच्या प्रत्यक्ष जीवनातून अनुभवता आले. **''चालविसी हाती धरोनिया''** श्री पांडुरंगानी व श्री गुरूंनी हाताशी धरून चालवले. अशा दोन बाजूस दोन चैतन्य प्रकाशात वाटचाल सोपी झाली.

**''यतो वाचो निवर्तंते, अप्राप्य मनसा सह''**, स्थूल तर सोडाच, परंतु सूक्ष्मातीत अशा अगोचर ''परतत्त्वाचे चिंतन,'' आणि या चिंतनातून, ज्ञानोबारायांच्या कृपाप्रसादाने अंत:करणात 'शब्द' आकारास यावयास लागले. साधनेमुळे ब्राह्ममुहूर्तावर ३.४५ ला जागच येते. सुंदर ''शब्द-प्रमेय, सिध्दांत'' डोळ्यासमोर ओळी धरायचे. खूप खूप आनंद व्हायचा. मग काय झाले !

आतून उर्मि दाटून येऊ लागल्या, अरे लिही, लिही लिहून काढ ! लिहू लागलो. भगवंताची कृपा, पण हे कांही ''वाचून टाकण्यातले नाही'' याची पूर्ण जाणीव. मग हे अक्षरधन कोणाहाती द्यावे? हो, नाहीतर रद्दीत जावयाचे. मग एक उपाय सुचला. आपल्या मानस भगिनी चि. सौ. उषाताई म्हसवडे, पुणे आणि मानस कन्या चि. सौ. प्रज्ञा कुलकर्णी, सांगली यांना पत्ररूपाने पाठवावे. दर सोमवारी एक चिंतन पाठवू लागलो. चहूंकडे इंगळच असलेल्या, जड लौकिक प्रपंचात ते नाही जतन झाले तर?? काय? देवाच्या प्रसादाने आलेली ही अक्षरे थोडीच विरणार? नाहीच नाही. ही पत्रे प्रकाशीत करण्याचा ज्यांनी चंगच बांधला ते माझे परमस्नेही ''श्री. बापू भिडे'' कोल्हापूर आणि गुरूप्रसाद म्हणून लाभलेली मानस कन्या चि. सौ. प्रज्ञा गुरूनाथ कुलकर्णी, सांगली यांनी कंबरच कसली.

मानसकन्या मोठी उदार, मोकळ्या मनाची मुलगी, **''कमळकलिका धालेपणे । हृदयीच्या मकरंदाते राखो नेणे । दे राया रंका पारणे । अमोदाचे ।।''** (ज्ञानेश्वरी) जवळ

असलेली प्रबोधन - चिंतनपर पत्रे नुसती कपाटात पडून काय उपयोग ? **''सेवितो हा रस, वाटितो आणिका''** हे श्रीतुकारामबाबांचे वचन यांनी प्रत्यक्ष ग्रंथ पुस्तकरूपाने, व्यावहारीक सत्तेने आकारास आणण्याचे ठरवले.

आण्णा ह्या सगळ्यात अगदीच मागासलेला, कागद, छपाई, पुस्तक बांधणी, छापखाना, ह्याचा काहीच परिचय नाही. हे तर झालंच. प्रकाशक, प्रकाशन ग्रंथ / पुस्तक विक्री एक ना दोन हजार भानगडी. आणि अहो ह्या सगळ्यास लागणारा ''अर्थ''. चिंतन अर्थपूर्ण असले तरी, वरील सगळ्या खटाटोपास या **अर्थाचा!!!** काहीच उपयोग नाही.

बापू (भिडे), कोल्हापूर यांच्या अथक प्रयत्नाने, उत्साहाने छपाई - पूर्व प्रत तयार झाली. आता पुढे ? अभिप्राय, प्रस्तावना, प्रकाशक, प्रकाशन आणि अर्थ योजना !

पण भगवंताचे कार्य, अण्णाला ''धंदा'' करायची बुद्धी नाही. याची त्या लक्ष्मीनाथास खात्री. प. पू. विद्यानृसिंह भारती, करवीर पीठ. प. पू. गोविंदगिरीस्वामी (पूर्वाश्रमीचे परमभागवत किशोरजी व्यास) यांनी आपल्या अभिप्रायाने या चिंतन पुस्तकास अलंकृत केले. माझे स्नेही श्री. पं. का. थावरे, कोल्हापूर यांनी रसग्रहण स्वरूप अशी सुंदर प्रस्तावना लिहून खूपच मोठे शब्दांच्या पलीकडे कार्य केले.

आणि अहो काय सांगू तुम्हाला ! श्री. बापू भिड्यांनी या प्रकल्पाविषयी प्रस्ताव, विश्वस्तमंडळी, ब्रह्मानंदमहाराज संस्थान, कागवाड, नवबाग मळा यांच्याकडे मांडला. क्षणार्धात या मंडळींनी देवस्थानतर्फे या देवाच्याच कार्यास भरघोस मदत केली. माझे मानसपुत्र उद्योगपती चि. श्री. शहाजीराव जगदाळे, चि. विजय नावंधर, विश्रामबाग, सांगली यांनी बहुमोलाचा वाटा उचलला.

आतां प्रकाशन, प्रकाशक ? मानसकन्या चि. सौ. प्रज्ञा गुरूनाथ कुलकर्णी, प्रकाशक म्हणून भूमिका कार्य करण्यास तयार झाली. जावई चि. गुरूनाथ सीताराम कुलकर्णी या तिच्या पतिराजांचे व सर्वच कुटूंबियांचे मोठे सहकार्य तिला लाभले. नाहीतर एकट्या आत्मजेने काय काय केले असते ?

या उपरोक्त सर्वांच्याच सहाय्याने, भगवंतकृपेने ही **''अक्षर आत्मचिंतने''** कागदावर मुद्रित होत आहेत. या साऱ्यांचे सहकार्य... त्यांचे वर्णन करण्यास शब्दांचे बळ अपुरेच. त्यांचे आभार मानायचे कां नाही ? हा प्रश्न असून, वादात असल्याने निर्णय झालेला नाही.

ही त्याच्याच कृपाप्रसादाने अंत:करण पटलावर उमटलेली 'आत्मचिंतने' आज ग्रंथ/पुस्तकरूपाने व्यावहारीक स्तरावर प्रकाशित होत आहेत एवढंच म्हणून थांबतो. **''त्वदीयं वस्तू ते तुभ्यं''** वरील सगळ्यांच्याच संमतीने ही अक्षरसेवा त्याच विश्वात्मकाचे चरणी रूजू...

''गोकुळ अष्टमी''

संतचरणरज:कण अलंकृत,

श्रावण वद्य ।।८, शके, १९३३

रविवार, २१ ऑगस्ट, २०११

मुक्काम सांगली

**आनंद रामचंद्र तथा आनंदाण्णा घाणेकर**

**प्रकाशकाचे मनोगत –**

।।श्रीराम।।

**पूर्वजन्मी सुकृते थोर केली । ती मज आजी फळासी आली ।**
**परमानन्दू आजि मानसी । भेटी झाली या संतांसी ।।**

या श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराजांच्या वचनाचा मला जीवनात साक्षात अनुभवच आला.

**मार्गाधारे वर्तावे । विश्व हे मोहरे लावावे ।**
**अलौकिक नोहावे । लोकाप्रती ।। ज्ञाने अ.३/४७१ ओवी**

ज्ञानेश्वरांची वरील ओवी हेच ज्यांचे यथार्थ वर्णन होईल अशा प. पू. अण्णांचा व आमच्या कुटुंबाचा सुमारे आज २५ वर्षे झाली अगदी प्रगाढ स्नेह संबंध आहे. माझे सासरे वै. सीतारामपंत आणि प. पू. अण्णा हे एकमेकांचे परमस्नेही, अगदी ''ये हृदयीचे ते हृदयी घातले'' असे. त्यामुळे प. पू. अण्णा आमच्या कुटुंबातीलच एक नुसते घटक नाहीत तर आम्हा सगळ्यांचे ते आधारवड वृक्षच आहेत. आम्ही सर्वच कुटुंबीय त्यांना सर्वतोपरी मानतो.

काही वेळेस रक्ताच्या नात्यापेक्षासुद्धा हे स्नेहबंध पोत जरी तलम असला तरी त्याची वीण घट्ट असते. प. पू. अण्णांच्या बाबतीत आमचे तसेच आहे. माझे पती हेही त्यांना पित्यासारखेच मानतात. आमच्या कुलकर्णी घराण्याची कुळी ही ब्रह्मचैतन्य गोंदावलेकर महाराजांच्या कुळातली. माझे वडिल प्रख्यात तज्ज्ञ वैद्य होते. सरकारी आरोग्य खात्यात त्यांनी बराच काळ अत्यंत सेवाभावाने, तत्परतेने नोकरी केली. सरकारी नोकरीमुळे बदल्या व्हायच्या. त्यांची जीवननिष्ठा ही रामकृष्ण परमहंस आणि स्वामी विवेकानंद यांचे ठाई पूर्ण निगडित होती. माझ्या आईची त्यांना पूर्ण साथ होती. कासेगांवहून बेळगांवला बदली झाल्यावर नेसत्या वस्त्रानिशी आपल्या घराबाहेर उभा राहून आपला सर्व संसार त्यांनी गोरगरिबांच्याकडून लुटविला.

''**कृष्णा मिळाली कोयनेला**'' असं माझं माहेर आणि सासर. या सगळ्यांच्या उत्तम संस्कारामुळे प. पू. अण्णा काय आहेत हे यथार्थपणे मला कळले आणि त्यांचे ठिकाणी अमाप श्रद्धा, अत्यादराची भावना निर्माण झाली आणि ती कधी, कशी आणि किती दृढ होत गेली याचे माझे मलाच नवल वाटते.

माझे सासरे वै. सीतारामपंत (अण्णा) यांनी देहत्यागापूर्वी काही दिवस अगोदर मला प. पू. अण्णांची मानसकन्या म्हणून त्यांच्या हाती सोपवले आणि प. पू. अण्णांनी हे नाते प्राणापलिकडे सांभाळले आहे अगदी आजतागायत.

आमच्या कुटुंबाशी असा अण्णांचा संपर्क सहवास दृढ झाल्यावर मला त्यांच्यातील शाश्वत जीवनमूल्यांचा खूपच लाभ झाला आणि होतच आहे. परमार्थ मार्गातील माझी वाटचाल पाहून त्यांनी मला ज्ञानेश्वरी, गाथा, दासबोध, नाथभागवत यातील अनेकानेक विषय अगदी जिव्हाळ्याने फारच छान हातोटीने समजाऊन दिले आणि आजही वेळ मिळेल तेव्हा ते मुक्त हस्तानी प्रबोधन करीतच असतात. त्यांच्याकडून मला सबीज नाम मिळाले. मी शास्त्रशाखेची पदवीधर, संस्कृतचा अजिबात गंध नाही पण तरीही अण्णांनी मला भगवद्‌गीता, विष्णुसहस्त्रनाम, पुरुषसूक्त, विष्णुसूक्त, श्रीसूक्त यांची संथा दिली.

कीर्तन, प्रवचन, पारायण, भजन, वारी यामुळे प. पू. अण्णांची परिव्रजा सतत चालूच असते, पण त्या प्रवासातही प. पू. अण्णांनी मला बरीच वर्षे दर सोमवारी एक या प्रमाणे पत्रे पाठवून, त्या पत्राद्वारा अध्यात्मातल्या अनेक विषयावर उत्तम मार्गदर्शन केलेले आहे. या प्रकाशित होणाऱ्या ग्रंथातील प्रत्येक चिंतन हे त्या पत्रातूनच ग्रथीत केलेले आहे. ही चिंतने अभ्यासपूर्ण म्हणण्यापेक्षा त्यांना सातत्याने येणाऱ्या स्वानंदानुभावाचे त्यांनी केलेले अक्षरबद्ध रूपच आहे.

दुकानाच्या व्यवसायाच्या तसेच अफाट मित्रपरिवार आणि अनेक संगीत, शिक्षण, कपडा व्यापार अशा अनेक संस्थांचा पदभार यामुळे माझ्या पतिराजांना प. पू. अण्णांच्या मार्गदर्शनाचा, सहवासाचा, पुरेपूर लाभ घेता येत नसला तरीसुद्धा त्यांच्याच पूर्ण सहकार्यामुळे आम्हा सर्व कुटुंबियांना होत असलेला प. पू. अण्णांचा बहुमोल असा लाभ यांतच त्यांचाही आनंद सामावलेला आहे.

प. पू. अण्णांची सातत्याने शिकवण, त्यांची साथ, संगत आणि या सर्वांचाच परिणाम म्हणजे आमचे बदललेले अंतरंग शांत, आनंदी, समाधानी, सरल मनोवृत्ती हे प. पू. अण्णांच्या शिकवणीचे दृश्य फळ आहे.

प. पू. अण्णांच्या या चिंतनाचा आम्हा सर्व कुटुंबियांना झालेला लाभ आमच्या पुरताच मर्यादित न राहता तो अनेकानेक मुमुक्षु जनांनाही लाभावा याच मोकळ्या हेतूने ही

चिंतने ग्रंथरुपाने प्रसिद्ध होत आहेत. आम्हा सर्वांना त्याचा अत्यानंद होत आहे. या संदर्भात ज्ञानेश्वरीतील दोन ओव्या उद्‌धृत करण्याचा मोह आवरत नाही.

**''तैसे अर्जुनाचेनि व्याजे । गीता प्रकाशूनि श्रीराजे ।**

**संसारायेवढे थोर ओझे । फेडिले जगाचे ।। अ. १८.१४७०''**

**''कैसा विश्वाचिया कृपा । करूनी महानंद सोपा ।**

**अर्जुनव्याजे रुपा । आणिला देवे ।। अ. १८.१६८६''**

व्यक्तिगत स्तरावर मी हा ग्रंथ प्रकाशित करू शकले नसते. परंतु ''श्री सद्‌गुरू ब्रह्मानंद महाराज संस्थान, नवबाग-कागवाड'' यांचे आशीर्वादपूर्वक पाठबळ मिळाल्यामुळे तसेच मा. उद्योगपती श्रीयुत शहाजीराव जगदाळे, सांगली व श्री. विजय नावंधर, सांगली यांचे आर्थिक सहभागामुळे हे कार्य पूर्णत्वाकडे नेण्यास मोलाची मदत झाली. त्यांच्या ऋणात राहणे मला आवडेल.

माझ्या जीवनातील असंख्य आनंदी क्षणातला ही ग्रंथप्रकाशन सेवा हा एक महानंदाचाच क्षण आहे. माझ्यासारख्या या बाबतीत पूर्णतः अनभिज्ञ असलेल्या व्यक्तीकडून हे प्रकाशन होत आहे ही मला वाटणारी अपूर्व धन्यताच आहे.

प. पू. अण्णांच्या परमार्थपथावरील वाटचालीतून आपण काय शिकायचे असेल तर -

**''तयांची आचरती पाऊले । पाऊनि सात्विकी श्रद्धा चाले ।**

**तो तेचि फळ ठेविले । ऐसे लाहे ।। अ. १७, ओ. ८७''**

*****

**सौ. प्रज्ञा गुरुनाथ कुलकर्णी**
**''श्रीराम'' ५६१, जोशी गल्ली,**
**गांवभाग, सांगली – ४१६ ४१६**
**दूरभाष : (०२३३)२३३२५८०**

**प्रस्तावना –**

||ॐ||

## "माझ्या भजनी आस्था"

**माझ्या स्वरूपींच ज्याचे चित्त । अखंड जडले भजनयुक्त ।**
**त्यासीच बोलिजे मद्भक्त । तेचि संतसज्जन ।। ए.भा.**
**आम्ही संत म्हणूं तया । अवघी देवावरी माया ।। तु.म.**
**तेचि संत तेचि संत । ज्यांचा हेत विठ्ठली ।**
**नेणती कांही टाणाटोणा । नामस्मरणावाचूनि ।। निळोबाराय**

वरील संतवचनांवर पूर्ण विश्वास ठेवून ज्यांची पारमार्थिक वाटचाल अखंड चालू आहे त्या भगवद्भक्त प.पू. अण्णा घाणेकर यांना; भगवद्चिंतन चालू असता, कीर्तन-प्रवचन सेवा करीत असता, जे सहजतया स्फुरण पावले, ते म्हणजे ही अनमोल अशी "चिंतने" होत.

**देखै अखंडीत प्रसन्नता । आथी जेथ चित्ता ।**
**तेथ रिगणे नाही समस्ता । संसारदु:खा ।। ज्ञाने.अ.२–३३८**

कोणत्याही भगवद्भक्ताचे पाहताक्षणीच जाणवणारे वैशिष्ट्य म्हणजे तो सदैव प्रसन्नचित्त असतोच शिवाय बोलण्या-वागण्यात, ठायी-ठायीं त्याच्या अंगी नम्रता असते. याखेरीज दैवी-संपत्तीने तो युक्त असतोच असतो.

सदरची चिंतने वाचल्यानंतर, त्यांचे मनन केल्याने लगेच लक्षात येते की, ती भगवद्भक्तीने ओथंबलेली आहेत. त्यांचा पिंड वारकरी संप्रदायातच पोसला, वृद्धींगत झालेला असल्याने तशीच त्यांची साधना झाली. पंढरपूरचा "विठूराया" हेच त्यांचे दैवत, जीवीचा विसावा आहे.

ही चिंतने स्फुरण पावण्याच्या पाठीमागची प.पू. आण्णांची अध्यात्मिक बैठक न्याहाळण्याची अत्यंत आवश्यकता आहे. अशा "महात्म्याचे" माऊलींनी ज्ञानेश्वरीत अत्यंत चपखल असे वर्णन केले आहे ते असे -

**तरी जयाचे चोखटे मानसी । मी होऊनि असे क्षेत्रसंन्यासी ।**
**जया निजेल्याते उपासी । वैराग्य गा ।। ज्ञाने.अ.९–१८८**
**जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता जेऊनि धाले ।**
**जे शांतीसी झाले । पल्लव नवे ।। ज्ञाने.अ.९–१९०**
**ऐसे जे महानुभाव । दैविये प्रकृतीचे दैव ।**
**जे जाणोनियां सर्व । स्वरूप माझें ।। ज्ञाने.अ.९–१९४**

''वैष्णव'' कोणाला म्हणावे याविषयीं चैतन्य महाप्रभूंनी म्हटले आहे कीं, जो विष्णूचे नाव घेतो, तो वैष्णव; जो स्वत:ला विसरून विष्णूचे चिंतन करतो, तो तर वैष्णवच पण ज्याच्या केवळ उपस्थितीतच इतरांना ''विष्णूचे'' नाम घ्यावेसे वाटते, तो ''महावैष्णव!'' प.पू. आण्णा हे या तिसऱ्या कोटीतले होत.

प.पू. आण्णांची पारमार्थिक वाटचाल ही योग्य पद्धतीनेच होत आली व तशीच ती होत राहील. त्यात प्रथमत: श्रवण, नंतर अध्ययन, सत्संग, दास्यभाव, सख्यभाव व शेवटी आत्मनिवेदन व सांप्रतची अत्युत्कट भक्ती म्हणजे प्रेमभक्ती-माधुर्यभक्ती होय. येथेच ते स्थिरावलेले आढळतात. यापैकी कोणत्या पायरीवर असताना सद्‌गुरुभेट, सद्‌गुरुकृपा झाली हे नेमके सांगणे कठीण असले तरी ती पायरी कोणती असावी हे ज्ञानेश्वर माउलींनी नेमके सांगून ठेवले आहे, ते असे -

**ऐसी कर्में साम्यदशा । होय तेथ वीरेशा ।**
**मग श्रीगुरु आपैसा । भेटेचि गा ।। ज्ञाने.अ.१८-९६६**

या ग्रंथात एकूण १५० चिंतनांचा समावेश आहे. काही कीर्तनात, काही प्रवचनात स्फुरलेली तर इतर निवांत वेळी भगवद्-स्मरण चालू असताना स्फुरलेली आढळतात. काही प्रासंगिक, उदा. एकादशी, गुढी पाडवा, माऊली समाधी-दिन, मकर संक्रांत इ. प.पू. आण्णांच्या मनावर संतवाङ्मयाचा ठसा खोलवर उमटला असल्याकारणाने चिंतनांची भाषा ओघवती, प्रासादिक, प्रेमळ, सुबोध, सुलभ अशी प्रसवली आहे. थोडक्यात -

**तैसे साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ ।**
**शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ।। ज्ञानेश्वरी अ.१३-२७०**

अध्यात्मिक विषय लेखणीद्वारे प्रकट करताना शक्यतो एकच विषय मुद्देसूदपणे मांडला जातो. येथे विषय एकच आहे-भगवद्‌भक्तीद्वारे भगवत्प्राप्ती, त्याची साधने, संतांची वचने, अनुभूती व या सर्वांची परीणती अखंड आनंदप्राप्ती, नित्यतृप्ती! ही चिंतने निरनिराळ्या विषयात विखुरलेली असली तरी त्या सर्वांचा अपेक्षित परीणाम होतोच! माऊली म्हणतात -

**नाना गुंफिली कां मोकळी । उणी न होती परिमळी ।**
**वसंतागमींची वाटोळी । मोगरी जैसी ।। ज्ञाने.अ.१८-१७४०**

या पूर्वपीठीकेनंतर काही चिंतनांचा परामर्श घेऊ - चिंतन क्र. १० - ''भक्तीप्रेमाच्या मार्गात आणिक कोणी खपत नाही. फक्त भगवंत आणि भक्त''. कबीर महाराज म्हणतात, ही भक्तीप्रेमाची गल्ली इतकी निरुंद आहे की तेथे दोनपणास जागा/वाव नाही; मग अन्य कुणाची बात तर दूरच!'' येथे कबीर महाराजांच्या खालील दोह्याचा संदर्भ आहे.

**प्रेम गली अति सांकरी । ज्या में दो न समाय ।**
**जब मैं था हरि नहीं । अब हरि है मैं नही ।।**

भगवंत भक्ताचा कोणत्याही दोष स्विकारतो, फक्त भक्ताने केलेला अहंकार त्याला अजिबात खपत नाही. अहंकार हा भक्तीमार्गातील फार मोठा अडथळा आहे. आपण करीत असलेली साधना, दान, पुण्यकर्मे यांचा अजिबात अभिमान धरू नये. माऊली म्हणतात -

**नाना कृषीवळु आपुले । पांघुरवी पेरिले ।**
**तैसे झाकी निपजले । दान पुण्य ।। ज्ञानेश्वरी अ.१३-२०६**

अहंकार जाण्यासाठी नामस्मरण हाच प्रभावी उपाय आहे.

**चिंतन क्र. २० –** ''अनन्यता, निरपेक्षता आणि निर्भयता हा भक्तीप्रेमाचा त्रिकोण होय. या दैवी कृपेला पात्र होण्यासाठी श्रद्धायुक्त श्रवण, विवेकयुक्त मनन, शांत व एकाग्रचित्ताने चिंतन आणि अखंड सत्कारयुक्त नाम यांचा दीर्घकाळ अभ्यास केला पाहिजे.'' यातील भगवंत हाच अनन्य होण्याचा ठावठिकाणा होय. **''अन्याश्रयाणां त्यागो अनन्यता (ना.भ.१०)''** अशी नारदमहर्षींनी अनन्यतेची व्याख्या केली आहे. सर्वबाबतीत भगवंत हा सदैव एकटाच आश्रय आहे अशी धारणा म्हणजे अनन्यता! आपण व्यवहारामध्ये वेगवेगळ्या कारणांसाठी निरनिराळ्या लोकांचा आश्रय घेत असतो. उदा. आजारपणासाठी डॉक्टरांचा, संरक्षणासाठी पोलिसांचा इत्यादी हे सर्व आश्रय मर्यादित व तात्पुरतेच आहेत. भगवंत हाच खरा आश्रय! भगवंतावर केलेल्या भक्ती-प्रेमाच्या मोबदल्यात कशाचीही अपेक्षा न करणे म्हणजेच निरपेक्षता, निष्कामता! ते तर भक्तीचे वर्मच आहे. तिसरी निर्भयता. भगवद्‌भक्त निर्भय होतो, असतो.

**जेथे जातो तेथे तू माझा सांगाती ।**
**चालविशी हाती धरोनिया ।। तुकाराम महाराज**

भगवंत ज्याच्या सदैव पाठीशी आहे, त्याला भय कशाचे ? कुणाचे ?

**चिंतन क्र. ४० –** ''(भगवंताविषयीच्या) भक्तीभावात/रसभावात माधुर्य आहे. या माधुर्यात आनंद आहे आणि हा आनंद शांत/रसाला पोषक आहे.'' भगवंताचे स्वरूप ''रसमय'' आहे. ''रसो वै स:'' असे त्याचे वर्णन केले जाते. भगवान् श्रीकृष्ण वृंदावनात असताना यशोदेने वात्सल्यभावाने, गोप-बालकांनी सख्यभावाने तर गोपींनी माधुर्य-प्रेमभावाने भगवंताच्या रसाचा स्वाद आकंठ घेतला. ते तृप्त झाले. भगवान श्रीकृष्ण पूर्णब्रह्म होतेच! ते द्वारकेत असताना पूर्ण, मथुरेत असताना पूर्णतर आणि गोकुळ-वृंदावनात असताना त्यांचे परब्रह्मस्वरूप ''पूर्णतम'' असे होते. म्हणूनच कृष्णाच्या बाल-भावाचे, बाल-स्वरूपाचे भजन, पूजन करावयाची शिफारस करतात. संत मीराबाईप्रमाणे ! बालके लवकर प्रसन्न होतात ना ! या माधुर्यरसात गोपी अगदी डुंबून गेल्या होत्या. ध्यानी-मनी, बोलताना-चालताना, घरकाम करताना त्यांचे अखंड कृष्णस्मरण चालू असायचे. एकदा सूर्यास्ताचे वेळी एक गोपी यमुनेच्या काठावर एका विशाल शिळेवर ध्यानस्थ बसली होती.

एवढ्यात नारदमुनी तेथे आले. ध्यानस्थ गोपीला बघितले. तिच्या दंडाला धरून हलविले. गोपी भानावर आली. मुनी म्हणाले, ''अगे, तुम्ही तर नेहमी कृष्णस्मरण करता. त्यासाठी (अनुसंधान) तुम्हाला ध्यानाची काय गरज?'' गोपीने त्यांना नमस्कार केला व ती नम्रपणे म्हणाली, ''मुनीवर्य, आपला काहीतरी गैरसमज झालेला दिसतोय! आम्ही कृष्णस्मरण अखंड रहावे म्हणून ध्यान करीत नाही तर त्याचे अधून-मधून तरी ''विस्मरण'' व्हावे म्हणून ध्यान करतो! त्याचे अखंड स्मरण आम्हाला काहीच करू देत नाही.'' उत्तर ऐकून नारदमुनी अवाक् झाले! म्हणूनच भक्तीची व्याख्या सांगून झाल्यानंतर मुनी त्यांचेच उदाहरण देतात. **''यथा व्रजगोपीकानाम् (ना.भ.२१)''** केवळ स्मरणभक्तीने गोपींनी कृष्णप्राप्ती करून घेतली असल्याने **''प्रमाणं तत्र गोपीका:''** असे भागवतकार म्हणतात.

**अपरोक्षानुभूती –** अप्रतीम अशा या ग्रंथातील हे अखेरचे चिंतन आहे. (तसे पाहू गेले असता प.पू. आण्णांची ''चिंतनक्रिया'' अखंड चालू आहेच.) वै. सोनोपंत दांडेकर म्हणत, माझ्या मनात विठ्ठलाशिवाय दुसरा विचार नाही. हे तसेच ! या चिंतनांचा कळस, हिमालयाचे एव्हरेस्ट शिखर म्हणजे ''अपरोक्षानुभूती'' नावाचे अखेरचे चिंतन, सालंकृत पांडुरंग-मूर्तीचे आण्णांना झालेले दर्शन, जागेपणीची अनुभूती, ध्यानावस्थेत येणारी अतिशय उत्कट अनुभूती जणू आलीच. त्याचे बहारदार, भावविवश करणारे वर्णन या चिंतनात पू. आण्णांनी केले आहे. **''सावळे सुंदर रूप मनोहर''** असा पंढरीचा विठोबा प्रत्यक्ष पुढे उभा करणारा त्यांचा चिंतनक्षण आपण जपून ठेवावा असा! ते चिंतन वारंवार वाचावे. भगवंताच्या त्या रूपाचे स्मरण करून आनंदीत व्हावे.

या ग्रंथातील एकूण १५० चिंतनांपैकी काही चिंतनांचाच ''प्रस्तावना-मर्यादा'' लक्षात घेऊन वानगीदाखल ऊहापोह केला आहे.

भगवद्भक्तांना, साधकांना, भक्तीमार्गावर वाटचाल करणाऱ्या पांथस्थांना, वारकरी संप्रदायातील विठ्ठल-भक्तांना ही चिंतने दीपस्तंभासारखी आहेत.

प.पू. आण्णा हे असे परीपूर्ण भगवद्भक्त आहेत. धर्माची **''यतो नि:श्रेयस अभ्युदय सिद्धी: स: धर्म: ।''** अशी व्याख्या व्यासमहर्षींनी केली आहे तर माऊली -

**येथ वडील जे जे करिती । तया नाव धर्मु ठेविती ।**
**तेचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ।। ज्ञानेश्वरी अ.३–१५८**

त्याविषयी असे म्हणतात, **''नामस्मरण हाच धर्म, बाकी सर्व अधर्म''** असे भाऊसाहेब उमदीकर म्हणतात. अनेक भगवद्भक्तांनी धर्माच्या अशा निरनिराळ्या व्याख्या केल्या आहेत. आपापल्यापरीने त्या योग्यच आहात. आता धर्माची नेमकी व्याख्या करताना भागवतामध्ये भगवान् श्रीकृष्ण उद्धवाला म्हणतात -

**धर्मो मद्भक्तिकृत् प्रोक्तो ज्ञानं चैकात्म्यदर्शनम् ।**
**गुणेष्वसङ्गो वैराग्यमैश्वर्यं चाणिमादय: ।। स्कं.११–१९–२७**

उद्धवा! ज्याच्यामुळे माझी भक्ती उत्पन्न होते, तोच धर्म होय. ज्यामुळे ब्रह्म आणि आत्मा यांच्या एकतेचा साक्षात्कार होतो, तेच ज्ञान होय. विषयांपासून अलिप्त राहाणे हेच वैराग्य होय आणि अणिमादी सिद्धी हेच ऐश्वर्य होय.

**ऐक उद्धवा निजवर्म । गुह्य सांगेन मी परम ।**
**माझी भक्ति जे सप्रेम । उत्तम ''धर्म'' तो जाण ।।**

**– एकनाथी भागवत–स्कं.११अ.१०.ओवी३४९**

पू. आण्णांनी असा धर्म या चिंतनांच्या माध्यमातून आपल्याला समजावून सांगितला. तोच आचरणात आणला व ते नित्यतृप्त झाले. सदैव आनंद त्यांच्या चेहऱ्यावरून ओसंडून वहात आहे.

प.पू. आण्णांचे वर्णन माऊलींच्या पुढील ओवीने करून लेखणीस विराम देत आहे.

**तयांची आचार ती पाऊले । पाऊनि सात्त्विकीं श्रद्धा चाले ।**
**तो तेंचि फळ ठेविले । ऐसें लाहे ।। ज्ञानेश्वरी अ.१७–८७**

**।। हरिः ॐ तत्सत् ।।**

*****

**कोल्हापूर**
**तुकाराम बीज शके १९३२**
**दि. २१ मार्च, २०११**

**पं. का. थावरे**
**'सच्चिदानंद', गल्ली क्र. १**
**दत्तनगर, पाचगांव,**
**कोल्हापूर – ४१६०१३**
**फोन – ०२३१–२६३८९७७**

# चिंतन १

आपण स्वत: भगवद्‌भक्तिप्रेमात रमावं आणि आपल्याबरोबर अवघ्या-जणांना त्याच प्रेमरसात डुंबवावं हाच वैष्णवांचा स्थायीभाव. वैष्णव ज्याच्याकडे दृष्टी टाकतात त्याला भक्तिप्रेमरसात चिंब भिजवून टाकतात. या वैष्णवांच्या दारांत साक्षात् ब्रह्मज्ञानही काकुळतीस येते. श्रीहरिसुद्धा मोठ्या कौतुकाने त्यांची वाट पाहात उभा असतो. ‘‘**वाट पाहे उभा भेटीची आवडी।**’’

परमात्म्याच्या ठिकाणी परमावधीचा प्रेमभाव, म्हणजे भक्ती. या प्रेममय भक्तीच्या बळावर आम्ही वैष्णव सुखावतो, आनंदतो. इतरांना पण आनंदाचा रस वाटतो; पाजतो, प्रसंगी त्यातच डुंबवतो.

हा प्रेममार्ग नामस्मरणाचा आहे. भगवंताच्या प्रेमात नाचणं, डुलणं, तल्लीन होणं, एवढाच संतमार्ग आहे. सदाचार, पावित्र्य, सद्‌विचार, सत्संग ह्यांना महत्व आहेच. पण, प्रेममय प्रभूचा प्रेमास्वाद घ्यावयाचा तो नामस्मरणाच्या द्वारा. त्याच्या नामस्मरणाच्या आनंदाने आपला सारा प्रपंच, संसार, व्यवसाय, इतकच नाही तर हा देहपण भरून टाकायचा. ‘‘**कांदा मुळा भाजी । अवघी विठाबाई माझी.**’’ जीवाचा सारा संसारच हरिरूप व्हावा. सारा दैनंदिन व्यवहार भगवत् प्रेमातून, आनंदातून व्हावा.

प्रपंच सोडा, मुलाबाळांचा त्याग करा, देहाला उगाचच कष्टवा, असं संतांच म्हणणच नाही; तर ही सारी सृष्टी कशातून उमलली आहे, हे लक्षात आणा; अस संत सांगतात. इतकच काय पण काम, क्रोध, लोभ आदी दबता दबत नाहीत. एकीकडे दाबले तर दुसरीकडेच उफाळून वर येतात. म्हणून या सर्व विकारांच स्वरूप ओळखाव आणि त्यांना भक्तिप्रेमरसात जिरवून टाकाव.

“**विषय तो त्यांचा झाला नारायण!**” अशी अवस्था जीवास प्राप्त व्हावयास हवी आणि यासाठी भगवत्प्रेम हाच एकमेव उपाय.

ज्याला परमात्म्याच्या प्रेमाचा स्पर्श झाला, ते त्याच्याशी एकरूप होतात. त्या भक्तिप्रेमाच्या रंगात रंगून जातात. भगवंताशी त्यांचा अंगसंग जडलेला असतो. ते परमात्म्याशी अनन्य होण्याच्या आधी भगवंतच त्यांच्याशी कधीच अनन्य झालेला असतो. अशांच प्रेम नि:स्वार्थी असते. हा प्रेमभाव नामस्मरणावर, भजन-कीर्तनाच्या वेलीवर फुलत असतो. फुले जो जो वेचावीत तो तो त्याला जास्तच अतिबहर येत असतो.

जे कष्टी आहेत, दु:खी आहेत, आर्त आहेत अशांच्या डोळ्यातील अश्रू, पुसण्यासाठी वैष्णव तत्पर असतात.

हे भक्तिप्रेम निर्व्याज, निर्हेतुक, निर्लोभ, नि:सीम, निरागस असते. अशा प्रेममय सेवेत '**प्रेम अमृताची धार**' असा अनुभव येतो. या भक्तिप्रेमाच्या अमृताने रसना ओलावली की मग आनंदाचीच सृष्टी सर्वत्र होते. सकल इंद्रियेच ब्रह्मरूप होऊन जातात, मग बापड्या जीवाची काय कथा!

या प्रेमस्वरूप भगवंताची केवढी आवड मनात? कोवळ्या कृपेचा विठ्ठल! त्याला पाहताच जीव सुखरूप होतो. हा पांडुरंग, हा विठ्ठल, हा श्रीहरि, अनुपम्य आहे; मनोहर आहे. भीवरेच्या तीरावर तो भक्तांसाठी उभा आहे.

* * * *




महावैष्णव, संतसम्राट, स्वानंदसाम्राज्यचक्रवर्ती, महाकैवल्यतेजोनिधी, ज्ञानराजांच्या कृपाछत्राखाली त्यांच्याचबरोबर आजपर्यंतची वाटचाल छान झाली. आज आमच्या माहेरी सुखरूप पावलो.

रोज पहाटे माऊलीच्या चरणतीर्थाने दिवसाला प्रारंभ, रोज भजन, प्रवचन सेवा आणि जास्तीत जास्त वेळ नामचिंतन. अगदी आनंदी आनंद.

युगानुयुगे ते परमतत्व एकाकी होते; निराकार होते; अव्यक्त होते; निरंजन, निर्विकल्प होते. त्याला स्वत:ला करमेना. **''एकाकी न रमते''** ते स्वत:शी कसे रमणार? म्हणूनच कोण्या एका क्षणी आपल्याच आवडीसाठी, प्रेमसुखासाठी, स्वसुखासाठी ते अनेक झाले. चराचर सृष्टीच्या रूपाने नटले. एकाच बीजाचा विस्तार झाला. एकाच सुवर्णाचे नाना अलंकार घडले गेले. अव्यक्त व्यक्त झाले. निराकार निर्गुणच, साकार-सगुण झाले. परमात्माच आत्मतत्वाने या जीवसृष्टीत रमला. शिवच जीवरूपाने प्रकटला. अशा अनेक रूपांनी नटण्यातील, प्रसवण्यातील गोडी अवीट. अशा दोनपणाच्या भूमिकेशिवाय स्वानंद नाही, सुखसंवाद नाही; रूसवा-फुगवा नाही; राग नाही; अनुराग नाही. नुसत्या बाईपणात सुख नाही. जन्म दिलेल्या अपत्यामुळे स्त्रीला आई होण्यात अपार सुख आहे आणि या मुलाने रागवावे, रूसावे, हट्ट धरावा यात मातेला सुख आहे. तान्ह्या मुलाने अंगावर पिता पिता जो जो झटे द्यावेत तो तो आईच्या प्रेमामृतास भरतीच येते; ''**तान्ह्याचे लागता झटे। तेणे अधिकचि पान्हा फुटें।**'' अशी ही प्रेमसुखाची ओढ जीव-शीव, आत्मा-परमात्मा यांच्यात सुरू असते. या भक्तीप्रेमाचे ऐश्वर्य, गोडी, दिवसेंदिवस वाढतच असते.

जीवाची शिवाशी गाठ पडली, आत्म्याने परमात्म्याला गाढ मिठी मारली की सोनियाचा दिवस उगवतो. या भेटीचे वर्णन कोणत्या शब्दात कसे करावयाचे? मुक्याने गूळ खाल्ला तर त्याला गोडी कळून सुद्धा ती कशी सांगता येईल? ''**प्रेम न ये सांगता बोलता दाविता । अनुभवे चित्ता चित्त जाणे।**'' हेच खरे ना? आत्मसाक्षात्काराचे वर्णन करतानाच त्याला

जाणत्यांनी ''**सायलेंट एंजॉयमेंट ऑफ गॉड**'' असे म्हटले आहे. तरी आमच्या मायबाप संतांनी, ज्ञानेश्वर माऊलींनी या स्वानंदाचा, आत्मसुखाचा रम्य अविष्कार अनेक प्रकारे केला आहे.

* * * *




हजारात एखादा साधक, लाखात एखादा सिद्ध, बाकी आपण सर्वजण प्रापंचिक व व्यावसायिक. घर-दार, आप्त-स्वकीय, धन-दौलत, प्रपंच यात गुंतलेले. जगाची राहाटी चालायची असेल तर प्रपंच हवाच. प्रवृत्तिधर्माची जोपासना हवीच. परंतु आपल्या या सर्व प्रपंचविस्ताराला भगवंताचे अधिष्ठान हवे असते, याचाच आपणास विसर पडतो. मी सर्व कर्ता, भोक्ता, मी कर्तृत्ववान, मी करीन ते होईल. अशा फाजील अहंकारापोटी सर्व गाडे फसते. आडाखे चुकतात. मग नाना प्रकारचे दुःख. संकट समयी आपणास जाग येते. आपल्याला मग परमेश्वराची आठवण येते, ती अशा प्रकारे आपण आगतिक झालो की. मग धावाधाव सुरू होते.

सार काय, तर या प्रपंचग्रस्तजीवाला देव नको आहे. याला हवे आहे भौतिक सुख. मग त्यासाठी व्रतवैकल्याची यातायात, घोर अनुष्ठाने, जप-तप, उपास-तापास, अभिषेक-पूजा आणि काय-अन्-काय.

आमच्या संतांनी ह्या फापट पोकळ पसाऱ्यात गुंतलेला देवधर्म शुद्ध केला. भक्तिप्रेमाच्या भूमिकेवर उभा केला. संसारग्रस्त जीवास त्यांनी प्रेमभावाचा दिलासा दिला. ''**माझ्या विठोबाचे वर्म आहे दुरी।**'' असे त्यांनी निक्षून सांगितले व हे भगवंताचे वर्म हटकून साध्य होण्याचा एक

सोपा, पण खात्रीचा असा मार्ग सांगितला, तो **नामस्मरणाचा**. हा मार्ग फार पुरातन. भागवतादी पुराणांतून याचा खूपच पुरस्कार केला आहे. नामस्मरणपूर्व प्रेमलक्षणा भक्ती हा नवविधाभक्तीपैकी तिसरा महत्वाचा प्रकार आहे.

या नामस्मरणातून भगवंताचे (षड्गुणैश्वर्यसंपन्न) रूप-गुण आठवून त्याचे प्रेम भोगावे हा तर नामस्मरणाचा मुख्य गाभा. चित्त अथवा मन ज्याचा सतत ध्यास घेते, ज्याच्यावर भक्तीप्रेमाचा वर्षाव करते, त्याच्याशी कालांतराने ते तदाकार होते; अशी तन्मयता, तल्लीनता अनुभवण्यात अपार आनंद आहे. मग आनंद अनुभवत असताना नैराश्य, चिंता, क्लेश, निरूत्साह कोठे आणि कसे राहणार?

नामस्मरण हा भक्तीचा सर्वश्रेष्ठ प्रकार संतमान्य, भगवदमान्य आणि शास्त्रमान्यसुद्धा. या भक्तीत भगवंताची सर्वतोपरी सेवा फार महत्वाची. या सेवेमध्ये परमात्म्याविषयी परमप्रेम अनुस्यूत आहे. ''**अहैतुक्यप्रतिहता ययाऽत्मा सम्प्रसीदति**।'' भक्ती कामनारहित व अखंड असावी, की भक्ताला भगवंताची प्रप्ती होऊन तो आनंदितच नव्हे तर **आनंदच** होतो.

* * * *



# चिंतन ४

काल, कर्माहून स्वतंत्र, अव्यय, अजन्मा असा परब्रह्म परमात्मा, वसुदेवसुत-देवकीनंदन म्हणून प्रगट झाला. त्यावेळी आकाश, पृथ्वी, नद्या या सर्वांना दिव्य कान्ती प्राप्त झाली. मोठमोठी सरोवरे अनेक रंगांच्या कमलांनी शोभू लागली. वनांवनात, झाडाझाडावर पक्षी आणि भ्रमरांचे थवे मनोहर

गुंजारव करू लागले. लता, वृक्ष, फळा-फुलांनी लगडले. स्वर्गीय सुगंधयुक्त वारे वाहू लागले. त्याचा मंद मंद अल्हाददायक स्पर्श मोठा आनंददायक झाला. साधुजनांची मने प्रसन्न झाली. किन्नर, गंधर्व भगवंताचे गुणगान गाऊ लागले. तर सिद्ध, चारण स्तुती करू लागले. विद्याधरांच्या स्त्रिया देवांगनांबरोबर नृत्य करू लागल्या. ऋषी आणि देवता पुष्पांचा वर्षाव करू लागले.

घनान्धकार अशी अर्धरात्र. आकाशात शांतस्वरूप नक्षत्र, तारे, ग्रह यांसह रोहिणी नक्षत्र, अष्टमीचा वृषभराशीचा चंद्र, अष्टमी, श्रावणवद्यपक्ष, वार बुधवार. अशा शुभ समयास, ज्या प्रमाणे पूर्व दिशेस सोळा कलांनी युक्त असा चंद्र उदयास येतो, त्याचप्रमाणे सर्वांच्या बुद्धिमध्ये अंतर्यामीस्वरूपाने निवास करणारा सर्वज्ञ, सर्वशक्तिमान-सर्वव्यापक सर्वेसर्वा भगवंत कृष्णचंद्र म्हणून प्रगट झाला. तो हा आजचा कृष्णाष्टमीचा शुभदिवस.

सोन्याला सुगंध प्राप्त व्हावा, तसा हाच पर्वकाल साधून ज्ञानियांचे राजे, कैवल्याचे पुतळे, संजीवन समाधीचे अनभिषिक्त सम्राट आणि स्वानंदसाम्राज्याचे सार्वभौम असे "**ज्ञानोबा भगवान विष्णू।**" प्रगट झाले आणि महापर्वकालास अतिपर्वकाल प्राप्त झाला.

याच शुभसंधीवर या भगवंताचा एक नगण्य सेवक म्हणून नरदेहात येण्याचे महद्भाग्य या जीवासही लाभले. एक "**सहज पडलं अन् दंडवत घडलं**" असा योगायोग. या अवतारपर्वकालांत अवकाशात असणारे तेजस्वी कण त्यांचा संस्पर्श या जीवाला नक्कीच झाला असणार. त्या तेजस्वी अमृतकणांच्या स्पर्शाने अण्णाच जीवन अमृतस्वरूप झालं. बालवयात वै. प. पू. गुरूवर्य मामांच्या असीम कृपेचा लाभ झाला. भाग्याची गोष्ट. या महात्म्यांना परमात्म्याच्या प्रेमाचा, कृपेचा स्पर्श झालेला असतो. या

भक्तिप्रेमरसामुळे ते भगवंताशी एकरूप झालेले असतात. सातत्याने ते या भक्तिप्रेमात रंगून गेलेले असतात. भगवंताशी त्यांचा अवघ्या अंगांनी अंगसंग जडलेला असतो.

असे महावैष्णव ही माझीच रूपडी आहेत अशी भगवंताचीच ग्वाही. या अण्णाला भगवत्कृपाप्रसादाने अशा अनेक महापुरूषांची संगत लाभली.

परमात्म्याचा साक्षात्कार झाला, जीवास परतत्वाचा स्पर्श झाला, दैवी कृपेचा अनुभव आला की सर्व जग वासुदेवमय भासते. अशी मनाची धारणा होते. याचाच परिणाम होतो कशात? तर जे दु:खी आहेत, कष्टी आहेत, आर्त आहेत, भावाचे भुकेले आहेत, त्यांच्या डोळ्यातील अश्रू पुसण्यात, हे भक्तिप्रेम नि:स्वार्थ असते. ह्या भक्तिप्रेमाचा मळा फुलतो तो नामस्मरणावर. भजन कीर्तन सेवेमधून हा मळा इतका बहरास येतो की मग भगवंतही योगी जनांची ध्यानमुद्रा सोडून या भक्तिप्रेमसुखानेच डवरून जातो.

याच प्ररमप्रेमस्वरूप भक्तीच्या बळावर सुखावतात ते महावैष्णव. मायबाप श्रीगुरू!!! या भक्तिप्रेमरसास्वादाने आनंदतात ते महात्मे!!! आणि आपल्याबरोबर इतरांना पण संतोषाच्या, आनंदाच्या रसात डुंबवतात. त्यांच्या संगतीने भगवंताच्या भक्तिप्रेमाची रूची एकदा का लागली, मग इतर काहीच आवडत नाही. “**तूचि एकला आवडसी**” अशी आत्मनिर्भरता.

हा संतमार्ग प्रेममय नामस्मरणाचा आहे. परमप्रेमास्पद प्रभूचा आस्वाद घ्यावयाचा, तो प्रेममय नामस्मरणाने. मग सारा संसार, सारा देह, मन-बुद्धी, चित्त-अहंकार या भक्तिप्रेमानंदाने भरून जातो.

या जन्मदिवसाच्या निमित्ते हा भगवंताच्या नामपूजेच्या महानैवेद्यातील भगवंतानी उष्टावलेला अक्षरस्वरूप महाप्रसाद (जेवढा हाती लागला तेवढा) देत आहे. मोठ्या भक्तिभावाने तो ग्रहण करावयाचा बरं! या भक्तिप्रेमयुक्त

नामरसाशिवाय अण्णाजवळ दुसरं काय असणार? फक्त नाम-आनंद, नाम आणि आनंद नाही तर नामच आनंद, आनंदच नाम.

* * * *



# चिंतन ५

अतिशय श्रेष्ठ, परमोच्च असा जो विशुद्ध **'भक्तिप्रेमभाव'** की जो पंडिता, वाचका, ज्ञानिया, इतकच काय पण आत्मनिष्ठ जीवनमुक्तांस सुद्धा बहुतांशी कळणं कठिणच, त्याला शब्दांचा स्पर्श बरा नाही.

भक्तीच्या क्षेत्रात या भावाला फार फार मूल्य आहे. याही भावामध्ये **''परमव्याकुळता''** ही तर जणू भक्तीच्या भक्तीप्रेमभावाच्या साम्राज्याची साम्राज्ञीच म्हणावयास हवी.

ही जी व्याकुळता, आर्तता, आतुरता आहे, ओल आहे, ह्या सगळ्या भावना माणसालाच (सहृदय) काय, पण परब्रह्म परमात्म्यासही पाझर फोडतात. तो आधीच दयाळू, मायाळू, कोवळा आहे. त्याला अत्यंत करूणेने अंत:करणापासून साद घातली ना, मग काय पाहिजे? मात्र अशी हाक मारताना ऊर फुटून निघावा लागतो. मग तो अगदी धावत धावत येतो.

ही करूणा आहेना, ती जीवाचे हृदय मृदू बनवते, नवनीतासारखे. या मृदूतेतून भगवंताची जवळीक वाढते. त्याच्याशी एक अत्यंत हळुवार अशी सलगी निर्माण होते. माता, पिता, श्रीगुरू सर्वेसर्वा झाल्यावर मग लडिवाळपणा. आईशी बोलण्यात मग संकोच कोठला, कां आणि कशाचा?

मग अशा या सलगीमुळे भक्तजनवत्सल, प्रेमळजनप्रांजळ अशा

आपल्या आराध्याच्या चित्तात अगदी चटकन् पाझर फुटतो. वरवर कोण हाक मारते, आणि पोटतिडकीने कोण हाका मारते, यातले अंतर मायबापास लगेच कळते; चांगले कळते.

असा हट्ट करणारा, अशी अळी करणारा, भगवंतास, श्रीगुरू मायबापास फार फार आवडतो. "**मायबापापुढे लाडके लेकरू । तैसे बोले करू कवतुके ।। कृपावंता घाली प्रेमपान्हा रस । वोळसी वोरस पांडुरंगा ।।**" अशा करूणावचनांत महावैष्णवांनी विठाईमाऊलीशी जवळीक साधली आहे. माय-लेकरांचे नाते ध्यानात घेऊन मग संतमहात्मे म्हणतात "हे विठाई आपल्या बाळाचं संगोपन करावं, अस आईला कोठे सांगाव लागत का गं? तू जन्म दिलास, आता माझा सांभाळ करण्याची, वाढवण्याची, सर्व हट्ट, लळे पूर्ण करण्याची जबाबदारी माय तुझीच नां?"

घरात गोड-धोड केलं तर आई न मागता प्रथम बाळास देते ना? का बाळाला मागावे लागते? आणि जर मागण्याची पाळी लेकरावर आली तर मग माता कसली? बालक खेळात, उन्हातान्हात, पावसा-पाण्यात गुंतलेले असते, सापडले तर आई त्याला बळेच पकडून आणते आणि खानपान करविते ना?

कधी कधी या मायलेकराच्या कौतुकात लेकरू पण पुढाकार घेते. **बालक बापाचे ताटी रिघे । आणि बापातेचि जेववू लागे ।** मग पित्याला राग येतो का? छे छे!!! त्याला कळत असतं, लेकरू आहे. त्याचा इवलासा तळवा अगदी लहान लहान. कोवळी तांबूस लाल बोटं. त्याच्या येवढ्याशा हातातला प्रेमाचा घास आपल्या मुखात कसा जाणार? मग पिता काय करतो? आपणच वाकून आपले मुख खाली करतो, त्याचा हात आपल्या उजव्या हातात घेऊन त्याच्या हातातला घास त्या कोवळ्या-मृदू हाताच्या बोटासह आपल्या मुखात घेतो.

केवढा आनंद सोहळा आहे ना यात? असं हे मायबाप लेकराचं नातं. वत्सलभाव मोठाच हृद्य. लेकराबिना मायबापाला मायबापपण नाही आणि मायबापाशिवाय लेकराला तर सगळ त्रिभुवन शून्य. लेकराला वाटतं, आई जवळ असावी, तिच्या कुशीत असावं, मायेचा हात अंगावर असावा, मस्तकावर भक्तिप्रेमाची दृष्टी असावी, मला कडे-खांद्यावर घ्यावं, माझी तहान-भूक विचारावी, भागवावी, हातानं भरवावं, मग आपल्या नेसूच्या वस्त्रानं मुख पुसावं. हा वत्सलभाव आहे. माऊलीनं कुरवाळावं, प्रेमामृतदृष्टीनं, वत्सलभावानं न्हावू घालावं ही लेकराची भावना आणि असं लेकराचं-अपत्याचं कौतुक पुरवण्यात मायबापास ब्रह्मांड ठेंगणं.

* * * *




सगुण उपासनेत भगवंताच्या सगुण साजिऱ्या-गोजिऱ्या रूपाला फार महत्वाचे स्थान आहे. **'रूप पाहता लोचनी'** अशी ज्ञानियांच्या राजाची आस आहे. आणि ते पुनःपुनः पाहता **'सुख झाले वो साजणी'** असा त्यांचा अनुभव आहे. त्याला भेटावे, त्यालाच पाहावे, त्याच्याशी गोड गोड बोलावे. "**कृष्णा हाल कारे, कृष्णा डोल कारे । घडिये घडिये गुज बोल कारे ।।**" अशी मनाची फार तगमग असते; आणि भक्तिशास्त्रानुसार ज्या भक्तिप्रेमसुखाची मनाला ओढ असते तेच सुख प्रत्यक्ष अनुभवास येते. ज्याच्यासाठी आपला जीव वेचला तोच आनंदकंद नंदनंदन पुढ्यात येऊन उभा राहतो. "**तव अवचिते सगुणरूप भरलेसे नयनी । बोलता अंगणी म्या वो देखियले ।।**" असा साक्षात्कार उत्कंठित मनास होऊन जातो आणि

असे अवचितपणे ‘‘**प्रियाची परमसीमा**’’ असणाऱ्या श्रीहरीचे दर्शन होताच मन तृप्त-तृप्त होऊन जाते. ‘‘**सावळे सगुण । सकळा जीवांचे जीवन!**’’ पाहताच देहभान हरपते. या सगुण सुंदर, राजस सुकुमार अशा भगवंताच्या दर्शनाची ओळख फक्त नयनापुरती मर्यादित न राहता अवघ्या इंद्रियांना त्याचा अनुभव येतो. अवघीच इंद्रिये तृप्त होतात. या तेज:पुंज मदनाच्या पुतळ्यालाही लाजवणाऱ्या सुंदर ध्यानाचे वर्णन तरी काय करावे? ‘‘**सुंदर सुरेख वोतिले । परब्रह्म तेच फाकले ।।**’’

या प्रभूस्वरूपाची कांती जवसाच्या फुलाच्या गाभ्याप्रमाणे निळसर आहे. त्याच चिंतन करणाऱ्याच्या अंत:करणात हा एखाद्या विशाल सरोवरात उमलणाऱ्या कमळाप्रमाणे प्रगट होतो-उगवतो. मग काय विचारावे?

‘‘**आजि सोनियाचा दिनु । वर्षे अमृताचा घनु !**’’ असा अत्यंत तरल. सूक्ष्म अनुभव येतो. कशाने तर ‘‘**हरि पाहिला रे हरि पाहिला रे ।।**’’ मग दर्शनाने तृप्तताच. संसार सुफळ होतो याच्या चरणकमलदर्शनाने. मग मन तन्मय होते; तदाकार होते; तद्रुप होते. ‘‘**बाप रखुमादेवीविरू**’’ ऐसेच होऊन जाते. कधी ‘‘**अनुपम्य मनोहर । कासे शोभे पीतांबर ।। चरणी ब्रीदाचा तोडर । देखिला देवो ।।**’’ अशा रूपांत तो येतो. तर कधी ‘‘**तु रे कांबळा डांगेवरी । विषाल वेणू घेऊनि करी । वैजयंती रूळे वक्षावरी ।।**’’ अशा लावण्यमनोहर स्वरूपात तो पुढ्यात उभा ठाकतो. हा भगवंत दर्शनाचा आनंद तरी सांगायचा कुणाला ना? ‘‘**आजि आनंदुरे आजि परमानंदु रे ।।**’’ आनंदासच आनंद सांगावयाचा. तो आनंद लाभतो ‘‘**नाम उच्चारिता कंठी । पुढे उभा जगजेठी ।**’’ या एका नामसंकीर्तनाने.

* * * *

# चिंतन ७

महाराष्ट्र प्रदेशात झालेले सारे संत-महात्मे महावैष्णव, प्रामुख्याने पंढरीच्या सावळ्या पांडुरंगाचे उपासक आहेत. भगवान विष्णूच विठुरायाच्या **''सावळा सुकुमार''** जैसा कर्दळी गाभा, अशा लावण्यसंपन्न, सच्चिदानंदघन स्वरूपात चंद्रभागेच्या तीरावर अवतरला आहे. ही विठाई प्रेमस्वरूप आहे. **''विठ्ठलाऽऽ पांडुरंगाऽऽ रे''** म्हणून त्याला फक्त प्रेमाने हाक घालावयाची. तो या हाकेची वाटच पाहात असतो.

अशा या स्नेहाळ, मधाळ विठाबाईमाऊलीचे प्रेम त्याच्या भक्ताच्या रोमा-रोमात भिनलेले असते. वैष्णवांच्या नसानसातून रक्त न वाहता हा भक्तिप्रेमरसच जणू वाहात असतो. हा विठ्ठल जसा भक्तिप्रेमाचा पुतळा तसाच अगदी त्याचा भक्त; तो पण अशा भक्तीप्रेमात मुसावलेला असतो. देवी लक्ष्मीचा, म्हणजेच रूक्मिणीमातेचा हा पती, तिला त्याची जवळीक सहजच अगदी नित्याची. **''परि तेही यया प्रेमाचे न देखेचि सुख!''** अशी प्रौढी आमचे संत अनुभवातून सांगतात. या भक्तिप्रेमाचा कळवळा, जिव्हाळाच वेगळा. या प्रेमभक्तीमध्ये हेतु नाही. या निर्व्याज भक्तीप्रेमभावांत देवघेवीची भाषा सहनच होत नाही.

आपल्या भक्ताला आपल्या मस्तकावरचा मुकुट करावा, त्याची टाच आपल्या हृदयावर धारण करावी, आपला अंत:करणाचा शेला त्याला बसण्यासाठी पसरावा, एवढी लालसा या भगवंताला भक्ताविषयी लागून राहते. हा षोडषोपचारांची पूजा मागत नाही, पंचपक्वान्नाचा नैवेद्य त्याला

लागत नाही. हिऱ्या-मोत्याचे दागिने त्याला भुलवत नाहीत; खुषी देत नाहीत; मग त्याला काय हवे असते? त्याला कशाची भूक आहे? तर एका प्रेमभावाची. भावाचे, एक तुळशीदळ त्याला पुरून उरते. त्याला (प्रेमाने, भावाने, भक्तीने) नुसती हाक मारली की बस्!!! खरे पाहता भक्तांच्या अंत:करणात ही हाक जेथे स्फुरते ना, ते स्फुरणच तो असतो; आणि म्हणूनच जीवाकडून नुसती प्रेमाची हाक ऐकूनच तो सुखावतो.

शुद्ध प्रेमभाव, शुद्ध आनंद, शुद्ध भक्तिरस यांच्या मुशीतून साकार झालेला हा पांडुरंग मायबाप; अतिशय कोमल चित्त याचे " **विठ्ठल कृपेचा कोवळा ।**" भक्तजनांवर याचा भारीच लोभ. मग अशा प्रेमलोभात भक्तांना अपार सुख होणारच नां!!! मग सातत्याने त्याचेच अनुसंधान.

असा प्रभू पाहताच, भेटताच दृष्टी सुखावते. डोळ्यातून प्रेमाश्रूंच्या धारा वाहू लागतात. भक्तिप्रेमभावाचे मोतीच सरसर नेत्रावाटे ओघळतात. या भक्तिप्रेमसुखभावाच्या अनुभूतीची उंची फार मोठी आहे. त्याला आपण साद घालायची फक्त!! कशी? तर "**राम-कृष्ण-हरि!**"

* * * *




मंगल स्नान, सुंदर नवे कपडे, हिऱ्या-मोत्यांचे सुबक घडणीचे सुवर्णालंकार, करंजी, लाडू, अनारसे, चिरोटे यांचा फराळ (चकली, कडबोळे, चिवडा हेच खरे मानकरी) पक्वान्नाचा बेत, आप्तेष्टांच्या गाठी-भेटी. मग त्याच्या जोडीला नवरंगी रांगोळ्या, आकाशदिवे, लक्ष्मी-सरस्वती पूजन, सगळा आनंद, मंगल-प्रसन्न वातावरण.

हे तर सगळे असतेच पण एक वैचारिक पातळीवरचा आनंद असतो. आनंद जेवढा सूक्ष्म तेवढा जास्त.

जीवन तर सगळ्यांनाच मिळतं पण जगता खूप कमी लोकांना येतं.

**"अक्सर औकात यह महसूस किया है मैने।**

**उम्र भर जी के भी जीना नही आया मुझको"**

जीवनालाच नुसत जगणं नका समजू. ज्यांना जगता आलं, त्यांच्या जीवनाचा सुंदर बगीचा झाला. कुणी फुलवला हा बगीचा ? भगवंत माळ्यानं !!!

मग या भगवंताने फुलवलेल्या बागेत भगवंताचे मधुर सूर उमटतात. सूर, ताल, लय यांचा सुंदर मिलाफ. केंद्रबिंदू भगवंत.

त्यासाठी आपण शून्य वेळूची बासरी बनावं. तो वाजवायला आतुर आहे. पण जरा आपण रिकामं व्हावयास हवं, बासरीसारखं. मग ? आनंदाचा महासागरच उसळतो. शांतीचं, समाधानाचं सरोवर. ज्यात हजारो आनंदकमळे उमलताहेत, सुगंध दरवळत आहे. दृष्टी बदलली की सृष्टी बदलते. खिडकीतून पौर्णिमेचा आनंदचंद्र उगवलेला पाहायचा, आपण खिडकीच पाहतो. एवढंच काय प्रसंगी चंद्राचं पूजन न करता खिडकीचीच पूजा करतो.

* * * *



# चिंतन ९

भगवत् कथामृताचे सेवन करावयास मिळाले. तो गोकुलकुलेंद्र पीतांबरधारी प्रभू. त्याच्या कृपाप्रसादाने परमशांती व परमप्रेमस्वरूपभक्ती यांच्या अथांग सागरांत सुस्नात होता आले. त्या नंदनंदन वृंदावनविहारीचा कृपाकटाक्ष लाभला. लीलापुरुषोत्तम योगयोगेश्वर आनंदसम्राट चक्रवर्ती श्रीकृष्णचंद्राच चंद्रामृत या चकोरास वेचता आले. "आनंदी आनंद झाला"

कुणाला सांगावयाचा ना ? !!! मग त्या आनंदातून प्रकट झालेले हे चिंतन.

प्रभु पदकमळी परमप्रेमभाव ही त्याचीच देणगी. त्याच्या प्रकाशाने अंतर्यामी स्वयंज्योतिरुप तारा प्रकाशमान होतो. श्यामसुंदर मेघश्याम असा हा कृपाघन आपल्यावर सतत आनंदामृताचा वर्षाव करत असतो आणि त्याचा परिणाम आपल्या अंतरंगी भक्तिप्रेमभावस्वरुप मनमधुर आणि मुक्तपणे नृत्य करू लागतो. यातूनच या यमुनातीरविहारीचे वात्सल्य अनुभवास येते.

भगवत् चरित्रच एकूण सुखानंद सौभाग्याचा ठेवा. एका भावाच्या एकान्तात त्याचे चिंतन केल्यावर या रत्नाकरातून प्रेमसुखाची रत्ने हाती येतात. ही रत्ने सर्वेंद्रियास शांती व आत्मप्रकाश देणारी आहेत. या प्रकाशाने डोळ्यात उजळा व श्रवणात आल्हाद उत्पन्न होतो. मग हा हृदयरुपी हंस आनंदमानसी पोहतो. त्रिभुवनसुंदर भगवंत नयनी उभा राहतो. त्याचा सुखदस्पर्श सर्व गात्रा-गात्रांना पुलकित करतो. हाच सगुण साक्षात्कार त्याच्या नामसंकीर्तनाने अनुभवास येतो बघ.

आनंदकंद, यशोदानंद-वृंदावनचंद्र भगवान् श्रीकृष्णाच्या दयेने आणि श्रीसद्गुरुमाऊली ज्ञानेश्वर कृपेने ही चार वाक्ये या कागदावर उतरवत आहे.

''**माझे पैलपण जाये। भक्त हे ऐलपण ठाये। अनादि ऐक्य जे आहे। तेचि निवडे।।**'' या वचनानुसार आपल्या अंत:करणातील आनंदोद्गार या शब्दसुमनांत ओतले आहेत. या चार अक्षरांत आपले आत्महृदयच भक्तिभाव गांभीर्याने जमले तसे व्यक्त केले आहे असे म्हटले तरी चालेल !!!

नामाचा आनंदे जयजयकार करून ही भक्तिभावाची श्रीमंती, ऐश्वर्य, मस्तपणा अंगी मुरतो. हा सगुण साक्षात्कार अनुभव आहे. त्यात गुप्त, रहस्य, कोडे असे काहीच नाही.

वृंदावनात यशोदा व गोपी यांच्या नयनाच्या प्रांगणात व तुर्येचे प्रकाशात मनमोहन अशा बाळस्वरुपांत ज्या चैतन्याने ''सगुण चरित्राचा'' चमत्कार करून त्या गोकुळवासियांना दिव्य भक्तिप्रेमाविष्करणाने **''सदेह असून विदेही केले''** व ऐहिक नाते-गोते विसरवयास लावले आणि दिव्य-देवाघरच्या नात्यांच्या अनुभवांवर आरुढ केले, तेच चैतन्य, तोच विश्वात्मक भगवंत **''करतळी आवळे तैसा हरि''** अशा सगुण स्वरुपांत, श्रीपुंडरीककृपेने पांडूरंग/विठ्ठल स्वरूपांत पंढरपुरात विटेवर उभा आहे.

असा गोपीचे नयनांत लपणारा, गोपाळांशी खेळणारा व सर्व संतांच्या जिव्हाग्री नामरुपाने नाचणारा हरी, या दिव्य नामाच्या बळावर आपल्या हृदय मंदिरात साठवावा, दिव्यचक्षूंनी पहावा, चित्ताने अनुभवावा हेच सांगणे आणि दुसरे काय सांगणार ना ?

* * * *



## चिंतन १०

भक्तीप्रेमाच्या मार्गात आणिक कोणी खपत नाही. फक्त ''भगवंत आणि भक्त.'' कबीर महाराज म्हणतात ही भक्तीप्रेमाची गल्ली इतकी निरुंद आहे की तेथे दोनपणास जागा/वाव नाही, मग अन्य कुणाची बात तर दूरच ना !!!

शाश्वत आणि दिव्य आनंद प्राप्तीचा हा जाज्वल्य, जीवंत, निष्ठाप्रधान, कृतिप्रधान, रसरशीत असा हा परमप्रेमलक्षणास्वरूप भक्तिमार्ग. हाच संतांचा भागवत धर्म.

देहधारी असताना विदेहावस्थेची व त्याचबरोबर अहंकारशून्य विदेहावस्थेत, सगुण साक्षात्काराने प्राप्त होणाऱ्या महानंदाचा लाभ करून

देणारा हा मार्ग. हा जो भक्तिप्रेमसुखाचा निजानंद आहे ना, त्यावरून मोक्ष-सुखाची कुरवंडी करून टाकावी असा हा आनंदमार्ग.

या मार्गामध्ये भगवंत आणि भक्त यांनी परस्परांच्या नेत्रांतील तेज, वाणीतील ओज, हृदयातील अत्यंतिक गुज आणि प्रेमभाव जाणावयाचा. त्याचीच आपापसात देवाण-घेवाण. ‘‘**तुका म्हणजे ज्याचे तयांसीच कळे। प्राप्त होतो फळे कळो मग।**’’

आपल्या स्वस्वरूप अशा या मार्गात सर्वांभूती भगवद्‌भाव, अभयवृत्ती व ईश्वराच्या ठिकाणी निष्ठावंत भाव या त्रिवेणीत मन संकल्पविकल्परहित होते. अहंकार-व्यक्तित्व नष्ट होते व नामस्मरणात-स्वरूपांत हळूहळु स्थिर होते. ‘‘**नाम घेता मन जिवे,**’’ जिव्हेच्या द्वारा नामामृतच स्रवते, मन रंगून जाते आणि स्वानंदाच्या ठिकाणी स्थिरावते.’’

मग सच्चिदानंदकंद आनंदघनाबरोबर-देवाबरोबर बोलता येते, त्याच्यावर रुसता फुगता येते. देवपण आपल्याबरोबर बोलतो. एका अननभूत आनंदात अंतर्बाह्य मुरुन जाते अवघेच व्यक्तित्व. मग जे आत तेच बाहेर. ‘‘**आत हरि, बाहेर हरि। हरिने घर कोंदले।।**’’

असे दर्शन (म्हणजे अनुभव) दिव्य अशा भक्तिप्रेमचक्षूंना होते. चर्मचक्षूंना नाही. हे किंवा ही दर्शने त्रिवार सत्य असतात. याबाबत मिथ्यावदे त्यासी ‘‘**आण उपासनेची**’’ असं समर्थ म्हणतात.

परवा खूप सुंदर ‘‘नाम’’ स्मरण झाले. एक लहर मनात उमटली. सकाळी मंदिरात प्रवचनास गेलो. व्यासपीठावर एक छान लॅमिनेशनमधील पांडूरंगाचे चित्र. कोणा एका सद्‌गृहस्थांनी सप्रेम भेट म्हणून दिले. हा प्रसंग हे ही एक दर्शनच आहे. अशी दर्शने हा साधकाचा जीवनाधारच आहे. साधकाची भूमिका जशी जशी चैतन्यानुभव उत्सुक व शुद्ध होत जाते तशा प्रमाणात दर्शनात दिव्य-दिव्यतरता अनभुवास येते. आत्मचैतन्य व विश्वचैतन्य

यांच्या ऐक्यानुभवात ह्याचे रहस्य आहे. हा ऐक्यानुभव नामाने येतो.

नामाने चित्त शुद्ध होते. चित्तशुद्धीने तरल, जागृत संवेदनाक्षम झालेल्या सुप्त मानसशक्तीचा अविष्कार, म्हणजेच विश्वचैतन्याशी-जीवचैतन्याचे ऐक्य अनुभवास येणे, यालाच सगुण साक्षात्कार म्हणतात. याच्या योगे आपले जीवन, उदात्त, विशाल व आनंदस्वरूप होते.

गोपींना झालेली दिव्यदर्शने, गोपीभाव, त्यांना लाभलेली भावसमाधी, महारास हा ह्याच सगुण साक्षात्काराचा विलास आहे. त्याच्या केवळ श्रवणाने, चिंतनाने, मग निश:ब्द प्रांतात दिव्य वेणूध्वनीच्या नादलहरी निर्माण होतात. नुसतं वाचणाऱ्याच्या हृदयग्रंथीचा हे शब्द ''आत्मप्रकाश'' स्वरूप धारण करून भेद करतात आणि विश्वात्मक चैतन्याशी तन्मयता, शस्त्रतद्रूपता, तदाकारता प्राप्त होऊन आनंदमय करून सोडतात.

* * * *



# चिंतन ११

भक्ताच्या जीवनामध्ये भक्तिप्रेमाचा अनुराग उदयास आला की प्रेमास्पद भगवंत आणि प्रेमीभक्त हे दोघेही परस्पर एकमेकांना अत्यंत वशीभूत होऊन जातात. मग संयोगात वियोग आणि वियोगात संयोगाचा अनुभव येऊ लागतो. गोपींना भगवंताच्या संबंधित स्थावर जन्म घेण्याची अभिलाषा झाली. उदा. बासरी व्हावे म्हणून वेळूच्या झाडाच्या रूपाने जन्मास येण्याची भावना. भगवंताच्या वियोगातही सर्वत्र विविध रूपाने त्याचेच स्फुरण होऊ लागते. या भक्तिप्रेमाचा स्वभावच असा आहे की ते ज्याच्या हृदयामध्ये निर्माण होते त्याला तर पराधीन (भगवंताच्या) करतेच पण एवढेच नाही तर ते ज्या

भगवंताविषयी उत्पन्न होते, त्यालाही अनुभवाचा विषय होऊन पराधीन (अहं भक्तपराधीना) करून टाकते. या अनुरागातील दिव्य भावालाच महाभाव असे म्हणतात.

महाभावाची ही अमृतमय स्थिती, अनुभव, अत्यंत उत्कट झाले असता रुढ आणि त्याहूनही अधिक अशी अनिर्वचनीय विशेषता प्राप्त झाली असता अधिरुढ या नावाने संबोधिली जाते. जनी या महाभावास भगवद्कृपेने आरुढ झाली आहे याचा परमानंदकंद आनंदकंदास विश्वास आहे.

या महाभावाचा उदय झाला असता प्रत्यक्ष भेटीच्यावेळी देखील पापण्यांची उघडझाप असह्य होते, एक कल्पदेखील सुखाच्या, आनंदानुभवाच्या आधिक्यामुळे क्षणासारखा वाटू लागतो आणि आठवणीमध्ये (आठवण होत असताना) एक क्षण सुद्धा कित्येक कल्पाप्रमाणे वाटू लागतो. या दोन्ही अवस्थांमध्ये सर्वच्या सर्व सात्त्विक लक्षणे काया, वाचा, मन, बुद्धी, इंद्रिये या सर्व स्तरांवर अत्यंत उत्कटपणे प्रकट होतात. यालाच भक्तिशास्त्रात कोडे, स्नेह, भाव, भक्ती या नावाने संबोधले आहे.

भक्तिप्रेमभाव हे एक असे दिव्य रसायन आहे की जे असंतोषाला-संतोष, धृष्टतेला-विजय, साधेपणाला-अलंकार, अज्ञानाला-ज्ञान, पराजयाला-विजय, दुःखाला-सुख, निकृष्टतेला-उत्कृष्ट, अंधकाराला-प्रकाश, निषेधाला-विधी, अशक्ताला-सशक्त, असमर्थाला-समर्थ, निंदेला-स्तुती, हानीला-लाभ, विस्मृतिला-स्मृती, सकामतेला-निष्कामता, असंताला-संत, अंताला-अनंत, निग्रहाला-अनुग्रह एवढंच काय पण मूर्खाला पंडित आणि शिष्यालाही गुरु करून टाकते.

संपूर्ण प्रकृतीमध्ये फेरबदल करण्याचे सामर्थ्य ह्या भगवद्भक्तिप्रेम-रसायनांत आहे.

इतके असूनही भक्तिप्रेम स्वत: आपल्या ठिकाणी कोणत्याही विशेषतेचा अभिमान धारण करत नाही. ते स्वदृष्टीने निर्विशेष परंतु अन्य दृष्टीने सविशेष आहे.

खूप आनंद आहे. ''**हा रस आनंदाचा। घोष करा हरिनामाचा।।**''

* * * *

# चिंतन १२

नामस्मरणाला परमार्थ साधनेत फार मोठे स्थान आहे. या साधनेत प्रतिभा शक्तीची मोठी आवश्यकता आहे बघा !!! ज्ञान, कर्म, ध्यान, भक्ती असे चार भिन्न मार्ग नसून या सर्वांचाच मिळून एकच नामस्मरणभक्तिप्रधान असा आक्रमिला जाणारा हा एकच पंथराज, प्रतिभाशक्तीच्या विकासासाठी. सद्‌गुरुच्याकडून मिळणाऱ्या सबीज नामाची यादृष्टीने फार मोठी आवश्यकता.

हरिपाठात श्री ज्ञानेश्वर महाराजांनी भगवतनामाचे महात्म्य साक्षात्कार शास्त्राच्या पार्श्वभूमीवर केलेले असल्याने त्याला विशेष असे आगळे वेगळे महत्त्व आहे.

नामस्मरण ही वरवर वाटणारी सोपी साधना ? परंतु ब्रह्मत्वाचा लाभ करून देणाऱ्या या साधनाचा जितका खोल विचार करावा तितके मन आश्चर्याने मुग्ध होते व ज्या संतमहात्म्यांनी ही नामाची अमृत संजीवनी मानवाच्या हाती दिली त्यांच्याविषयी प्रेमादराने अंत:करण भरून येते.

या नामस्मरण साधनात सर्व राजयोग सहज अंतर्भूत आहे. नामस्मरणाने लाभणारी समाधी हीच खरी-खरी समाधी, सहज समाधी, अखंड समाधी. तेथे व्युत्थान नाही म्हणजे देहभानावर-तादात्म्यावर येणे नाही. आनंदकंद भगवंतापाशी पूर्ण ऐक्य हीच सहज समाधी. सच्चिदानंदकंदाच्या आनंदांत सर्व विसरणे म्हणजे समाधी.

याप्रमाणे या नामस्मरण (प्रेमपूर्वक) साधनांत ''चित्त'', ''मी-माझे'' यासंबंधी विचार टाकून अखंड नामाचा, भगवंताचा आकार घेत राहते. यात

सहजच नैतिक प्रगती, चित्तशुद्धी अगदी ओघांतच आली अशी अनंत गुणांनी मंडित ही नामाची अमृत संजीवनी श्रीसद्गुरुकृपेनेच लाभते. खरं ना ?

आपल्या परमप्रिय शिष्यावर सद्गुरुंनी या सबीज नामाचे कलम केल्यावर मग त्या भाग्यवान शिष्योत्तमाचे जीवन पूर्णत: अंतर्बाह्य बदलून त्याला आनंद स्वरूपता लाभते. मानवी शरीराचा बाह्य आकार, वर्ण, रुप जसाच्या तसाच राहतो; पण अंतर्यामी हा नामधारक आनंदरसाने भरून जाऊन आनंदच होतो.

म्हणूनच सर्व साधु-संत-महात्म्यांनी कृतज्ञता, आनंदोत्साह व प्रेमादर यांच्या भरात नामाला कल्पवृक्ष, कामधेनू, चिंतामणी अशा गौरवपूर्ण उपमा दिल्या आहेत.

हरिपाठ हा रोज केवळ तोंडाने पाठ करण्याकरिता/म्हणण्याकरीता नाही तर श्रीगुरूंकडून मायबाप, महावैष्णव, तातांच्याकडून मिळालेल्या सबीज नामाचा (रामकृष्णहरि) अखंड जप अंतरी होण्यासाठी आहे बरं !!! "**ज्ञानदेव मौन जपमाळ अंतरी। धरोनी श्रीहरी जपे सदा।।**" अशा तऱ्हेने नामस्मरण एक श्वासही फुकट जाऊ न देता होऊ लागले की, अंत:करणात भगवंताबद्दल नितांत प्रेमभक्ती वाटू लागल्यावर तो हृदयस्थ भगवंत नामधारकाला भेटतो, दर्शन देतो, मग नामधारकास रम्य समाधान लाभते, त्यात रमून जाता येते.

* * * *

# चिंतन १३

**“दसरा सण मोठा, आनंदा नाही तोटा”** सध्या अश्विन मासभर पुण्यात आहे. सकाळ-सायंकाळच्या प्रवचनसेवेत “हरिपाठ” आणि “नाथभागवत” ह्या ग्रंथांचा धावता विचार करत आहे. संतांच्या अक्षराअक्षरांतून अमृतरस पाझरतोच. पण काही आपल्याला अगदी नगण्य समजणाऱ्या माणसांच्या लिहिण्यातून फार सुंदर/नितांत सुंदर असा “भक्तिभाव” साकार होतो बरं का !!! फक्त त्याचा त्याला जाणवत नाही किंवा जाणून/जाणत असूनसुद्धा विनयामुळं (प्रांजळ) त्याचं कर्तेपण आपल्याकडं ही मंडळी घेत नाहीत.

प्रत्यक्ष भेटीत तर आनंद असतोच, पण अक्षराच्या माध्यमातून होणारी गाठभेठ, वास्तपुस्तसुद्धा खूपच आनंददायक असते. ज्ञानोबाराया तर एका ठिकाणी म्हणतात (त्यांनी भगवंताच्या मुखात शब्द घातलेत) **“अर्जुना, अरे ही अक्षरे नाहीत रे, तर अक्षरस्वरूप अंगरखे घालून प्रत्यक्ष परब्रह्मच तुला भेटावयास आले आहे.”** हे अक्षरांचे सामर्थ्य. अशी अक्षरे सुखरुपतेने, प्रसन्नतेने, आत्मीयतेने, भक्तिप्रेमाने ओथंबून भक्तिप्रेमाच्या, अपूर्व श्रद्धेच्या रसांत चिंब भिजलेली असल्यावर मग काय ? आनंद, आनंद आणि फक्त आनंदच.

जेव्हा भक्ताच्या हृदयामध्ये भगवद्भावाचा उदय होतो, तेव्हा त्या हृदयामध्ये अभूतपूर्व उल्हासाच्या प्रकाशाचा झगमगाट होऊ लागतो. मोद, प्रमोद, हर्ष, आनंद, भाव, हार्द, सौहार्द, तृप्ती, भक्तिप्रेम इतक्या भाव-

भावनांचा समावेश एका भाव या शब्दांत आहे.

मग अशा भावाच्या भगवद्रतीमुळे परमप्रेमास्पद, सर्वसुखाचा आराम, विश्रांतीचा विश्राम, चिदानंद भगवंताच्या संबंधी ममतेचा संयोग होतो, विश्वासाची वृद्धी होते. अतिशय प्रगाढ अशा भक्तिप्रेमाचा विलक्षण सार्थ-रास्त असा अभिमान उदयास येतो, वृद्धिंगत होतो. अंत:करण द्रवीभूत होते. त्याच्या दर्शना-स्पर्शनासंबंधाने उत्कट उत्कंठा लागून राहते. क्षणोक्षणी चिदानंदाच्या ठिकाणी असणाऱ्या नित्यनूतन, नवनवीन, सौंदर्य, माधुर्य, सौशिल्य, वात्सल्य आदी गुणांचा अनुभव येऊ लागतो आणि निरतिशय तसेच अतुलनीय दिव्यानंदाची स्थिती वाढावयासच लागते.

हा चित्ताच्या उल्हासात्मक अशा भक्तिप्रेमाचाच विकास असतो. रसिक अशा महावैष्णव, आत्मसाक्षात्कारसंपन्न भगवद्भक्तांनी, भागवतोत्तमोत्तमांनी वेगवेगळ्या शब्दांच्याद्वारा ह्याचे वर्णन केले आहे की, हा भक्तिप्रेमभावच ज्ञान, स्नेह, राग, अनुराग यांचे रूप ग्रहण करतो. यामध्ये केवळ भक्तिप्रेमाचा उल्हासच आधिक्याने प्रकट होतो. त्यात देहभावाची तुच्छ ममता नसते बरं. उदा. अश्विन पौर्णिमेच्या पूर्णचंद्रबिंबाच्या दर्शनात उल्हास आहे, रुचा आहे, सुख आहे, आनंद आहे पण ममता अजिबात नाही. अशा ममतारहित भक्तिप्रेमभावाच्या अवस्थेलाच नारद भक्तिसूत्रात "आत्मरती" असं म्हणतात आणि ही आत्मरती हाच भक्तिप्रेमरसाचा चिरंतन असा स्थायीभाव आहे.

अनेक जन्मजन्मांतरांच्या पुण्याईने, त्या पुण्याच्या परिपाकाने, सत्संगतीने आणि मुख्य म्हणजे त्या परमकृपाळू भगवंताच्या महतकृपेने हा भाव उदयास येतो. मग जीवनातील सर्व प्राप्त व्यवहार/कर्म/कर्तव्य ही आपण त्या भगवंताचीच सेवा करत आहोत ह्या अनन्यभावाने होऊ लागतात.

असा भक्तिप्रेमभावाचा आश्रय आणि विषय असणारा भगवंतच

हृदयाच्या अंतर्दशेमध्ये परमात्मा आणि बहिर्दशेमध्ये प्रपंच म्हणून आहे. दोघांच्या मध्यभागी स्थित असणारे हृदय अर्थात अंत:करण ज्यावेळी प्रपंचाचे चिंतन करते, त्यावेळी ते जडभावाला प्राप्त होते. आणि तेच अंत:करण अंत:स्थित चित्स्वरूप परमात्म्याचे चिंतन करते तेव्हा त्यायोगे ते वरील दिव्यभावाला प्राप्त होते. त्यासाठीच नामसाधना.

साधना करताना स्थूलाचे लाड करावयाचे नाहीत, तसा त्याला त्रास होऊन क्लेश होतील असंही करावयाचं नाही हे लक्षात ठेवा. वेळच्यावेळी खाणं-पिणं, जेवण, विश्रांती, औषधोपचार (गरज असल्यास) करणं हे साधनेला बाधक नाही तर साधक आहे. दसरा झाला त्यानिमित्ते ही अक्षरसुवर्णपत्रे.

* * * *

# चिंतन १४

जीवन म्हणजे अनुभव. जीवनातून अनुभव वजा करावयाचे म्हटले तर जीवन म्हणून काही उरणारच नाही. बरं एक का अनुभवाव? तर नाही, शेकड्यांनी. अनेक व्यक्ती, वस्तू, देश, काळ, परिस्थिती आणि काय न् काय ?

आपणास आजपर्यंतच्या जीवनात इतके अनुभव येऊनदेखील आणि, विचारांच्या पातळीवर ते पटून देखील आपलं जीवन प्रारब्धावर सोपवणे आपल्याला जमत नाही. (प्रारब्धवाद म्हणजे ''**असेल माझा हरि, तर देईल खाटल्यावरी**'' असं नाही तर ''**यत्न कसून करीन मी, यश दे ना दे रामा तुझी सत्ता**'' हा बोध पक्का असणं.)

मग असं कां? तर जीवनात येणारा अनुभव ''मी'' घेत असतो; एखादी गोष्ट ''मी'' करतो, अथवा करत नाही, हा स्थूल देह म्हणजेच ''मी'' ही देहबुद्धी जोपर्यंत घट्ट आहे तोवर जीवन प्रारब्धावर सोडणे आपल्याला शक्य नाही. देहबुद्धी आहे तोपर्यंत प्रयत्न, देहबुद्धी सुटली (टाकली नव्हे) म्हणजे प्रारब्ध असं महाराज म्हणत.

दुसरी गोष्ट, येणाऱ्या अनुभवांतील घटनांमधील आपल्या कर्तृत्वाचा तोकडेपणा विचाराच्या पातळीवर समजतो पण तो पटतो असे नाही. बरेचदा आपले प्रयत्न अपुरे व चुकीच्या दिशेने झाले म्हणून यश मिळाले नाही असे वाटते. समजणे व पटणे ह्यात जमीन अस्मानाचा फरक आहे. (कर्तृत्वाचा तोकडेपणा म्हणजे कर्ता मी नसून ''**राम**''च आहे असे पटणे) पटण्यामध्ये

conviction आहे, ह्यालाच कृष्णमूर्ती अंडरस्टँडिंग असं म्हणतात.

प्रेमापोटी सांगतो, एक वेळ पैसा, सत्ता यांचा अभिलाष प्रयत्नाने सुटेल पण लौकिकाचा अभिलाष सुटणे फार-फार कठिण आहे आणि गड्यांनो, आपण लौकिक राखण्याचा किती तरी प्रयत्न केला तरी लौकिकाच्या फुग्याला कोठेतरी टाचणी लागतेच, मग काय ? ओंफस् !!! तुकोबाराया म्हणाले, **''ऐसा हा लौकिक कदा राखवेना। पतितपावना देवराया।।''** उदाहरणार्थ **''भेटेसी नच जाता म्हणती हा गर्विष्ठ।''** बरं जावं तर म्हणतात, येता जाता घर बुडविले मग आपण काय करावं ? तितिक्षा करावी, म्हणजे अप्रतीकार पूर्वकम् आणि चिन्ता पिडाविरहीत.

समाजसेवा चांगलीच गोष्ट. कां तर माणूस हा समाजशील प्राणी आहे पण ही करताना आपण सेवा कशाकरता आणि कोणाची करतो याचे भान सुटता कामा नये. सेवा अशी असते की त्यातून भक्तीप्रेम वाढले पाहिजे. मग त्या सेवेचे स्वरूप काहीही असो. श्रीगुरुंना आवडते ते करणे म्हणजे सेवा. आपल्या गुरुंना नामस्मरण आवडते ते सतत करीत राहावे.

स्थूल जीवनातील सर्व सुखे अपूर्ण. अनेक अपूर्ण एकत्र करूनही पूर्ण होत नाही आणि पूर्ण हे सदापूर्णचं असते. अनेक अपूर्णातून पूर्ण मिळेल असे वाटणे म्हणजे असंख्य वेड्यातून एक का होईना पण शहाणा मिळेल असे वाटण्यासारखे आहे खरं नां ?

आपले सर्वांचे सर्व व्यवहार अहंकारावरच आधारलेले असतात बघा. त्यामुळे ''राम कर्ता'' हे आपणा सर्वांच्यादृष्टीने नुसते शब्द ठरतात, तो भाव काही येत नाही. अहंकार नाहीसा झाला तर ''मी'' नाहीसा होईन अशी भीती आपल्याला वाटत असते, म्हणून मग आपण सर्वजण त्या आपल्या ''मी''ला खतपाणी घालतो.

मग त्या अहंकाराचं काय करावयाचं ? अहंकाराने साधन करायचं, साधन जसे जसे वाढू लागते तसे स्वामित्व येते व त्याचबरोबर शांतीचा, समाधानाचा, परमानंदाचा अनुभव येतो. आपण बरोबर रस्त्यावर आहोत याची ही खूण आहे.

**'राम कर्ता'** म्हणजे नेमके काय ? ते कळणे कठीण आहे ? !!! पण निदान जे जे घडते ते भगवंता, तुझ्या इच्छेने घडते आणि एवढंच नाही तर ते आमच्या कल्याणासाठीच घडते असे म्हणणे नाही तर असाच भाव दृढ असणे ही भक्ती.

* * * *

# चिंतन १५

ज्ञानेश्वरीतील सहावा अध्याय म्हणजे जीवाचे मूळस्वरूप जे ब्रह्म त्याचा प्रत्यक्ष साक्षात्कार करून घेण्याचा एक मार्ग. वास्तविक ब्रह्मस्थिती ही शब्दांनी सांगण्यासारखी नाही, तरी श्री ज्ञानेश्वर माऊलींनी अत्यंत सुरस व सूक्ष्मार्थरूप ब्रह्माचा अंत:करणात बोध उत्पन्न होईल अशा कोमल व अनुभवांनी भरलेल्या शब्दांनी प्रेमळ व एकाग्र चित्ताच्या श्रोत्यांना योगाचे निरुपण करण्याची प्रतिज्ञा केली आहे. कोमल शब्दांच्या योजनेने चित्त शब्दाकडे ओढते व ब्रह्मासारखा सूक्ष्म अर्थ ग्रहण करण्याला योग्य असे बनते.

या अभ्यासाने बुद्धी समस्वरूप भगवंताचे ठिकाणी स्थिर होऊन सम होते. चित्त भगवंताच्या ठिकाणी स्थिर झाले की परमसुखाचा लाभ होतो. मग या योगाने जीव ब्रह्मस्वरूप होतो किंवा ब्रह्म सम असल्यामुळे त्याला साम्यदशा प्राप्त होते. सर्व भूतांचे ठिकाणी परमात्मा एकरूपच आहे अशी दृष्टी ठेवली असताही बुद्धीला साम्यदशा येते किंवा आपल्याप्रमाणेच सर्व जीवालाही सुखदु:ख होते हे अखंड चित्तात वागवले असताही समदृष्टी होते. मीच सर्व सृष्टिरूप झालो आहे म्हणून सुखदु:खादी काही एक माझ्याहून भिन्न नाहीत असे जो अखंड पाहतो त्याचीही समदृष्टी होते.

कुंडलिनी जागृत झाली म्हणजे ती षट्चक्रावरून ब्रह्मरंध्रांत जाते व तेथे ब्रह्मरूप होते. हीच निर्विकल्प स्थिती आहे. ज्ञानोबारायांनी येथे सुंदर रहस्यच सांगितले आहे. श्री ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, शक्तीचा शक्तीत लय करून ज्या माझ्या निर्विकल्प स्वरूपाचा अनुभव येतो ते निर्विकल्प स्वरूपच.

**“ते हे चतुर्भुत कोंभेली। जयाची शोभा रूपा आली। देखोनि नास्तिकी नोकिली। भक्तवृंदे।।”** अंकुरित झाले. निर्विकल्प स्वरूपाच्या शोभेनेच चतुर्भुजरूप धारण केले आहे. कर्मयोगात ज्या भगवंताच्या रूपाचे ठिकाणी चित्त स्थिर करून कर्म केले जाते ते निष्काम कर्मानुष्ठान सिद्ध होते. त्या भगवंताचे चतुर्भुज स्वरूपही अत्यंत निर्विकल्पच आहे असा लय योगानेच अनुभव येतो. हा अनुभव सांगण्याचे कारण असे की, अर्जुन हा सगुणभक्त असल्यामुळे सगुणभक्ताचे चित्त सगुण भगवंताचे ठिकाणीच स्थिर झाले असले तरी ते निर्विकल्प स्वरूपाचे ठिकाणीच स्थिर आहे व त्याला वेगळा लययोग करण्याची गरजच नाही. सगुण भगवंताच्या भक्तीभावाने ध्यान दृढ झाले असता एका भगवंतावाचून दुसरे जग वगैरे काही नाही असा भक्तीभावाने जगाचा नि:शेष लय होतो.

योग म्हणजे परमेश्वराच्या ठिकाणी चित्त स्थिर करून त्याचे परमेश्वराशी ऐक्य करणे. कर्मद्वारा परमेश्वराच्या ठिकाणी चित्तवृत्ती स्थिर करणे याला कर्मयोग म्हणतात. आत्मज्ञानद्वारा परमेश्वराशी ऐक्य करणे याला ज्ञानयोग म्हणतात व भक्तिप्रेमद्वारा भगवंताच्या ठिकाणी चित्तवृत्ती स्थिर करणे यालाच भक्तियोग म्हणतात. सगुण आनंदकंद, सच्चिदानंदघन भगवंताच्या नि:सिम प्रेमाने केलेल्या भक्तियोगांत जाणीवरहित निर्विकल्प ऐक्य होत असल्यामुळे व त्यामानाने इतर योगात जाणीवेसहित ऐक्य होत असल्यामुळे सर्व योगामध्ये भक्तियोगी युक्ततम आहे असंच भगवान म्हणतात आणि ज्ञानेश्वरमहाराजांनी **“मी देह तो आत्मा”** असे शब्द भगवंताच्या मुखांत घातल्याने (म्हणजे भगवद्‌उक्तीचे व्याख्यान केल्याने) तोच भाव दाखवला आहे. परमप्रेमपूर्वक नामस्मरण असा हा आपला नामयोग हा सुद्धा एक श्रेष्ठ/सर्वश्रेष्ठ योग, प्रेमयोगच आहे बरं !

असं बघा, सगुण भगवंताच्या नामस्मरणादी भक्तीचा आधार न घेता केवळ कर्म, ज्ञानमार्गाने आत्मलाभ करून घेऊ पाहणाऱ्याला वयाच्या शेकडोवर्षाच्या चळती व हजारो जन्मांचे प्रतिबंध ओलांडून मग कदाचित् आत्मसिद्धीचा किनारा गाठता येतो, पण ''**बहुता सुकृताची जोडी। म्हणूनि विठ्ठली आवडी।।**'' भगवंताच्या नामस्मरणादी प्रेमलक्षणा भक्तीचे ठिकाणी आवड उत्पन्न होण्यासाठीच अनंत जन्मीचे सुकृत पदरी असावयास पाहिजे. अशा निरपराध भक्तीने लवकरात लवकर आत्मप्राप्ती करून घेता येते.

भगवत्प्राप्तीकरता केलेले प्रयत्न काही प्रतिबंधामुळे तात्काळ फलदायी झाले नाहीत तरी खंडित होऊन निष्फळ होत नाहीत तर भगवत्कृपेने पुढे त्या प्रयत्नाकडे साधक अनायासे ओढला जातो व शेवटी त्याला भगवत्प्राप्ती होतेच होते.

अभ्यास आणि वैराग्य यांच्या सहाय्याने अत्यंत चंचल मन आवरले जाते व त्याचा निग्रह होतो.

अभ्यासासाठी आधार घ्यावा तोदेखील परिमित युक्तीच्या मापाने (म्हणजे फार कमी नाही, फार जास्त नाही) मोजलेला घ्यावा, त्याचप्रमाणे सर्व शारिरीक क्रियाही शरीराला थकवा वाटणार नाही अशा नियमित कराव्यात.

हा योगमार्ग (षट्चक्रभेदरुप) किंवा लययोगमार्ग सगुणभक्तीला कसा पोषक आहे हे महाराजांनी आपल्या भाष्यात सुस्पष्ट केले आहे.

या अभ्यासामुळे भगवंताला साधक साकार करतो व त्या साकार झालेल्या भगवंताशी ऐक्य पावतो. नदी समुद्राच्या एका भागात मिळते, तरी तो समुद्राचा भाग सर्व समुद्राहून निराळा नसून सगळ्या समुद्राशी एकरुप

असल्यामुळे ती नदी जशी सर्व समुद्राशीच एकरुप होते त्याप्रमाणे योगाने जीव चैतन्यमय साकार होऊन साकार परमेश्वराशी ऐक्य पावत असला तरी तो पूर्णत्वाने पूर्ण निराकार ब्रह्मशीच ऐक्य पावतो. म्हणजेच परमेश्वराचे निर्गुण निराकार स्वरूप व रामकृष्णादी सगुण साकार स्वरूप हे दोन्ही शुद्ध असून त्यांचे ऐक्यच असल्यामुळे सगुणस्वरूपाशी ऐक्य पावणे हे निर्गुण स्वरूपाशी ऐक्य पावण्यासारखेच, नव्हे, पावणेच आहे. नामयोगामुळे हे ऐक्य साधते.

वास्तविक पाहता आपले ठिकाणी ''मी'' म्हणून जे वृत्तीचे स्फुरण होते, त्या रुपाने परमेश्वरच स्फुरतो, पण ते स्फुरण म्हणजे भगवंत नसून मी असे जीव समजतो व भगवंतावाचून वेगळा पडतो, हा वेगळेपणाचा अहंभाव जोपर्यंत आहे तोपर्यंत जीव परमेश्वराशी ऐक्य पावू शकत नाही. म्हणून मी म्हणजे जीव ही जाणीव हेच चित्ताचे काठिण्य. ते काठिण्य नामयोगाने विरघळते.

भगवंतांनी या अध्यायांत अनिर्वाच्य निर्गुण परब्रह्माचे व आपल्या सगुणस्वरूपाचे पूर्ण ब्रह्मत्त्व दाखवले आहे. महाराजांनीही आपल्या भाष्यांत निर्गुण व सगुणाचे अत्यंत ऐक्य आहे हे सुस्पष्ट केले आहे. याचा साक्षात् अनुभव या योगमार्गाने घेता येतो व त्या अनुभवामुळे सगुण भगवंताच्या ठिकाणी अकृत्रिम भक्ती होते.

अद्वैतभक्तीची प्राप्ती होणे यासारखे दुसरे थोर भाग्य नाही. भक्ताच्या निःसीम प्रेमभासाला भाळूनच परमात्मा सगुण साकार होतो; इतकंच नाही तर भक्ताच्या सर्वस्वी स्वाधीन होऊन राहतो. भगवंतासह सर्व संत या ज्ञानीभक्तांच्या प्रेमलाक्षणाभक्तीचा मोठ्या आवडीने गोडवा गातात. असा भक्त हा परम भाग्यवान असतो. भगवंताला आपल्या भक्तांचे निःसीम प्रेम असल्यामुळे आपल्यावर प्रेम करणाऱ्यापेक्षा आपल्या भक्तांवर प्रेम करणारा विशेष आवडतो.

भक्ताला भगवंताची सगुण मूर्ती ही आपल्याच आत्मप्रेमाची मूर्ती वाटते व भगवंताला पण भक्त म्हणजे आपल्या आत्मप्रेमाची मूर्ती वाटते म्हणजे भगवंताला भक्त व भक्ताला भगवंत आत्मस्वरूपाइतके प्रिय असतात.

योगातील क्रियासाध्य समाधीतून व्यत्थान होणे (म्हणजे समाधी उतरते) पण भक्तियोगाने साध्य होणारी समाधी, भक्तिप्रेमाच्या अखंडतेमुळे अखंड राहते. भक्तिने अर्जुन अखंड समाधिस्थ म्हणजे भगवंताच्या ठिकाणी त्याची वृत्ती अखंड स्थित झाली असून त्याला त्याची जाणीव नाही म्हणून त्याची निर्विकल्प अवस्था पाहून श्रीकृष्णास अत्यंत संतोष झाला व योगशास्त्राचे निरूपण करत असतानाच भगवंताचे मन अर्जुनाला अलिंगन देऊ लागले.

भक्तिप्रेमाचा किंवा आनंदाचा असा स्वभावच आहे की जाणीव झाली असता त्यात न्यूनता येते आणि जाणीव होत नाही अशा स्थितीत पूर्ण सुखरूप किंवा आनंदरूप स्थिती असते. जाणीव (की जी घासातल्या माशीसारखी असते) नाहीशी करणे हाच भक्तिप्रेमाचा स्वभाव आहे. सगुण भगवंताची परमप्रेमस्वरूप भक्ती करणारे संतच सोऽहं भावरुप जाणीवरहित होतात. ज्ञानेश्वरमहाराजांनी "श्रीगुरुची परमप्रेमस्वरूप भक्ती केल्याने ही जाणीव नाहीशी होते." असा अनुभव सांगितला आहे. अर्जुन हा परमभक्त म्हणून ब्रह्मविद्या जर उघड करून सांगितली आणि त्यायोगे अर्जुनाच्या ठिकाणी सोऽहंभावरूप ऐक्याची जाणीवरूप माशी भक्तिप्रेमरसांत पडली तर त्याच्या भक्तिप्रेमाला कलंक लागेल असे देवाला वाटले.

या मार्गामध्ये "**स्थिरसुखआसनम्**" म्हणजे योगामध्ये पुष्कळवेळा सुखाने बसता येईल असे आसन घालून बसावयास सांगितले आहे म्हणून या आसनाला पाऊलवाट म्हटले आहे. पाऊलवाट म्हणजे सुखाने चालता येणारी वाट.

साक्षात् परब्रह्ममूर्ती परमात्मा श्रीकृष्णच परब्रह्माचा उपदेश करणारा व भक्तराज अर्जुन श्रवण करणारा असा आनंदाचा प्रसंग आहे. भाग्याचा प्रसंग आहे. अनुभवीच्या परब्रह्मवस्तूचे निरुपण ऐकणे याला महद्‌भाग्य लागते. मागल्या जन्मातील पुण्याईने ते कुणा भाग्यवानास लाभते. ते आपल्याला लाभले आहे हे कळणे ही पण भाग्याचीच गोष्ट ना ? नाही का ?

आपल्या शिष्यावर, त्याच्या अनन्य सेवेने व अनन्य भक्तिप्रेमभावश्रद्धेने श्रीगुरु प्रसन्न होतात आणि बोधरूपाने त्याच्या अंत:करणात प्रकट होतात. त्याच्या मस्तकावर हात ठेवतात.

सहावा अध्याय तसा गूढ. अभ्यासपूर्ण वाचाल तर. शब्दपरिचय, अर्थपरिचय आणि मग अर्थरूपता असा हा अभ्यासक्रम आहे.

जेवणारा रसज्ञ असला म्हणजे करणाऱ्याला व वाढणाऱ्याला उत्साह, आनंद, उल्हास असतो.

* * * *

# चिंतन १६

शरदऋतू, अश्विनमास, नवरात्र, दसरा, अश्विनी, ज्येष्ठापत्य निरांजन, गुरूद्वादशी, धनत्रयोदशी आणि दिवाळी. "**ऋतु बरवा शारदु । शारदी बरवा चांदु । चांदी बरवा चंद्रु । पौर्णिमेचा ।।**" कार्तिकमासास प्रारंभ झाला. आता महिनाभर काकडआरती.

आपल्या सर्वांच्या हृदयात असे एक रहस्यात्मक सौंदर्य आहे, की ज्याची कांती कधीच मलीन होत नाही; ज्याची छबी सतत झळकतच असते. त्या सौंदर्यात असा एक आनंद आहे की ज्याचा कधी ऱ्हास किंवा विनाश होत नाही. जो नित्य, निरंतर, विकास आणि उल्हासाची केवळ रासच आहे. तो रसांची (नव आणि षड्) रास आहे. तोच आनंद आपल्याला अनुभवास येतो. आपण तो बाह्य उपचार, प्रसंग, देश, काल, उपाधितून प्राप्त झाला असे म्हणतो. पण तो तर अंतर्यामी आहे. आनंदाचा गाभा आहे. हृदयस्थ आहे, तो आहेच. तो कधी-कधीतरी अनुभवणं म्हणजे प्रपंच आणि अखंड एकरसतेने अनुभवास राहणे म्हणजे परमार्थ.

हे आनंद भांडार, त्याचेच नाव भगवंत. हा आनंदकंद असा आहे की, ज्याचे वर्णन मन आणि वाणी यांच्या मौनातून केले जाते. ज्याच्या आस्वादनात आस्वाद आणि आस्वादकाचा अभेदच उरतो.

हा भगवंत मधुरातिमधुर, नित्यनूतन, परममनोहर परमात्माच आहे. त्याला जाणण्यात, पाहण्यात त्याच्याशी समरस होण्यात जीवाची/जीवनाची पूर्णता आहे. तेच जीवनाचे लक्ष्य आहे. तेच खरे जीवन आहे. या खऱ्या जीवनाचे

नावच साधन. ज्यांना हे साधन प्राप्त आहे; साध्य सुद्धा त्यांना प्राप्तच आहे. कारण साधनच साध्य असून सिद्धीही तीच आहे. या साधनेलाच नामसाधना असं म्हणतात.

एकदा एका साधकाने प्रश्न असा केला की, ''अण्णा, आमच्या अंत:करणात भगवंताच्या प्राप्तीसाठी व्याकुळता नसली तर तो आम्हाला भेटणारच नाही का ?'' त्याला सांगावे लागले, ''बाबा ! कां नाही भेटणार ? अवश्य भेटणारच !!! भेटणे हेच त्याचे जीवन आहे, जीवनव्रत आहे. तो भेटल्याशिवाय राहूच शकत नाही. इतकेच नाही तर प्रत्येक दिवशी, शेकडो-हजारो रुपाने तो भगवंत आपल्याला भेटतच असतो. परंतु आपण त्याला ओळखत नाही. त्यामुळे त्याच्या भेटीच्या आनंदापासून वंचित राहतो. अनंत रुपांनी भेटणारा भगवंत ओळखणं, त्याच्या भेटीचा आनंद लुटणं म्हणजे परमार्थ.

नामस्मरण हेच जीवन आहे. नाम हेच सर्वस्व आहे. नामाच्या आनंदापुढे त्रैलोक्यही तुच्छ आहे, नव्हे नव्हे मोक्षसुद्धा फिका आहे. नामाने अंत:करण शुद्ध, पवित्र होते. नाम घेत असतानाही इच्छा चिकटलेल्या असतातच आणि भगवंतच आपल्या भक्ताची प्रत्येक इच्छा उचित समजून पूर्ण करतात.

भगवंत अतिशय दयाघन आहे. आपण तळमळीने त्याला हाक मारावी; तळमळीने मारलेली हाक त्याने कधी ऐकली नाही असे झाले नाही, होत नाही आणि होणारही नाही.

आपण नाम घ्यावे, त्याला विनवावे, आळवावे; मनोभावाने. मग त्याच्याच कृपेने नामस्मरण होऊ लागते. नामामुळे चालता, फिरता, उठता-बसता सर्वत्र त्याच्या सान्निध्याचा अनुभव येतो. जे जे आपल्यासमोर येईल त्याच्या आत तोच बसला आहे. इतकेच केवळ नाही तर ह्या-ना-त्या रूपाने देखील तोच आला आहे असे वाटू लागते. नुसते वाटते असे नाही तर त्या

सच्चिदानंद आनंदघन नंदनंदनाचाच अनुभव येतो. यातून काय होते ? तर कोणत्याही प्रसंगाला सामोरे जाण्यात, भय, संकोच वाटत नाही. संकोच-भय तेव्हाच वाटते की जेव्हा अथवा जेथे भगवंत दिसत नाही. **''जेथे पाहे तेथे उभा। अवघ्या गगनाचा गाभा।''** मग भगवंताला भेटण्यात, बोलण्यात कसला आणि कशाचा संकोच ? आपण नुसतंच म्हणत असतो, **''त्या त्या ठिकाणी निजरुप तुझे।''** बस् म्हणून काय होणार ना ? प्रत्येक ठिकाणी, प्रत्येक प्रसंगी भगवंताच्या रुपमाधुरीचे पान करून मस्त असावे. तो मोठा बहुरुपी आहे ना ? न जाणो कोणकोणती रुपे धारण करून तो आपल्याला भेटत असतो !!! आपण त्याच्या या क्रिडेचे, त्याच्या खेळाचे आणि त्याच्या रमणक्रियांचे रहस्य जाणावे. मग तो आपल्यापासून लपून राहिलच कसा ? नाही का ?

पहा ना, त्या विचित्र खेळाडूचा खेळ, खेळणं तोच स्वतःच, खेळ स्वतःच, खेळाडूही स्वतःच आणि खेळ पाहणाराही तो स्वतःच, हीच तर त्या 'आनंदकंदाची आनंदमय लीला. किती रस आहे ? किती गोडवा आहे ? आनंद आणि परमशांतीचा अनंत सुखसागरच उसळत असतो. हीच ह्या भगवंताच्या खेळाची पूर्णता आहे बघ.

ही दृष्टी, हा अनुभव, ही खेळातील मौज एका भक्तिप्रेमभावाने अनुभवता येते. ह्या भक्तिप्रेमामुळे सर्व तंत्र स्वतंत्र आनंद स्वरूप भगवान मुकुन्दसुद्धा पराधीन होतो. ही भक्तीच भगवंताला पकडून आणते, आपल्यासमोर उभं करते. परमानंदालाही वश करणारी अशी भक्ती.

हा भक्तीभाव नामाने उदयाला येतो, वृद्धिंगत होतो. साधन केवळ निरंतर, सत्कारयुक्त नाम.

* * * *

# चिंतन १७

आपल्या पंचांगांनुसार वर्षभरात असा एक महिना नाही की ज्यात काही ना काही सण, उत्सव, व्रत, समारंभ नाही.

अश्विन महिन्यात तर बरेच सण, उत्सव, नवरात्र, दसरा, कोजागिरी पौर्णिमा हे झाले पहिल्या पंधरवड्यात. दुसऱ्या पंधरवड्यात गोवत्सद्वादशी, गुरुद्वादशी, धनत्रयोदशी आणि या सर्वात वर्षातला सगळ्यात मोठ्यात मोठा सण दिवाळी. चार दिवसाचा, आनंदाचा, प्रकाशाचा, तेजाचा उत्सव-सण-समारंभ.

"**सोनियाचा दिवस आजि अमृते पाहिला।**" असा "**आनंदुरे आजी परमानंदुरे**" असा हा सण. वर्षभरात दिवाळी सण पंचांगानुसार चारच दिवसाचा पण श्रीहरीच्या सततच्या नामचिंतनामुळे, स्मरणामुळे एक चमत्कार घडतो. सर्वत्र सदा आनंदकंदाचाच अनुभव येतो; सर्वत्र अतिदूर एकच एक सच्चिदानंदघनत्त्वच भरून राहिले आहे अशी प्रचिती येते. "**तो मजभीतरी। मी तया आतुबाहेरी।।**" अशी अवस्था बनते. "**हे समस्त श्री वासुदेवो। ऐसा प्रतितिरसाचा ओतलाभावो।**" अनुभवास येतो. "**सबाह्य अभ्यंतरी। अवघा व्यापक मुरारी।**" च असल्याची खूण मनात बाणली जाते. "**विश्वरुप पाहे तव सभोवते रुपडे। पाहे चहूंकडे तेचि दिसे**" असाच विश्वास बिंबत असतो. "**आंत विठ्ठलु बाहेर विठ्ठलु। मीचि विठ्ठल मज भासतसे।**" असा उच्च भूमिकेवर सतत आत्मानंदात रमणाऱ्या मनाचे सुख, तो आनंद किती आणि कसं वर्णन करावे ? या आनंदाला तुलना

कोठली ? आनंदाच्या दोंदावरच जीव रमत राहतो. आनंदच स्वत:चा आनंद भोगतो. ''**आनंदाच्या ताटी अमृताची वाटी।**'' ठेवून शांतीसुखासनावर विराजमान होऊन त्या आनंदरसाचे अमृतपान सेवन करावयाचे.

ही झाली आध्यात्मिक दिवाळी. आपण सामान्य प्रापंचिक माणसं !!! आपल्याला पंचांगातील चार दिवसाची मर्यादित दिवाळीच ठाऊक नां ? आत काही असो. निदान पंचांगात आहे म्हणून तरी आपण साजरी करतो नाही का ? नाही नाही आपल्याला ती करावी लागते ! लोकांकरिता का होईना ?

* * * *

# चिंतन १८

परवा अश्विनी झाली. त्या दिवशी येथे वल्लभाचार्य संप्रदायातील, पुष्टिमार्ग गुजर बांधवांच्यावतीने त्यांच्या राधाकृष्ण मंदिरात ''संतवाङ्यांतील भक्तिप्रेमरस'' ह्या विषयावर परिसंवाद होता. अध्यक्ष म्हणून समारोप करण्याची भाग्याची सेवा लाभली. खूपच सुंदर समारोप झाला.

श्रीविठ्ठल/श्रीकृष्ण हा संतांचा पिता, माता, बंधु, सखा, धाता, पितामह आणि काय न् काय ? तर सगळंच आहे, पण प्रामुख्याने तो माऊली आहे. एकदा मातेचे नाते जडल्यावर इतर सर्व बंधने शिथिल होऊन एक वात्सल्यभाव तेवढा शिल्लक उरतो. आईवर रागावणे, रुसणे, तिच्यापाशीच हट्ट धरणे, मन मोकळे करणे, जीवीचे निजगुज सांगावे, तिच्या मांडीवर बागडणे, तिच्या कुशीत शिरणे अशा अनेक मार्गांनी संत वात्सल्यसुख भोगतात. मग त्यांची माय पण त्यांचे सगळे सगळे अतिप्रेमाने, मातृभावाने करतेच, नाही-नाही त्याशिवाय मातेला चैनच पडत नाही. मग, सण असो नसो. कारण प्रसंग असावा लागतच नाही. एक फक्त वत्सलभावच कारण. मग काही खास सण, वार, निमित्त असल्यावर मग काय बोलायचं **''बालका लेवविजे लेणे। ते बाळ काय जाणे?।''** पण त्यातील आनंदाने माताच सुखावते असं आहे.

ह्या सगळ्या पार्श्वभूमीवर आणखी एक सुरम्य भावगर्भ नाते मराठी संतांनी (म्हणण्यापेक्षा भागवत् संप्रदायांतील सर्वच संतांनी) मधून-मधून व्यक्त केले आहे. ज्ञानदेव तर म्हणतात **''ऐसे संवादाच्या बहुला। लग्न**

**दोघांचिया आंतुलां। लागलें देखोनि जाला। निर्भरू संजयो।।"** (ज्ञा. १८-१५७८) म्हणजे याप्रमाणे संभाषणाच्या बोहल्यावर श्रीकृष्ण व अर्जुन या दोघांचा मंगल विवाह होऊन त्यांची जन्माची गाठ पडली, हे पाहून संजयाचे मन अती आनंदाने ओसंडून आले असं वर्णन अत्यंत मनोज्ञ व हृदयस्पर्शी आहे.

भागवतांत या भक्तिप्रेमाचे सविस्तर वर्णन आलेले आहे. शरदऋतू, वृंदावन, यमुना, पौर्णिमेचे चांदणे, रासपंचाध्ययी ह्यांत मोठे हृद्य आहे. अवघं गोकुळ वेणूनादावर लुब्ध झालं, मुग्ध झालं. कबीर एवढे विरागी, पण त्यांनाही म्हणावं लागलं की, **"कबीर कबीर क्या कहें ?। जाओ जमुनाके तीर। एक एक गोपीके प्रेम में। बह गये कोटी कबीर।।"** म्हणूनच नारद आपल्या भक्तिसूत्रात भक्तीचे माहात्म्य वर्णन करताना भक्ती कशी असावी तर, **"यथा व्रजगोपिकानाम्"** असे म्हणाले. श्रीकृष्णावरील भक्तिप्रेमामुळे त्या निष्काम बनल्या होत्या. त्या कृष्णरुप झाल्या होत्या. **"ज्याचे जया ध्यान। तेचि होय त्याचे मन।"** म्हणूनच नारदांसारख्यांनी भक्तिप्रेमातिशयात गोपींच्याच भक्तिप्रेमाचे उदाहरण दिले. म्हणून आपण भगवंताचं, त्याच्याच नामाचं, रुपाचं, लीलाचरित्राचं ध्यान करायचं बरं !

मोठ्या उत्कटतेने भक्त आपले सर्वस्व भगवंताला मोठ्या आवडीने व ममत्त्वाने समर्पण करतो. आपल्या सगळ्या वृत्तींचा ओढा भगवंताकडे वळवून अनेक जण तरून गेलेत.

भक्तीप्रेमशास्त्रातला एक महत्त्वाचा भाग/प्रमेय त्या ओघांत प्रामुख्याने चर्चेस आले. ते असे. प्रत्यक्ष भेटीपेक्षा वाट पाहण्यात एक वेगळाच आनंद आहे. ही वाट पाहण्यातील तगमग, व्याकुळता, तडफड, भक्तीच्या क्षेत्रांत नितांत सुंदर रुप धारण करून एक मोठं मूल्य होऊन बसली. तुकोबाराया

म्हणतात, "**वाट पाहे बाहे निढळी ठेऊनिया हात।**" तर वाट पाहता पाहता "**शिणले डोळुले**" अशी भक्ताची अवस्था होते.

या वाट पाहण्यात ज्या आनंदकंद नंदनंदनाचे भक्तिप्रेम. त्याचेच गुणगान, त्याच्यावरचा राग, त्याच्याशी केलेलं भक्तिप्रेमाचं भांडण, त्याचे अनंत गुण, सुंदर बरवे रुप, त्याच्या रमणीय क्रीडा-लीला-चरित्र याचेच सतत चिंतन होते.

ज्ञानदेव म्हणतात, अहो त्याला तुम्ही माझा निरोप तरी सांगा ना !!! व तो काय म्हणतो ते लवकरात लवकर येऊन सांगा. "**डावा डोळा लवे, उजवी स्फुरतसे बाहे।**" जितका ताप अधिक, तगमग अधिक, व्याकुळता अधिक तितका-तितका भेटीचा आनंद सौख्य-सुखदायक.

वास्तवात देव-भक्तांच्यात दुरावा नाहीच, वेगळीक नाहीच. लेकरू आईच्या कडेखांद्यावर बिलगूनच असते, पण ते सुख विशेषत्त्वाने अनुभवण्यासाठी ते "आई-आई" म्हणून हाका मारीत असते व आईपण "बाळा काय रे ? का रे ? काय हवे ?" म्हणून त्याला प्रतिसाद देत असते.

भक्तसुद्धा भगवंताला हाका मारतात "**येईवो, येईवो धावोनिया**", जनाबाई म्हणतात "**येगं येगं विठाबाई**" का तर त्याचा भगवंत आणि भक्त दोघांना आनंद म्हणून.

कागदाला, काळाला, शब्दांना मर्यादा. भक्तिप्रेमभाव तर अमर्याद. तेव्हा सगळं कसं लिहिणार ना ? पण पांडुरंग म्हणतो, लिही आणि हातात हात धरून लिहून घेतो. "**देणे भगवंताचे.**"

* * * *

# चिंतन १९

आज रमा एकादशी, वसू बारस. उद्या धनत्रयोदशी. झाली पंचांगातील दिवाळीला सुरवात. पंचांगानुसार, कालक्रमणेनुसार प्रत्येकवर्षी फक्त एकदाच दिवाळी, पण आमच्या संतांचे केवढे उपकार, काय ऐश्वर्य ? त्यांनी शिकवलं पंचांगांत असो वा नसो !!! "**सदा सण सात आम्हां नित्य दिवाळी। आनंदेनिर्भर आमुचा कैवारी हरि।।**" अवघाच आनंद, आनंदाचे लाडू, आनंदाच्या करंज्या, "**आनंदाच्या डोही आनंद तरंग। आनंदचि अंग आनंदाचे।।**" नावाचा आनंद नाही नुसता !!! जीवनानंद किंवा आनंदीजीवन.

बाह्य उपचार, प्रसंग, स्थळ, व्यक्ती, त्यापण-अनुकूल, आरोग्य, देश, काळ, योग्य इंद्रियांचं सामर्थ्य आणि इतकं कदाचित् एकावेळी जुळून आलंच तर त्याच्या बरोबरीत, मनाची प्रसन्नता तर आनंद, नाहीतर मग .....!!! असला हा आनंदच नाही.

हा आनंद स्वयंभू आहे. स्वरूपाचा आहे, स्वानंद आहे, नित्य आहे, नित्यनूतन आहे, निरतिशय, निरामय, निरुपचार, निरुपाधिक आणि निर्मळ निरंजन आहे. ह्या असलेल्या आनंदाचा अनुभव घेणं, अनुभवणं, आनंदरुप होणं हा अभ्यास आहे.

"मी ब्रह्म आहे" ह्या जाणीवेत सुद्धा हा आनंद नाही. मग हा आनंद आहे भक्तिप्रेमात. भक्तिप्रेमानंदाचा हा मार्ग धुंदीचा मार्ग आहे; जागेपणाचा नाही तर बेहोषपणाचा, अहंकाराचा नाही निरहंकाराचा, ध्यानाचा नाही लीनतेचा, जागृततेचा नाही तर तन्मयतेचा. ह्या भक्तिप्रेमाच्या धुंदीत अंतर्यामी

जागेपणाचा (आत्मसाक्षात्काराचा हृदयाकाशांतील आकाशकंदील) दिवा तेवतो..... पण त्या जागेपणासाठी कुठली व्यवस्था नाही करावी लागत, नाही तर तो भक्तिप्रेमाचा सहज प्रकाश आहे. ती कुठली, कुणाची व्यवस्था नाही आहे !!!

ह्या भक्तिप्रेमाच्या मस्तीत "मी" नाहीये, तर परमात्मस्वरूप मोठा "मी" आहे. छोटा-खोटां 'मी' ह्या मार्गात संपतो अन् खरा विराट 'मी' अनुभवाला येतो. अन् एकदा का जीवनात असा खराखुरा विराट-विश्वव्यापक मी उदयास-अनुभवास आल्यावर त्यानं खोट्या-छोट्या मीला का पकडावं नां ??? क्षुद्राचा आधार कशाला, का घ्यावा ? परमानंदस्वरूप "मी"त बुडून जाण्याचा आनंद लुटल्यावर अहंकाराच्या तृणाला काय जरूर आहे पकडण्याची ? ह्या भक्तिप्रेमाच्या साधनेत हरवणं ही कला आहे. निरहंकार म्हणजे स्वत:ला विसरण्याची, हरवण्याची कला आहे.

भक्ती म्हणजे विसर्जन आहे, हरवण्याची कला आहे. भक्त जितका विसरतो ? हरवतो, जितका संपून जातो, तितका त्याचा आनंदाचा पेला जास्तीत जास्त भरतो; भक्त जितका रिता होतो, तितका आनंदाने ओतप्रोत भरून, आनंद ओसंडू लागतो. भक्त हरवून काहीच हरवत नाही; तर कमावतो, गमावत नाही मिळवतो काय ? आनंद. दुर्दैवी तर ते लोक आहेत ज्यांना भक्तिप्रेमाची गोडी नाही लागली; नाही विसरता आलं, नाही हरवता आलं, मस्त नाही होता आलं, कारण ते लोक मिळवून मिळवूनही केवळ सगळंच हरवून बसतात-मिळवत तर काहीही नाही. मिळवायचय काय तर हा निजानंद.

भक्त स्वत:ला हरवून (मीपणा हरवून) स्वत:ला (स्वरूपानंदाला) मिळवतो अन् हा भक्तीप्रेमाचा मार्ग काही कोरडा, रसविहीन नाही हं !

उदासपणा आणि निराशेचा, पराजयाचा, पलायनाचा दु:खवादी मार्ग नाही तर भक्तीचा मार्ग म्हणजे आनंदोत्सव आहे, हा मार्ग वसंताचा मार्ग आहे. अनंत अनंत फुलांचा, फळांचा, अनंत अनंत गीतांचा संगीतोत्सव आहे, स्पर्धा नव्हे. हा आनंद महोत्सव म्हणजे भक्ती. ह्या आनंदमहोत्सवात भक्त आहे अन् भगवंत आहे. मग आणखी यापेक्षा काय हवं ना !!! भक्ताचं असणं भगवंतात आहे. याहून मोठं आणखी काय सुदैव ते ? ह्या भगवंतात असण्यान भक्त मस्त असतो. त्या रसात खूप बुड्या घेत असतो. भक्तीचा स्वाद म्हणजे आनंदाचा स्वाद आहे.

ह्या सगळ्या आनंदोत्सवाची सामग्री, प्रक्रिया, पात्रे, इंधन, उपकरणे वेगवेगळी नाहीत तर एकच आहेत. बस् फक्त एकच आणि ते साधन म्हणजे नामस्मरण. आनंदाचा हा रस, नुसता रस नाही तर महारस आणि आनंदाचा नसून आनंदच रस. आनंदरस नाम हा रस विटत नाही, आटत नाही तर क्षणाक्षणाला नित्यनूतन, क्षणोक्षणाला वाढणारा.

हा नाममार्ग, पायांनी संपत नाही. आनंदाश्रूंनी/प्रेमाश्रूंनी संपतो. हा रस्ता नुसत्या शास्त्रांनी, सिद्धांतांनी नाही संपत तर संपतो भगवंताला त्याच्या नावानं सरळ साद घालण्याने !!!

पंचांगातील दिवाळीनिमित्त अक्षर स्वरूप फराळ पाठवला आहे. त्यात नाही खवा, नाहीत बदाम, पिस्ते, नाही चांदीचा वर्ख, तर आहे फक्त निखळ साजूक, रवाळ, घरगुती कढवलेलं तूप.

* * * *

# चिंतन २०

आळंदी, देहू या संतांच्या भूमीत वारंवार का जावयाचे ? त्याने काय लाभ होतो ? या अवतारी, साक्षात्कारी संतश्रेष्ठांचे आध्यात्मिक अनुभव सार्वत्रिक म्हणजे एकाच प्रकारचे, एकाच परमसत्य तत्त्वाचे आणि स्वरूपत: सत्य असतात. त्यांची साधना, अनुभव, आनंद, सेवा यांच्या लहरी/कंपने/ स्पंदने त्या वातावरणात सूक्ष्मत्वाने विहरत असतात. त्याचा आपल्याला फार फार उपयोग होतो. आपल्या साधनेसाठी या साधनेतून अनुभवात देव स्वत: साधकापुढे प्रकट होतो. देवाने स्वत: असे प्रकट होणे हे त्या भगवंताच्या कृपेवरच अवलंबून असते. साधकावर ही कृपा निश्चित होतेच होते, पण ही कृपा कशी, केव्हा व कोणत्या माध्यमातून होईल हे मात्र कोणी कधीच सांगू शकत नाही. पण एवढे मात्र खरे की साधकाच्या अंत:करणात पराकाष्ठेची तळमळ उत्पन्न झाल्याशिवाय आणि चातक जसा मेघाशी अनन्य असतो, **''एक भरोसो, एक बल, एक आस विश्वास। एक राम घनश्याम हित, चातक तुलसीदास।।''** तशी अनन्यता आपल्या अंत:करणात उत्पन्न झाल्याखेरीज ही ईशकृपा अवतरत नाही हं. या दैवी कृपेला आपण पात्र होण्याकरिता श्रद्धायुक्त श्रवण, विवेकयुक्त मनन, शांत व एकाग्रचित्ताने निदिध्यासन (म्हणजे चिंतन) आणि अखंड, सत्कारयुक्त नाम याचा दीर्घकाळ, निरंतर व नेमाने अभ्यास केला पाहिजे. या सगळ्याचे फल म्हणजे भगवंताचा साक्षात्कार. समर्थ म्हणतात, **''श्रवणापरिस मनन थोर। मनने कळे सारासार। निजध्यासे साक्षात्कार। नि:संग वस्तु।।''**

या देवाच्या साक्षात्काराचा मार्ग कोणता ? तर पंथराज (म्हणजे देवाकडे घेऊन जाणारा राजरस्ता) नामस्मरणात्मक परमप्रेमलक्षणाभक्तियोग. या

राजमार्गाची व्याख्या काय म्हणशील तर बघ. ज्ञानमूलक, आत्मनीतीप्रधान, आत्मसाक्षात्कार पर्यवसायी नामस्मरणात्मक परमप्रेमळक्षणास्वरूप भक्तियोग. हा रस्ता भक्तीचा रस्ता आहे. या भक्तिमार्गाचे सारभूत अंग म्हणजे भगवंताच्या नामाचे स्मरण अगर चिंतन. नित्यानित्यवस्तुविवेक व सूक्ष्म अशी विवेचकदृष्टी हा या भक्तियोगाचा पाया आहे; आत्मिक शुद्धता अगर पावित्र्य आणि सत्यनिष्ठा (?) हे या मार्गाचे प्रधान अंग आहे; आणि आत्मासाक्षात्कारोत्तर, परमप्रेमलक्षणाभक्ती हे या मार्गाचे अंतिम साध्य आहे.

हा जो देव आहे नां ? हा वैचारिक (नुसत्या) मंथनाच्या पलीकडे आहे. भाषा त्या ठिकाणी गोंधळते; शब्द कुंठित होतात; शब्दांनी त्याचे वर्णन करणे अशक्य आहे. हा देव शब्दातीत, एवढंच काय मनबुद्धीच्यापण अतीत आहे. तथापि प्रतिभाशक्तीने त्याला पाहता येते, त्याचे ज्ञान होऊ शकते, इतकेच नाही तर प्रत्यक्ष अनुभवता येते, नव्हे नव्हे तर देवस्वरूप होता येते.

त्यासाठी हा भक्तियोग पूर्ण श्रद्धेने, दृढनिश्चयाने व सावधानपणे आचरणात आणला तर प्रत्यक्ष भगवत्‌दर्शन, अनुभव, देवत्व शक्य आहे.

देवावर दृढ श्रद्धा, उत्कट भक्तिप्रेम आणि त्याच्या साक्षात्काराची तीव्र उत्कंठा ही त्रयी फार फार महत्त्वाची. भगवंताची अत्यंत कळकळीने मनोभावे प्रार्थना करून त्याच्या कृपेची आतुरतेने वाट पहात रहायचे. भगवंताच्या भक्तिप्रेमाशिवाय माणसाचे जीवन अत्यंत कुचकामाचे, मूल्यहीन उशीर न करता, कुठलीही सबब न सांगता या भक्तिमार्गावर वाटचाल करावयाची.

ह्या भक्तिप्रेमाला संतांनी त्रिकोणाची सुंदर उपमा दिली आहे. अनन्यता, निरपेक्षता आणि निर्भयता हे ते तीन कोन. असं भक्तिप्रेम, जेथे बुद्धीचा पराजय होतो तेथे भक्तिप्रेमच विजयी होते.

* * * *

# चिंतन २१

भगवंत हा भक्तांच्या हृदयांत बसूनच विश्रांती सुख अनुभवतो, भक्तांच्या भजनाचा मधुरभक्तिप्रेमनाद श्रवण करून भगवान अत्यानंदाने डोलतो. ह्या भजनाला ताल, लय, सूर, गोड गळा काहीच नसला तरी भगवंताला त्याची भूकच नसते बघ. तो भुकेला असतो प्रेमभक्तिभावाचा. "**नाही तयाविण भुकेला विठ्ठल**" अशी श्री तुकोबारायांची साक्ष आहे. तसंच अक्षरांचं असतं बरं का !!! अक्षर चांगलं नसलं तरी त्यातला भाव सुंदर असतो. चोखोबा म्हणतात, "**चोखा डोंगा परि भाव नोहे डोंगा।**"

कृपाळु चक्रवर्ती भगवान श्रीकृष्णचंद्र भक्तजनस्वरुप चकोरांस आनंदित करतो, कृतार्थ करतो. आनंदितच नाही तर आनंदस्वरुप करतो. भक्त जर आपले सर्वस्व प्रभुचरणारविंदी समर्पण करतो, मग प्रभू त्यांच्याकडे धाव घेण्यास थोडाच विलंब करणार ? शक्यच नाही. तो त्वरेने धांव घेतो.

ह्या प्रभुकृपेतच परमशांती आहे. खरोखरच शांती हीच आनंदाची ज्योत आहे. हा ज्योतिर्मय प्रकाश भक्तिप्रेमानुसंधानांतून फाकत असतो. ह्या भक्तिप्रेमाच्या उष:कालीन सुवर्णप्रकाश किरणांनी भक्तांचं हृदयकमळ आनंदाने उमलते. ह्या पंचपंचउष:कालाने अंत:करणाच्या घरट्यांतील भावीपक्षीगण मधुर शब्दांचे कुंजन करू लागतात. सहज नांदणारा संतोषच ह्या कूजनातून प्रकटतो. स्वान्त:सुखातून आलेले हे पक्ष्याचे गाणे असते. श्री तुलसीदासजी म्हणतात की, "**स्वान्त:सुखाय तुलसी रघुनाथ गाथा।।**" आत्मतृप्ती हेच जीवनाचे माधुर्य आहे. ही आत्मतृप्ति आत्मारामाच्या

प्रसादभेटीत आहे. अशी आत्मारामाची प्रसादभेट झाली की मग त्या भेटीतील आनंदाचे वर्णन बापड्या शब्दांनी काय करावे ना ? अशी भेट केव्हा होते ? तर बुद्धी आनंदात लीन झाल्यावर !!!

अहंकार बुद्धीला सांगत असतो, "तूं त्या भक्तिप्रेमभावाला जागृत करू नको. कारण तो जर जागा झाला तर माझा जिवंतपणा कसा टिकणार ? इतकेच काय, पण बुद्धी तू देखील त्या प्रेमभक्तिसुखाभावांत पूर्ण विराम पावशील. माझा मृत्यू तोच तुझा पण मृत्यूच." पण बुद्धीने अहंकाराला चोख उत्तर दिले, "त्या भक्तिप्रेमभावांत विराम पावण्यांतच हे अहंकारा तुझे परमकल्याण आहे." अगदी अगदी खरंच आहे पाहा. भक्तिप्रेमभावांत विलीन होण्यात, रममाण होण्यातच परमानंद आहे.

अशा आनंदघन, परमप्रिय, परमप्रेमास्पद आनंदकंद नंदनंदनाच्या प्रिय दर्शनाने, स्मरणाने, चिंतनाने, आठवणीने बुद्धी ह्या परमश्रेष्ठ भक्तिप्रेमभावांत परिणत होते. नंतर त्या सच्चिदानंदाच्या प्रत्यक्ष अनुभवात मग आनंदच प्रकटतो. मग भक्ताला मानसप्रत्यक्षाचे अनुभव येतात. (म्हणजे जे मानस असेल ते प्रत्यक्ष अनुभवास येते.) कानाला नादाचा श्रवण साक्षात्कार होतो. डोळ्यांना रूपाचा साक्षात्कार होतो. नाकास सुगंधाची जाणीव होते. त्वचेला स्पर्शसुखाची अनुभूती तर जीव्हेस अमृतरसाची. असा तो प्रत्यक्ष अनुभवास येतो. एक गोपी आपला अनुभव सांगत आहे, "**अवचिता परिमळु, झळकला अळुमाळु। मी म्हणे, गोपाळु आला तो माये।।**"

हे सगळे केव्हा घडते ? तर आपल्या अंत:करणात अत्यंत उत्कट अशा भक्तीभावाचा उदय झाल्यावर. मग जागेपणी व स्वप्नातसुद्धा त्या भगवंताचे प्रत्यय अनुभवास येतात बघ. खरं ना ? वाणी नामोच्चारांत व त्याचबरोबर चित्त आनंदाभिरामाच्या चिंतनांत लीन झाले की पंचकोषाच्या पायऱ्या

ओलांडून बुद्धी अहंकारासकट आत्मारामात विलीन पावते.

हीच आनंदस्वरुपता. हृदयात आत्मतृप्तीचा झरा प्रकटल्यावर शांतीचा आल्हाद सर्वेंद्रियांत पाझरतो.

आपल्या वेणुनादाचा श्रवणसाक्षात्कार भक्ताला करवून तो श्रीकृष्णचंद्र (जो परेच्या, म्हणजे परावाणीच्या पलीकडे असणारा भगवंत) आपल्या स्वरूपात लीन करून टाकतो. ''आनंदमयोऽभ्यासात।'' म्हणजे या अशा अभ्यासाने आनंद गोचर (म्हणजे प्रत्यक्ष अनुभवाचा विषय) होतो. आनंदाची परिणत अवस्था मोद, त्याची परिणतता म्हणजे प्रमोद (म्हणजे इंग्रजीत सुपरलिटीव्ह डिग्रीची सुपरलिटी) हे **भाव** चित्तात उदित होतात.

हा **भाव** फक्त भक्तिप्रेमभावाच्या मंदिरात नांदतो. तेथेच श्यामसुंदर विराजमान झालेला असतो. नामचिंतनाच्या चित्प्रवाहाने मग हा भाव आपल्या सर्वांगात संचार करू लागतो. ह्या दिव्य भावांत भगवंत आणि भक्त रममाण होतात. हेच भक्तिप्रेमसुख की ज्या सुखाला लालचावून भगवंत वैकुंठ सोडून भक्ताकडे धावतो. ज्याचा प्रत्येक हट्ट पुरवतो. लेकराचा हट्ट माय नाही पुरवणार तर मग कोण पुरवणार ? सांग बरं !! त्याचा हट्ट तर पुरवतोच, कोडकौतुक करतो, नाही नाही, मुखी घास घालतो, आपल्या मुखातला आनंदाचा, अमृताचा, ब्रह्मरसाचा !

* * * *



# चिंतन २२

मानवी हृदयाशी, माणसाच्या जीवनाशी तर जीवनाच्या अंतरंगाशी भाव-भावनांचा अतिशय जिव्हाळ्याचा संबंध आहे. भावना अत्यंत जिवंत, रसरशीत, चैतन्यदायी आहे. भावनेचे जीवन स्वयंभू आहे. भावनेतला भाव जो आहे तो फार संवेदनाशिल आहे, कोवळा आहे, मृदू आहे. त्याची स्पंदने सूक्ष्म आणि तरल आहेत.

भावना आणि बुद्धी यांचा विचार केला तर बुद्धी ही कचकड्याच्या बाहुलीसारखी आहे. तर भावना प्रसूतिवेदना सोसून जन्म दिलेल्या बाळासारखी आहे. कचकड्याची बाहुली खऱ्याखुऱ्या बाळापेक्षा अधिक रेखीव आणि सुंदर जरी दिसली, ती जरी कितीही शोभिवंत असली तरी त्याला पोटाशी धरून कुणा मातेची वात्सल्याची तहान कशी तृप्त होईल ? तसंच बुद्धी आणि भावनेचं आहे.

बुद्धीच्या मागे धावून-धावून मनुष्य भावनेला विसरला तर ते त्याचे वैगुण्य ठरेल. नुसत्या बुद्धीवर माणसाला जगताच येणार नाही. ज्या बुद्धीला भावनेची जोड नाही ती बुद्धी जीवन सुखमय करायला शेवटी असमर्थच ठरते.

लहान बाळ आईच्या साध्या-भोळ्या अंगाई गीताने झोपी जातं. रेडिओवरील अत्युकृष्ट अभिजात संगीतातसुद्धा ही शक्ती नाही ! भावनेचे सामर्थ्यही असेच आहे. ते जितके सूक्ष्म तितकेच जीवनाच्या सर्वांगाशी सर्वस्पर्शी असते. बुद्धी ही प्रभातकाळी गात-गात आकाशांत उंच उडणाऱ्या चंडोलासारखी आहे तर भावना ही अंबराईत लपून ''कुहू-कुहू'' करणाऱ्या

कोकिळेसारखी आहे. भावनेवाचून बुद्धी म्हणजे, मुठीवाचून तलवार ! ती तशीच उचलायला गेले तर स्वत:चा हात कापला जाण्याचा संभव जास्त.

गोड-गोड शब्द आणि सुंदर-सुंदर कल्पना गुंफून नुसती करमणूक करणे हेच वाणीचे कार्य आणि या वाणीची भावना ही एक आवडती मैत्रीण. एवढेच भावनेला जीवनात स्थान! नाही तर भावना हेच रसरशीत असं परिपूर्ण जीवन आहे. भावनेचे माहात्म्य, अस्तित्व कसे आहे म्हणशील तर वडिलार्जित घराण्यात परंपरेने टिकून असणाऱ्या भरजरी नारळी पैठणीतला येणाऱ्या वाळ्याच्या अत्तराच्या सुगंधासारखे/वासासारखे. सुगंध तर जाणवतो पण दिसत तर नाही. हा सुगंध जीवनाला मुखरत करणारा, मोहरून टाकणारा असतो पहा.

बुद्धी ही चिकित्सा करते. भावना कार्य करते. भावना ही विजेसारखी, वाफेसारखी प्रचंड शक्ती आहे. बुद्धी आणि भावना वास्तविक बहिणी-बहिणी आहेत. पण आजच्या समाजात त्या सवती-सवती झाल्यात. भावनाशीलता ही अजून उघड उघड द्यावयाची शिवी झाली नसली तरी ती अंगी असणाऱ्या माणसाचे व्यवहाराशी, विचाराशी आणि तथाकथित पुरोगामित्वाशी फारसे सख्य नाही, त्याला त्यातले काहीच कळत नाही, जमत नाही हीच कल्पना बहुतांशी आहे.

राज्यशास्त्र ते अणूशास्त्रापर्यंत बुद्धीवादी सर्व शास्त्रांचा कानोसा/शोध घेतात पण माणसाच्या अंतरंगाचा कानोसा घ्यावा, हृदयाची स्पंदने (हार्टची नाहीत) ऐकावीत असं कुणाला वाटत नाही.

तर एकंदर काय की, भावना-भाव हा मानवी जीवनाचा आत्मा आहे. ही भावना तीन प्रकारांनी प्रकट होते; शब्दांनी, अश्रूंनी आणि कृतींनी. त्यात काव्य हे भावनेचे पहिले सुंदर स्वरूप, पण शब्द कितीही सुंदर असले तरी

ते शेवटी वाऱ्यावरच विरुन जातात. अश्रू हे भावनेचे दुसरे रमणीय पण अत्यंत पवित्र असे रूप !!! आणि कृती हे भावनेचे तिसरे सर्वश्रेष्ठ स्वरूप. शब्द आणि अश्रू यांचे रुपांतर कृतीत व्हावयास पाहिजे. शब्द आणि अश्रू यांना कृतीचे स्वरूप प्राप्त झाले. या स्वरूपांत भावना तोंडाने अथवा डोळ्यांनी बोलत नाही तर मग ती नेहमी हातानेच बोलते. ती भावनेची कृतीशीलता, आपल्या आयुष्याचे सर्वस्व वेचून, आपले स्वत:चे जीवन शिंपून सर्वांचे जीवन फुलविते.

भूकेल्याला घास, पडलेल्याला हात द्यावा. त्याला भाव-भक्तिप्रेम देण्यात भावनेची कृतीशीलता असते.

* * * *

# चिंतन २३

अण्णा मुळातच भागवतधर्मीय वातावरणात लहानाचा मोठा (???) झाला. त्यामुळे भागवतधर्म-पंथ, ग्रंथ आणि भागवत, महाभागवत, भागवोत्तम तसेच भागवतोतमोत्तम या साऱ्याविषयींचं परमभक्तिप्रेम. भागवत सांगणाऱ्यांचा तर काय प्रश्नच नाही, पण भागवत ऐकणाऱ्याविषयी पण किती प्रेम ? तर "**तुका म्हणे मज घडो त्यांची सेवा।**" कुणाची ? तर गीता, भागवत श्रवण करणाऱ्यांची, सात्विक कुळांतील ही वैष्णव मंडळी. त्यात भगवद्भावांनी पुलकित झालेले कुणी भेटल्यावर मग तर काय प्रश्न !!! "**माझिये जातीचे**" कुणी भेटले की होणारा आनंद, आपुलकी काय वर्णावी ना ?!!

आपल्या पुराणकथांनी, समाजातील भावसौंदर्य, जिव्हाळा, सद्बुद्धी, अध्यामदृष्टी आणि भक्तिप्रेमभाव टिकवून ठेवण्याचे फार मोठे कार्य केले आहे. मुळात कथा ही माणसाच्या प्रत्यक्ष जीवनाशी कुठे तरी मिळती जुळती असते; त्यामुळे कथा ऐकताना तो अधिक एकाग्र होतो, पण त्याबरोबरच त्याचे रंजनही होते. या रंजनाबरोबरच वक्त्याच्या अधिकारानुसार आणि श्रोत्याच्या योग्यतेनुसार ती कथा संस्कारपण करत असते. अगदी न कळत हं !!!

"**कथा मुक्त करी, कथा दु:ख हरी। कथा हेचि बरी विठोबाची।।**" या कथेने मानवी जीवनाचे खरे मूल्य, जगातल्या सर्व व्यवहारामागे असणारी परमात्म्याची अनाकलनीय सत्ता, विविधतेने नटलेले त्याचे स्वरूप, त्याच्या दर्शनाने होणारा आनंद, धर्म, भक्ती, ज्ञान यांचे

जीवनातील महत्त्व हे सगळे ह्या कथेतून उलगडते, उमगते.

कृष्णचरितामृत तर काय ? त्याच्यापुढे स्वर्गीय अमृत बापुडवाणे ना !!! कृष्णाचे बालपणापासून ते अवतार समाप्तीपर्यंतचे चरित्र अनेक अलौकिक घटनांनी भरलेलेच आहे; पण त्याचबरोबर मानवी मनाच्या वात्सल्य, कौतुक, स्नेह, सख्य, प्रेम, अभिमान, आदर, जिव्हाळा, निष्ठा, समर्पण, भक्ती इत्यादी विविध भाव-भावनांना मोहित करते, आकर्षून घेते आणि शेवटी भगवंताशी एकरुप करते.

भगवान श्रीकृष्ण काय नाही ? तो आपल्या अवखळ खोड्यांनी गोपिकांच्या मातृहृदयाचा गोड छळ करणारा नंदकिशोर आहे; समवयस्क गोपगड्यांमध्ये खेळात हरणारा पण त्यांची मने जिंकणारा सवंगडी आहे; गोकुळातील सर्व स्त्री-पुरुषांना आपल्या खेळकर स्वभावाने रंजविणारा कन्हैय्याही आहे आणि आपल्या स्व-सामर्थ्याने त्यांचे सदैव रक्षण करणारा तारणहारही आहे. लहान असूनही तो थोरांचा सल्लागार आहे आणि मोठा असूनही लहानांचा जीवश्चकंठश्च सखा आहे. विश्वातील सर्व सौंदर्य ज्याच्या नखावरून ओवाळून टाकावे असा तो लावण्यसुंदर असून अंत:करणाला मोहीत करणारा चित्तचोर आहे. तो नंदनंदन आहे, बलरामाचा धाकटा भाऊ, कंसादिकांचा शत्रू, सांदिपनींचा सत्‌शिष्य, पांडवांचा सखा, द्रौपदीचा मानस बंधू, यादवातला कुलश्रेष्ठ, रुक्मिणी-सत्यभामादींचा पती, विदुराचे दैवत तर अर्जुन-उद्धवांचा ज्ञानदाता आहे.

राजकारण्यांमध्ये राजकारणधुरंदर तर साध्या-भोळ्या सुदाम्याचा बालमित्र आहे. श्रेष्ठांच्या सभेमध्ये अग्रपूजेचा मान घेणारा पुरुषश्रेष्ठ आहे आणि यज्ञप्रसंगात उष्ट्या पत्रावळी काढणारा आणि युद्धात घोडी धुणारा तो भक्तांचा दासही आहे. असा तो अखिल गुणनिधान ''नट-नाट्यकुशल

कान्हा'' आहे. त्यामुळे भगवान श्रीकृष्ण सर्वांच्या पलीकडे असून आपल्यातला वाटतो, नव्हे, आपला वाटतो. आपला असून सर्वांच्या पलीकडे दिसतो.

मनुष्याच्या सर्व भावना, त्या भावनांचे अधिष्ठान असणाऱ्या भगवंताशी जोडल्याने शुद्ध आणि पवित्र होतात. भागवत कथा सर्व भावसंपन्न जीवांना आणि ज्ञानी योग्यांनादेखील एका भक्तीच्या रंगात आणि भगवंताच्या भक्तिप्रेमात रंगवून टाकते. त्यांना आनंदच करून टाकते.

ह्या आनंदमय जीवनांत आपण फक्त त्या सच्चिदानंदाचे, आनंदकंदाचे अविभक्त, एकांतीक भक्त असतो. ही एकच भूमिका, हाच अद्वयानंद, हेचं अद्वैत, हीच भक्तिशास्त्रकारांनी वर्णिलेली अव्यभिचारी भक्ती.

* * * *

# चिंतन २४

अलंकापुरास जाऊन आलो. पंढरीचा योग अचानकच आला. सगुणभगवंताचे दर्शन झाले. आता परत श्री क्षेत्र आळंदीत श्री ज्ञानोबारायांच्या संजीवन समाधी सोहळ्यासाठी जाणारच आहे.

सगुणाचे दर्शन, सगुणाची भेट, सगुणसाकाराची अनुभूती ही अमृताभिषेकासारखी प्रमोदक व प्रमोचक आहे. सगुणाचा साक्षात्कार हा मोठा आनंदप्रत्ययकारी आहे. साक्षात्कार हा जसा निर्गुण-निराकाराचा तसाच सगुण-साकाराचापण होतो. साक्षात्कार हा परंतत्त्वाचा परमप्रत्यय.

हे परमतत्त्व इंद्रियातीत आहे. कोठल्याही इंद्रियाच्या किंवा बुद्धीच्या प्रांगणात त्याचा अविष्कार होऊ शकत नाही.

अतएव एका अर्थी परंतत्त्वाचा साक्षात्कार इंद्रियांना केवळ असंभवनीय. तथापी, जीवात्म्याच्या दृष्टीने या साक्षात्काराची शक्यता व सत्यता स्वयंस्पष्ट आहे.

या परंतत्त्वाचा (निर्गुण) आणि भगवंताचा (सगुण) अनंतत्त्वाचा, आनंदस्वरूपाचा, सुखद आनंदस्पर्शाचा अनुभव जीवाला आला की तो जीव स्वत:च त्या अनंततत्त्वांत, आनंदस्वरूपांत समरस होतो. इतकंच नाही तर समकेंद्र, समपरिघ व समव्याप्त होतो. साक्षात्कारी जीवचैतन्याला शरीरधारणा असेपर्यंत बुद्धिदेह उरतो पण देहबुद्धी उरत नाही. बुद्धी ही आनंदात विलीन होण्याची अखेरची परिसीमा आहे.

साक्षात शब्दाचा अर्थ न्यायदर्शनकारांनी परंपरासंबंधाचा अभाव असा केला आहे. या साक्षात्कार अनुभूतीत परंपरासंबंध नसतो. या परंपरासंबंधाने दुरान्वय-दुरावा निर्माण होतो.

साक्षात संबंध हा सर्व संबंधाचा निरास. सम्+बंध सिद्ध होण्यास निदान दोन बिंदू एकमेकांपासून वेगळे लागतात. येथे साक्षात आकारांत जीव हा शिवापासून, भक्त हा भगवंतापासून, शिष्य हा गुरुपासून केव्हाही वेगळा उरलेलाच/झालेलाच नसतो.

साक्षात्कार म्हणजे दुजेपणा (नसलेला) नाहीसा होऊन असलेलाच एकपणा अनुभवास येणे. साक्षात्कार म्हणजे मूर्तिमंत ''निवृत्ती'' अथवा अ-द्वयाचा, अ-द्वैताचा म्हणजे एकात्मतेचा विकास. म्हणून तर ज्ञानराज आपल्या श्रीगुरुंच्या निरुपाधिक स्वरुपाचं वर्णन ''अद्वयाब्जिनीविकाशु।'' अशा अलंकारिक शब्दांत करतात.

साक्षात्काराचे आणि एक वैशिष्ट्य लक्षात घेतले पाहिजे. या अनुभवाने' जे लक्ष्य, जो अर्थ, जी अनुभूती दर्शवण्यांत येते तो अर्थ, ते लक्ष्य, ती अनुभूती इतर सर्व विश्वाहून अत्यंत निराळी आहे. ''एकामेवाद्वितियम्'' असा तो अर्थ आहे. परम-परमोच्च अर्थ आहे. परमार्थ आहे.

साक्षात्कारानंतर पुढे निखळ आनंदानुभवाशिवाय काही अन्य शिल्लकच उरत नाही. इतकंच नाही, आपण आनंद अनुभवत असल्याची जाणीवही उरत नाही. उरतो केवळ आणि केवळ फक्त आनंद.

साक्षात्कार म्हणजे आपल्या इंद्रियात, मनात, बुद्धित भगवंत अवतरणे आणि भगवंताच्या या अवतरणाचे फलित म्हणजे इंद्रिय, मन, बुद्धी यांच्या वृत्ती, भाव, निष्ठाच नष्ट होणे.

सहज, सरळ आणि सरस अशी ही साक्षात्काराची अनुभूती (म्हणजेच प्रत्यक्ष आनंदकारता) कलियुगांत केवळ प्रेमलक्षणास्वरुप, भक्तीयुक्त सत्कार निरंतर अखंड नामाने याची देही याची डोळा प्रत्ययास येते.

''नाम साक्षात्करणीय, प्रत्यक्ष दर्शनीय अशी भगवंताची साक्षात् सगुण-साकार मूर्तीच आहे.

* * * *

# चिंतन २५

एका ज्योतीने दुसरी अनुरूप ज्योत पेटविली जाणे हा या शब्दांचा तात्पयार्थ ज्यांना ज्ञात असेल, तर पिता-पुत्री उभयतांमधील भक्तिप्रेमभाव पाहण्याचे असीम सद्भाग्य ज्यांना कुणाला लाभले आहे त्यांनाच फक्त.

विद्युत वाहक तार दिसावयास निर्जीव वाटत असली तरी तिला स्पर्श करताच कळून येते की तिच्या आत केवढी अमोघ शक्ती दडलेली आहे. आपले सर्वांचे शरीर मृण्मय असते, खरी गोष्ट; पण त्यातील चिन्मयता, (सूप्त अवस्थेतील) नामधारकाला लक्षी येते. पूर्वजन्मातील साधना सगळ्या सामान्यास कशी कळणार ? पण थोडे-बहुत साधन झालेल्या साधकाला, वैष्णवाला, भगवद्भक्ताला कळते बरं का !!!

अगाधप्रेममय जननीप्रमाणेच सद्गुरुमाता अतोनात आस्थेने, वात्सल्याने स्वहस्ते भक्तिप्रेमाचा घास भरवत असते. त्यायोगे बालकाचे अंत:करण एखाद्या प्रचंड स्त्रोताप्रमाणे अधिकाधिक भावसंपन्न होते.

हरभऱ्याचा दाणा कुठेतरी जरी पडला तरी त्यातून हरभऱ्याचंच झाड उगवतं व त्याला जे हरभरे येतात त्यांचा उपयोग चांगल्या कामातच होत असतो.

श्रीगुरु मायबाप आपल्या लेकरांकरता भगवंताजवळ व्याकूळ होऊन प्रार्थना करतात, जीवाच्या आकांताने त्याला विनवत असतात, "प्रभो, हे दयाघना, प्रणतवत्सला, कृपानिधे, माझ्या लेकराला भक्तिप्रेमभावाचे उदंड ऐश्वर्य दे." आणि देवाच्या आश्चर्यकारक योजनेने, अगाधलीलासामर्थ्याने

लेकरू भक्तिप्रेमभाव सरोवरांत अखंड विहार करू लागते, गुरुकृपेच्या नौकेत बसून.

सत्‌शिष्याचे पारमार्थिक कल्याणासाठी पिलू हिसकावून घेतलेल्या पक्षिणीसारखे श्रीगुरु तळमळत राहतात. अपार्थिव अशा पित्याच्या ठिकाणी तशाच अपार्थिव कन्येविषयक अपूर्व वात्सल्य भक्तिप्रेमभावाचा ओघ चालत/वाहात असतो.

श्रीगुरुमाऊलीच्या असीम कृपावर्षावामुळे लेकराला पण असंच वाटतं की ही फक्त माझीच माय आहे. आईच्या कृपाप्रेमभक्तिप्रसादाला आपल्याशिवाय अन्य कुणी वाटेकरी तर होणार नाही ना ? या आशंकेने मग आपल्याला कधी रुसवा तर कधी ईर्ष्या वाटावयास लागते. स्तनपान करणाऱ्या लेकराला 'प्रसवतीया' आपल्या जवळच असावी, नित्य जवळ असावी हाच बालभाव असतो. आई जरा जरी दृष्टीआड झाली तरी ते कावरं-बावरं होतं, व्याकूळ-दीन होतं.

श्रीरामकृष्ण परमहंस म्हणत असत, ''अंबा पिकला, त्याचा सुगंधस्वाद दरवळू लागला की राघू आपोआपच येत असतात.'' सत्‌शिष्यभावाच्या शोधात श्रीगुरु असतात. श्रीगुरुचा प्रेमभाव, ज्ञानदान कुशलता, पारमार्थिक ऐश्वर्य, आध्यात्मिक शक्ती आणि शिष्याच्या ठिकाणी विकसित होत जाणारा नित्य दृढतर होत जाणारा गुरुभाव याच्या संयोगामुळे सत्‌शिष्यस्वरूप अपत्याचे जीवन शतदल कमलासारखे पूर्णत्वाने उमलते, विकसित होते.

श्रीगुरुकृपाप्रसादाने मग-अनुष्ठान करताना, भगवत् नामस्मरण करताना, चिंतन करत असताना, ध्यानात, सेवाभावात अगर नित्य-नैमित्तिक कर्माचरणात, चित्त आनंदाच्या मैफिलीत रंगून जाते. स्वरूपसुखाच्या दरबारात, स्वानंदसुखाच्या मुलायम गालिच्यावर स्वसुखासनी विराजमान होऊन

सामरस्याचे अमृतपान अखंड घडत राहते.

मग सदा-सर्वत्र आनंद व चैतन्य यांचे वातावरण दुमदमून जाते. आनंदघनमूर्ती निजानंदाच्या उदयाने तम व जडता नष्ट होऊन द्वैतभावाची रात्र संपते. अद्वैत प्रकाशाने जीवनविश्व कोंदून जाते.

श्रीगुरुंनी कृपाप्रसादासहित केलेल्या नामानुग्रहाचा प्रसाद अखंड सेवन केला की शिष्य संजीवनसमाधीचा अनभिषिक्त सम्राट, स्वानंदसाम्राज्याचा सार्वभौम चक्रवर्ती होऊन जातो. मात्र त्यासाठी नामरसाचा पेला ओठापासून/ मुखापासून कधीच बाजूला सारुन चालणार नाही. द्वैत खपणार नाही; अशाने ज्योत निजज्योतीशी एकरुप होऊन अखंडत्त्वाने तेवते.

* * * *

# चिंतन २६

जीवनाच्या कोणत्याही शाखेत अभ्यास फार महत्त्वाचा. अभ्यासाचे अध्यात्म-क्षेत्रात, पारमार्थिक जीवनात तर अतिशय महत्त्व. अभ्यास म्हणजे पुन:पुन:, पुन:पुन: तीच गोष्ट करत राहाणं. कुठ वर ? तर आत्मसात होईपर्यंत !!! लहान मुल चालायला लागत तेव्हा त्या चालण्याचा, पाऊलापुढ पाऊल टाकण्याचा अभ्यास, लिहावयास, वाचावयास शिकताना क ला काना. का ? असा अभ्यास, या अभ्यासाने काय साध्य होत नाही ? "**अभ्यासाचेनि बळें। विष की आहारी पडे।।**" ही अभ्यासातील दिव्य शक्ती.

श्रीगुरु आपल्या आवडत्या, लाडक्या शिष्योत्तमाकडून जास्तीत जास्त अभ्यासाची अपेक्षा करतात आणि अशा हुशार, तल्लख बुद्धीच्या विद्यार्थ्याने अभ्यास बुडवला, मग कारण काही का असेना, श्रीसद्‌गुरुस खूप वाईट वाटते. होय ना ? छात्रगण अभ्यासाला प्रवृत्त व्हावा म्हणून स्वत: आपण शासन दंड भोगतात-अभ्यासाने आनंद प्रत्ययास/अनुभवास येतो. या अनुभवाचे पर्यावसान, आनंदकंद भगवंत भक्त हृदयात वास-निवास करतो. त्या मनोहर बालमुकुंद तेज:पुंजस्वरूपात भक्त तन्मय होतो. त्या परात्पर निरंजन सुवर्णतेजोमय स्वरूपांत भक्त परमशांती संपादन करतो. भक्ताचे अंत:करण एक आनंद सरोवरच होते.

हा आनंदच जीवनातील अमृततत्त्व आहे. ह्या आनंदाचा उदय झाला की मग त्या मनमोहनाचे हास्य चंद्रकिरणात, समुद्रावरील तरंगात, वृक्ष-लता-

पल्लवात, यमुनाजलप्रवाहात, इतकच काय पण आपल्या अंगावरील रोमरोमात परिपूर्ण भरले आहे असा अनुभव येतो. थोर सुकृताच्या प्रात:काळी तो नवनीतप्रिय नंदनंदन भक्तांच्या/गोपींच्या अंत:करणात रिघून चित्तरुप नवनीत चोरून खातो. हा भक्तिप्रेमभाव आहे. माधुर्यभक्ती आहे.

गोपीजनांना निर्मलबुद्धीरूप कार्तिक पौर्णिमेच्या पूर्ण चंद्रप्रकाशात ह्या महारसाचा लाभ होतो. भक्तिप्रेमाची पूर्ण पूर्तता, तृप्तता मग गोपी भक्तीच्या सौभाग्य ऐश्वर्यात अनुभवतात. भक्तिप्रेमसुखाचे अलंकार, प्रसाधन, पोशाख. या भक्तिप्रेमाच्या उन्मन स्थितीत व बुद्धीच्या तल्लीन, तन्मय अवस्थेत गोपीमानसमनरंजन कन्हैय्या, त्यांच्याबरोबर आत्मक्रीडा करतो.

बुद्धीरूप गोपी, आत्मस्वरुप गोविंदात स्थिरावली म्हणजे मग काय ? आनंदवर्षाव आणि आनंदानुभव.

भक्त भगवंतात तर भगवंत भक्तात रंगतो, रममाण होतो, विरुन जातो. मीठ समुद्रात पडले की सागर स्वरूप होते. भला मोठा सुवर्णगोळा समुद्रांत पडला तर थोडाच सागरस्वरूप होणार ? छे !!! त्याला फक्त जलसमाधी लाभेल. म्हणून आनंदात विरल्यावर स्वानंदसुख लाभते.

या आनंदोत्तम पुरुषाबरोबर भक्तिप्रेमाने जो आत्मक्रीडा करतो तो भक्त भगवंतालाही वंद्य ठरतो. परस्पर सुखसंवेदना हा या भक्त-भगवंताच्या भेटीतला मोठा लक्षणीय सुखद-परमसुखद आनंदानुभव आहे.

भगवंताच्या नामामृतात भक्त पूर्णपणे लीन झाला-विलीन झाला की प्रेमस्वरूप-परमप्रेमास्पद भगवंत, भक्तिगंगा तीरावर, भक्तिप्रेमामृताचे कुंभ घेऊन प्रकट होतो. भक्ताच्या हृदयातील उत्कटता अनुभवण्यास भगवंत येतो पण यांतसुद्धा कौटिल्य असू शकते. (बघा ना !!! तो रसेश्वर कुंजविहारी

महारासात दिसेनासा झाला, हेच कौटिल्य, कशाकरिता ? गोपींचा उत्कटभाव पाहण्यासाठीच). तो बघितला की परत प्रकटतो, पुन्हा लपतो-पुन्हा प्रकटतो. ही भगवत्लीला हेच भगवंताचे लीलाप्रेमभक्ती कौटिल्य.

हा आनंद आहे भक्तिप्रेमात आणि हे भक्तिप्रेम आनंदस्वरूप आहे. हा आनंदकंद भक्ताच्या हृदयांत निवासी झाला तर मग भक्ताचे हृदय भक्तिप्रेमाने भरून येते. आनंद उचंबळतो. आनंदाचा संचार सर्वांगात होतो. मग आनंदमोतीप्रेमाश्रू डोळ्यांतून सरसर ओघळतात. आनंदाश्रू, प्रेमाश्रूंचे जल, गंगौघापेक्षा कितितरी पटींनी जास्त पवित्र असते. असे प्रेमाश्रू डोळ्यात गोळा होण्यास भगवंताचे परमप्रेमच अंत:करणात ओतप्रोत असावे लागते आणि हे भक्तिप्रेम त्याच्या फक्त नामसंकीर्तनाने प्राप्त होते बरं !!!

* * * *

# चिंतन २७

आमच्या संतांची शिकवण माणुसकीची. ही माणुसकी भक्तिप्रेमाधिष्ठित. मनुष्यमात्राच्या हृदयात श्री पांडुरंगाची कोमल चरणकमले स्थापन करून त्यांचे मन निर्मल, विशाल, उत्तुंग करणं हाच आमचा भागवत धर्माचा कार्यक्रम. पण या कार्यासाठी बाळा, व्यक्तित्त्वावर तिलांजली द्यावी लागते बरं !!!

वृंदावनात यशोदामैय्या व गोपीजनांच्या नयन प्रांगणात मनमोहन अशा बाळस्वरूपांत ज्याने बालक्रीडा करून आपल्या दिव्यप्रेमशक्तीने गोकुळवासियांना, गोपीजनांना ‘‘**सदेह असून विदेही केले**’’ व ऐहिक नाते-गोते विसरावयास लावले तोच गोकुळचा राजा आमच्या संतांनी भावबळाने आकळला. त्याचबरोबर नभाहून वाड असणाऱ्या विठ्ठलाच्या विराटस्वरूपाशी एकरुप होण्याची कला ह्या मंडळींनी साध्य करून घेतली. गोपींच्या नयनात लपणारा, गोपाळांशी खेळणारा श्रीहरी आमच्या साधुसंतांनी हृदयमंदिरात साठविला व त्याच्याच तेज:पूंज प्रकाशात मनुष्यमात्राला भक्तिप्रेमभावाचा महामार्ग सांगितला. हाच भक्तिप्रेमभाव म्हणजे आमचा भागवतधर्म. अण्णा ह्या मार्गाचा एक अगदी पूर्वपथावरचा नविन वाटसरू.

व्यक्तीच्या अखंड जीवनाचा, अक्षय आनंदाचा व त्याचबरोबर निर्भयतेचा संदेश आणि त्याच्या द्वारा ब्रह्मपदी नाचण्या-गाण्याकरीता सगुणाची कास, सगुणाचे पूजन, सगुणाची सेवा, सगुणाचा साक्षात्कार, सगुण प्रेमलक्षणा भक्ती सांगणारा असा भागवतधर्म. हा धर्म आचरताना, प्रचार करताना, शिकवत असताना कोणी सिंहासनावर बसवले काय ? अगर उपेक्षा केली

काय ? मानल काय किंवा तुच्छ लेखल काय ? वंदन केले काय अगर लाथाडल काय ? दोन्ही सारखच.

वर्षानुवर्षे शुद्ध विचार, आचार, मनोजय, अहिंसा, सत्य, सुखदु:खाबद्दल बेफिकीरी, सर्वाभूती भगवद्भाव, निर्भयवृत्ती व भगवद्निष्ठाभाव यामुळे मन विकल्परहित होत. त्यात नामस्मरणात चित्त केंद्रित होत गेल्याने एका अननुभूत आनंदात काळ सरत असतो पहा. मग जगाच्या दृष्टीने पिसाट, आचरट, सामान्य, उपेक्षणिय, निंदास्पद ठरल तरी कुठं बिघडल. जगाकडून कांहिही प्रतिक्रिया झाली तरी मग एकच क्रिया अवघ्यांच्यावर दिव्यभक्तिप्रेमभावाचा वर्षाव. एकच भाव. **''ऐसी कळवळ्याची जाती। करी लाभाविण प्रीती।।''**

संत/श्रीगुरु आणि साधक सत्‌शिष्य यांचा संबंध कसा ? **''कां दीपासन्मुखु। ठेविलिया दीपकु। कोण कोणा अधिकु। कोण जाणे।।''** श्रीगुरुकृपाप्रसादाने साधकाच्या मनांत कृष्णप्रेमाची/भगवत्प्रेमाची कारंजी थुईथुई नाचू लागतात. भक्तिप्रेमाच्या पुष्पवेली अंत:करणाच्या बगीच्यात गगनावर जातात. त्यावर अत्यंतिक प्रेमाचा फुलोरा फुलतो.

मग या बगीच्यात भक्तजनप्रिय भगवंत हा त्या त्या भक्ताच्या अंतर्भावातून प्रगटतो. भक्तिप्रेमाच्या प्रार्थनेतून तो सगुण साकार होतो. नेत्रातील प्रेमाश्रुबिंदूतून हा बिंदूमाधव सुस्वरूप धारण करतो. गोपीमानसमनरंजन रमारमण, देहरूपी गोकुळात नामचिंतनाच्या अखंड धारा बरसू लागल्या की प्रगटतो.

मग त्याच्या हर्षद वेणूचे मधु-मधुर स्वर अकल्पित कानावर येतात. मन आनंदविभोर होते. भक्ताच्या हृदयसिंहासनावर हा आनंदकंद रसराज, रसेश्वर विराजमान होतो. आनंद तोच. भक्तिप्रेम, माधुरी तीच. चतुर्भुज-सहस्त्रभुज

तोच एक. त्याच्याशी भाषण-संभाषण, गुजगोष्टी. त्याला पहावयाचा, न्याहाळावयाचा, रुसायच त्याच्यावर, रागवायच त्याच्यावर, भांडायच झाल तर तेही त्याच्याशीच. असा आपल्या अवघ्या भाववृत्तीचा आश्रय-आलंबन तोच एक.

हाच एकविधभाव. ह्या एकविधभावातून सगुणाच दर्शन-स्पर्शन, अपरोक्ष-साक्षात्कार. एकाकारता, एकरसता ह्यातूनच मुळी आनंदाश्रू-प्रेमाश्रू भक्तिसौभाग्यातून प्रगटतात, धार धरतात. ह्या भावाश्रुजलांनीच त्याची कुंकुमाची पाऊले प्रक्षाळावयाची. होय की नाही ?

* * * *




चुकलेल्या बाळाची पुन: कधी भेट होईल, त्याला कधी एकदा डोळे भरून पाहीन, त्याला कधी पदराखाली घेईन, अशी मातेच्या मनाला हुरहुर लागते, नाही का?

अंत:करणात परमशांती वसण, हाच भगवंताचा प्रसाद. फाडकन् उत्तर देणाऱ्याला माणस तेजस्वी म्हणतात. पण ते तेज नव्हे. तर सहन करणारी व्यक्ती अधिक तेजस्वी असते, त्याला आचार्य तितीक्षा म्हणतात.

**सहजं सर्वदु:खानाम् अप्रतीकारपूर्वकम् ।**

**चिंता विलापरहितं सा तितिक्षा निबोधते ।।**

पण सहन करणं म्हणजे भेंड्याची भाजीपण नव्हे. सरळ गोड शब्दांत सत्‌तत्व पटवून देण्यासाठी बोलक पाहिजेच.

सगळ्यात असून नसल्यासारख राहण हे श्रीज्ञानराजांनी छान शिकवल आहे पहा. ते म्हणतात, या सगळ्या कुटुंबात (विश्व) असून त्याच्या पलिकड असणाऱ्या विश्वात्मकाशी नात जोडा. कस? तर त्यांनी **'केळवली नोवरी'** चं एक उदाहरण दिलय. म्हणजे जिच लग्न ठरलय आणि साखरपुडापण झालाय, केळवण चालू आहेत. ती माहेरीच राहात असते, पण तरीही 'तिने सासरचा संबंध, विशेष ओढीने जोडलेला असतो. तसा जीवान भगवंताशी, आनंदकंदाशी संबंध जोडावा.

आपली भक्ती ही सजीव असावी. सजीव भक्ती म्हणजे तरी काय? तर आनंदकंद भगवंताच, श्रीगुरूंच अस्तित्व सर्वत्र सदोदित आहे ही उत्कट

भावना. हीच उत्कट अनुभूती. ह्यासाठी काय कराव? तर मन भगवंताला/ श्रीगुरूंना देऊन टाकाव. मग तो निरंतर आपल्या समीप आहे, आपण त्याच्या लगत आहोत हे अनुभवतोय. ही भावतन्मयता असताना त्याच्याबरोबर कठोर आत्मपरीक्षण. तुकोबाराय अस आत्मपरीक्षण करीत वाटेने जात असतांना काही पक्षी ते जवळ येताच उडून गेले. हे पाहिल्यावर त्यांना खूप वाईट वाटल, आणि आपल्याला बघून पक्षी उडून गेले, म्हणजे ज्याला निर्वैरता म्हणतात ती अजून आपल्यात आलेली नाही असे त्यांना वाटले.

महाराज म्हणतात, सगळी भूतमात्रं मला परामेश्वरासमान कधी अनुभवता येतील? जेव्हां अस होईल तेव्हांच माझ्यावर पांडुरंगाची कृपा झाली अस म्हणेन. ही समदृष्टी, हा भागवत धर्म. ‘‘**तुका म्हणे जे जे भेटे। ते ते वाटे मी ऐसे।।**’’ हे अद्वैत तत्वज्ञान. ज्ञानोबारायांनी विश्वाच्या आर्ततेने, विश्वात्मकाजवळ पसायदान मागितले, ‘‘**भूता परस्परे पडो। मैत्र जीवाचें।।**’’

मग आपण तरी यापेक्षा दुसर काय कराव? तर त्याची प्रार्थना करावी की ‘‘भगवंता, अवघ्याच्यातला राम आणि आपल्यातला, माझ्यातला आत्माराम एकच आहे. हा अनुभव सगळ्यांना दे. म्हणजे मग विश्वबंधुत्व, विश्वप्रेम या शब्दातील प्रत्यक्ष जीवन साक्षात्कार सगळ्यांना प्राप्त होईल रे.’’

आणि हा जीवन-साक्षात्कार ‘‘मी’’ अहंकार गेल्याशिवाय घेण कालत्रयी अशक्य. मीमुळे, अहंकारामुळे बेडकाला जसा डबकच काय तो समुद्र वाटतो. खऱ्या समुद्राची तो कल्पनाच करत नाही, त्याला ती पेलत नाही. तसंच अहंकारी जीवाच. आसुरी संपत्तीच्या लक्षणात भगवंतांनी फार छान वर्णन केलय. अवघ्यांचा आनंद, पाहाण, त्याला सहभागी होऊन ‘‘**आनंद भरीन तिन्ही लोक**’’ हाच वैष्णवधर्म.

समोरच्याचा आनंद पाहून जर आपला आनंद विरघळत असेल तर ती संस्कृती नाही, पण प्रकृतिही नाही तर विकृतीच.

आवघ्यांच्या आनंदात आनंद हे केव्हा तर ''**भरला घनदाट हरि दिसे।**'' या बोधानंतर आणि हा बोध अंतरी उमलण्याचे साधन भगवंताचे अमृताहून गोड नाम. आपण इतक नाम घ्याव, इतक नाम घ्याव की सगळ्यांच्या ठिकाणी हा आत्मभाव, आत्मप्रेमस्वरूप सूर्य उदयास येऊन, जनी अवघा भक्तीप्रेमप्रकाशच प्रकाश दाटेल.

* * * *



# चिंतन २९

मानवाच्या सर्व प्रेरणा, त्याच्या मायेच्या कमी अधिक आवरणातून होणारे, त्याच्या सच्चिदानंदस्वरूपाचे अविष्कारच आहेत. स्वरूपदर्शनाच्या आनंदात मन, बुद्धी यांचा एवढच काय तर संपूर्ण देहभावाचाच लय होतो; एका आत्मानंदात. या अद्वैतानंदात, कर्म, उपासना, ज्ञान, वैराग्य, सर्वच अगदी एकरूप होतात. ह्या एकभावातच भक्ती फुलते.

यासाठी संतांनी सांगितलेले आपल्या परमहितासाठी केलेले, नामसाधन, निष्ठेने, निश्चयाने व कष्टाने करणे हीच खरी खरी श्रीगुरूंची उपासना आहे. श्रीगुरूंच्याविषयी, प्रेमादर, अनन्यता, शरणागती, हा भाव वाढवण्यासाठी त्यांची सेवा अवश्य आहे, पण त्यांच्या शिकवणीचा आत्मा जे नामस्मरण ते मागे पडता कामा नये.

नामाचे प्रेम वाटण्यासाठी सत्संगतीची, श्रीगुरूसंगतीची अत्यंत निकड आहे. त्यामुळे पारमार्थिक जीवनाखेरीज इतर सर्व नीरस वाटू लागते. पारमार्थिक प्रगतीबरोबर, इतर गोष्टीत रस वाटेनासा झाल्यावर सत्संगविरहित, श्रगुरूविरहित एकटेपणा वाटणे, हे अगदी साहजीकच. खूप गर्दी/माणसे भोवताली असली तरीही नामधारक एकटाच असतो. संगती कशाला म्हणतात? समान आवड असेल ती संगती. परमार्थात खरा रस असणाऱ्याची / घेणाऱ्याची संगती ही सत्संगती. पण ही किती दुर्मिळ आहे? भाग्यवंतालाच लाभते नाही का?

नाम घेताना, साधनकालात, अनेक प्रसंग, अनेक वार्ता, घडतात! कानी

येतात! त्याने मन मग प्रक्षुब्ध होण्याचा संभव. पण जगाच्या या स्वाभाविक भयंकर प्रवाहापुढे आपण दुसरे काय करणार? नाम घेत रहावयाचे. नामस्मरण करणे हे एकच बाह्यस्थिती निरपेक्ष साधन आहे. तेच उत्तम. तेच करावे. त्यातच अवघ्या विश्वाचे भले आहे; ही श्रद्धा दृढतरत्तम व्हावी पहा.

नामस्मरण होत असताना, इतर विचार सुरूच असतात, नाही का? नामाबरोबर नाद-रूप यांच्या अनुसंधानाने ते कमी कमी होतात. ते विचार शुद्ध, सात्विक, भक्तीप्रेरक होतात. ते जितके जास्त शुद्ध सात्विक तितके तितके अधिकाधीक उपकारक व उपयुक्त.

ते विचार तरी का येतात तर मागील संस्कारांनी येतात. आपण काही प्रयत्नपूर्वक ते आणीत नाही पण असे विचार येत असतानाही आपला प्रयत्न मुख्यत: नामाकडे असावयास हवा. या सात्विक गोष्टींच्या विचारांचे नामाबरोबर मधून मधून सहज चिंतन केले तर मग विचारांचे स्वरूपच बदलते व नामस्मरणाची गुणवत्ता (संख्या नव्हे) वाढते. भगवंत किंवा श्रीसद्गुरू हे शब्द सहज मनात आणावेत त्याचा फार फार उपयोग होतो. भगवंत/ श्रीसद्गुरू हा शब्द मनाशी उच्चारताच, चित्तात त्यांची आठवण, स्मरण होताच; अंतरंगी त्यांच सान्निध्य अनुभवताच कल्पनांच्या संलग्नतेच्या नियमानुसार सात्विक भाव-भक्ती-प्रेम उदय पावते. हा अत्यंत उच्चकोटीचा भावबंध नामस्मरणाला अतिशय पोषक असतो हं!

नामस्मरणाला बसण्यापूर्वी काही थोडे चिंतनपूर्वक वाचन करावे. भगवंताच्या सगुण मनोहारी रूपाकडे, श्रीसद्गुरूंच्या स्वरूपाकडे थोडा वेळ लक्षपूर्वक टक लावून, डोळे भरून पाहावे, तर सात्विक विचार मनात येण्याचे कार्य मोठे सुलभ होते. सामुदायिक नामस्मरणाच्यावेळी अभंग म्हणावे, ज्ञानेश्वरी, गाथा, भागवत, दासबोध थोडेसे मननपूर्वक वाचणे, ह्यांचे

महत्व फार आहे.

ह्या सर्व गोष्टींतून भक्ती प्रेम भावाची / सात्विक प्रेमभावाची भावनांची चित्ताला सवय लागते. Habit is character अर्थात Habit is Life अशी नामाची सवय लागण्याला नामाची ''आवृत्ती'', सातत्य, अभ्यास अखंडपणा या गोष्टींची आवश्यकता आहे.

शेवटी काय तर उत्कृष्ट सवय म्हणजे ''नाम - नाम आणि फक्त नाम'' करून आनंदस्वरूप होणे, आनंदाची सवय जडवून घेणे, आनंदस्वरूप होऊनही पुन: आनंदाने, आनंदात, नामानंद भोगणे. हीच नामसाधना, हेच साध्य.

ज्ञानोबाराय सांगतात ''**ऐसे वाढतेनि प्रेमे । माते भजती ते महात्मे । परी दुजेपण मनोधर्मे । शिवतले नाही ।।**'' (ज्ञा. अ. ९ - ओ. १८५) अशा नामस्मरणाने आत्मारामात-आनंदात लपावे. या अनंदस्वरूपात लपण्यानेच आत्मसाक्षात्काराच्या आनंदातच जीवभावाचा, अहंचा लय होतो आणि भक्तिप्रेमानंद चंद्रकलेसारखा वाढू लागतो.

* * * *

# चिंतन ३०

जीवनात जिंकायची गोष्ट एकच, ''आत्मज्ञान!'' येथे जिंकणे याचा अर्थ लक्षणेने, मिळवणे, प्राप्त करून घेणे असा आहे, जिंकण्यासाठी लढणं हा संतांचा सांगावा नाही, तर तत्त्वासाठी लढण हा त्यांचा निरोप आहे; आग्रह आहे. तत्वासाठी लढतांना जरी पराजय झाला तरी त्या पराजयातसुद्धा थोर विजय आहे, तत्वाचा, व्यक्तीचा नव्हे बरं!!! हरलो अथवा जिंकलो असे वाटते, तो पर्यन्त आपला परमार्थ थांबला असेच समजावे.

नामस्मरण करू लागल्यावर, जगाचा व आपला संबंध किती? व काय हे कळू लागते. कळता कळता आपल्या लोकेषणेवर त्याचा परिणाम होतो. हेच वैराग्य. समाजावरील, स्वजनावरील मोह कमी होऊन प्रेम नामावर व गुरूवर/कडे वळते. समाजाविषयी व स्वजनाविषयी कर्तव्यबुद्धी उरते. ती उरणे योग्य असते. श्रीसद्गुरू व नामावरील भाव-भक्तीप्रेम जसे वाढेल, तसे समाधान वाढते, श्रद्धा वाढते व साधन पण वाढते.

जीवन आनंदाने, आनंदात जगण्यासाठी आहे. आत असलेल्या आत्मारामाला बाहेर, सर्वत्र अतिदूर पाहण्यासाठी, अनुभवण्यासाठी आहे. हा आत्मानंद अनुभवण्यासाठी जीवन आहे. हा आनंद हेच देवाचे स्वरूप आहे.

हा आनंद, ब्रह्मरस अनंत आहे. ह्यो आनंदानुभवात जशी तृप्ती आहे तशीच अतृप्ती आहे. त्यात भूक आहे व भोजनही आहे. भगवंत हा अनंत आहे. त्यामुळे त्याचे सर्व काही अनंतच. म्हणून हा आनंद अनुभवण्याची वृत्ती शेवटच्या श्वासापर्यन्त कायम राखली पाहिजे!!! हेच पारमार्थिक जीवन. हीच

पारमार्थिकवृत्ती. हीच पारमार्थिक भूक. अमृतरसाचा स्वाद किती घेतला तरी, मन तृप्त होत नाही. आणखी पाहिजे, आणखी पाहिजे असेच वाटते. या आत्मानंदामृताच्या भोजनाने आत्मा तृप्त होतो आणि तृप्तित पुन: अतृप्ती अशी मौज आहे.

नाम हे ब्रह्मबीज आहे. श्रीसद्गुरूंची ब्रह्मशक्ती त्यांनी दिलेल्या नामात उतरलेली असते. हीच शक्ती श्रीसद्गुरूंच्याकडून शिष्याच्या (ज्याला प्रसादअनुग्रहपूर्वक नाम दिले आहे त्याच्या) आत्मशक्तीला जोडली जाते. त्यामुळे हळू हळू शिष्याची जाणीव सद्गुरूंच्या शुद्ध जाणीवेशी तादात्म्य पावते. या वृतीने धणीलाच (म्हणजे देहाहंकाराला) उडवून देण्याची सुरूवात होते. त्यामुळे श्रीगुरूंचा सहवास, संगत, सान्निध्य स्पर्श सूक्ष्मत्वातून अनुभवास यावयास लागतो.

या नामानेच आनंदस्वरूप; परमप्रेमास्पद, परमप्रिय भगवंताच्या स्मरणाने बुद्धी ब्रह्मरूपात परिणत होते. नंतर अनुभावस्थितीत तोच आनंदरूपाने 'प्रकटतो. नामधारकाला "**मानसप्रत्यक्षाचे**" अनुभव येतात.

हा आनंदस्वरूप श्रीकृष्ण देहस्वरूप गोकुळात प्रकट झाला की सर्व तळमळ, चिंता, भय संपते. "**चिंता ते पळाली, गोकुळाबाहेरी । प्रवेश भितरी केला देवे ।।**" अशी श्रीतुकाराम महाराजांची ग्वाही आहे. मग गोकुळात नवविधाभक्तीस्वरूप गोपिका "**भगवद्गुण-लीला-स्वरूप-नाम**" संकीर्तनाचा गजर करत आनंदाने नृत्य करू लागतात.

हा भक्तिप्रेमभाव दिव्य आहे. त्यात त्याग, माधुर्य, शौर्य, वीर्य असे तेजस्वी गुण आहेत. या भक्तिप्रेमामुळेच चैतन्येश्वर भगवान् श्रीकृष्ण माझे हृदयात व सर्वत्र आहे, तसेच सर्व लीला करत आहे, तोच सर्वांना खेळवीत आहे. हा अनुभव रोमारोमात, सर्व दृष्यात, दृष्यपदार्थात प्रत्ययाला येतो. याच

भक्तिप्रेमभावात आर्द्रता उत्पन्न झाली की अष्टसात्विक भावातील रोमांच उभे राहतात. यातूनच कधी-कधी वियोगस्वरूप उष्णाभाव भक्तशरीरावर प्रकट होतात. "हे वैकुंठनाथा! तू आम्हास देहभावरूपी अरण्यात सोडून का बरे अंतर्धान पावलास??? हे वृंदावनविहारी, मनरंजना, मोहना!!! लवकर, लवकर ये व भेट दे" हा भाव प्रार्थनेतून, व्याकूळतेतून प्रकट होतो.

तो प्रभू धावत येतो. दर्शन देतो! भेटतो!! बोलतो!!! ही भेट, हा प्रभूस्पर्श, हा सुखसंवाद हे भक्ताचे अमृतमधुर सौभाग्य आहे. मग दर्शन स्पर्शन मात्रे, नेत्र प्रेमानंदाश्रुंनी पाझरतात. या आनंदप्रतितीत जीवनाचे साफल्य आहे. मनोल्हास आहे. स्वानंदचक्रवर्ती आनंदकंद नंदनदन हृदयरूपी वृंदावनात प्रकट झाल्यावर केवळ-आनंदाचाच साक्षात्कार असतो आणि या आनंदसाक्षात्कारातही नामरूप असतेच.

* * * *

# चिंतन ३१

नवबागेत नाम/स्मरण झालं. अगदी खूप-खूप रोज दोन प्रवचन सेवा. पुण्यस्मरणाचे दिवशी तर खूप काही चिंतन-मनन झाल. स्मरण-आठव निदिध्यास. त्या दयाघन परमकृपावंत पांडुरंगाची कृपा.

भगवंताचा वरप्रसाद हा भक्तिप्रेमानुग्रह स्वरूपात भक्तांच्या ठायी दृष्टोत्पत्तीस येतो, हे भगवंताचे सगुण-लीला ऐश्वर्यच आहे बरं !!! द्रौपदीचे संतप्त हृदय प्रभूने आपल्या कृपामृताचे सिंचन करून शांत केले. अर्जुन आणि उद्धव यांच्यावर कृपा करणारा भक्तवत्सल भगवंत भक्तजनांवर आपल्या वरप्रसादस्वरूपी कृपामृताचा जणू काही वर्षाव करतो. अगदी संततधार. त्याचे दिव्यत्व नित्य व सर्वत्र आहे.

मात्र जीवाला भगवद्विषयक तळमळ मात्र पाहिजे बर का ! अशा तळमळीतून कोणत्याही सगुण-स्वरूपात तोच प्रकट होतो; असा प्रत्यक्ष अनुभव स्वसंवेद्य स्वरूपात भक्ताच्या ठिकाणी नांदत असतो. खरं की नाही?? तर होय बाळ; अगदी खरं!!!

अंतःकरणांतील स्फूर्ती-चित्कला जागृत होऊन, सुगंधाच्या नंदनवनात, तर कधी चैत्रबनात-मधुवनांत, आमोदवनात, विश्वकांत, श्यामसुंदर आपल्या सन्निध आहे हा अनुभव येतो/असतो. अगदी चेतन स्वरूपात हं. जड नव्हे. शोधण्याची वृत्ती त्याच्या प्रत्यक्ष सहवासामुळे/अनुभूतीमूळे शांत होते आणि मग काय? तर भगवंत हा अनुमानाचा विषय न राहता प्रत्यक्ष अनुभूतीत येतो. या अनुभवात त्याच्याबरोबर लीला, विहार-सुखसंवाद-गुजगोष्टी असे व्यवहार होतात. कधी मुरलीधर बन्सीचे वेणूगीत ऐकू येते; कधी तो आपला मार्गदर्शक म्हणून येतो.

या परम भावावस्थेत मग भक्त विहार करत असतो. भक्तिप्रेमाची

पराकोटी मग उन्मनी अवस्थेत परिणत होते. सगळेच द्वंद्व (म्हणजे शीत-उष्ण, खारट-अळणी वगैरे) लयाला जातात.

भगवंत हा भक्तांच्या प्रेमाकरिता धाव घेतो. सगळी सृष्टिच त्याला प्रिय आहे. इतकच काय? तर ती त्याचे स्वरूपच आहे. परंतु भक्त (निजभक्त-नामधारक) हे त्याच्या अनुग्रह सृष्टीतील, त्याचे अत्यंत लाडके. परमप्रिय प्रियात्मे आहेत. किती प्रिय आहेत हे सांगताना भगवान् श्रीकृष्ण परमात्मा अर्जुनास सांगतोय **''बाबा, तया मी अंत:करण बैसो घाली ।''** का नाही असणार नं??? भगवंताकरता ज्याचे नेत्र तहानलेले आहेत, त्याच्या दर्शनाची ज्यांना लालसा आहे, ज्यांचे हृदय धावत आहे. **''पुनः प्रसन्नेन मुखेंदूतेजसा.''** भक्तचित्तचकोरचंद्राचा मुखचंद्रमा पुनः पुनः पहावा अशी उत्कट इच्छा आहे, मग तो का बरे लपून राहील थोडाच??? नाही-नाही. तो प्रकटतो, कधी खांबातून, कधी वस्त्ररूपाने, तर कधी उद्धवासारख्या भक्तांबरोबर संदेशस्वरूपात. तर कधी आपल्या श्रीगुरूंच्या स्वरूपात. त्याच्या प्रकटस्वरूपाची किती गणती करावी? हा आनंदकंद, नंदनंदन त्याचे लीलावैचित्र्य अगाध आहे. मनात व प्राणात तर तो आपल्या आहेच. पण कित्येकदा जड अशा इंद्रियात सुद्धा तो प्रकटतो. कधी तर तो आपल्या नेत्राच्या पाळण्यातच विराजमान होतो. आता नेत्रातच लपल्यावर मग काय? सर्वत्र तोच.

विरोधी भक्तांना जर तो सद्‌गती देतो मग सतत त्याचचं ध्यान-चिंतन-आठव-स्मरण असणाऱ्या भक्तजनांना तो मागेपुढे उभा राहून, त्यांच्याबरोबरचा त्यांचा लाडका खेळगडी होऊन त्यांचा जीवनखेळ/क्रीडा आनंदात पार पाडील यात नवल ते काय? तो भक्तांबरोबर आट्यापाट्या, खो-खो, लंगडी, शिवा-शिवी, लपंडाव, सगळ खेळतो. आपण त्याचे खेळगडी मात्र झाल पाहिजे. त्याच्याशी खेळण्याचा भाग्योदय त्याच्या नामस्मरणाने होतो.

* * * *

# चिंतन ३२

कितीही मोठा आत्मसाक्षात्कारी महात्मा असला तरी त्याचे अंत:करण म्हणजे काही काळा पाषाण नसतो; उलट ते अतिशय मृदू नवनीतासारखे असते. त्यात विकाराला तिळमात्र जागा नसते. पण आत्मविचाराने ते खूप खूप तरल संवेदनाशील आणि भक्तिप्रेमभावाने रसरसलेले असते. खूपच भावमाधुर्याने कोमल झालेले असते.

त्यामुळे निरोप घेताना/देताना, त्याला द्रवीभूतता येतेच पहा. **''बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट''** अशी जिथे श्रीनिवृत्तिनाथासारख्यांची अवस्था, मग आपण तर अगदीच सामान्य ना? सर्वत्र एकच सच्चिदानंद परमात्माच ओतप्रत भरला आहे; तरी ज्याची उपाधी जितकी शुद्ध, पवित्र, पारदर्शक, तितक्या प्रमाणात तेथील आत्मतत्वाची, विशेषत्वाची जाणिव होते, नाही का?

सांजवेळेस रानातून चरून येणाऱ्या गायींना भेटण्यासाठी त्यांच्या वत्सांची जशी लगबग होते, तशीच तळमळ, उत्कट भक्तिप्रेमाने भगवंतास कडकडून केव्हां भेटता येईल, तो केव्हां दर्शन देईल, अशी तीव्र तळमळ भक्ताच्या ठिकाणी असते. **'यन्मनसा न मनुते'** असा हा मनाला, नेत्रांना न सापडणारा भगवंत, वृत्तिच श्रीकृष्णमय/भगवतरूप झाल्या की, प्रकट होतो. मग त्याला लपून, अंतरावर, लांब राहताच येत नाही; आपल्या भक्तांपासून. हे भगवंत आणि भक्त यांच्या भेटीतील माधुर्य तदाकार-तादात्म्य वृत्तीचे व निर्मळ बुद्धीचे आहे.

हा आनंदचैतन्यघन नंदनदन, यदुकुलभूषण केवळ भक्तिप्रेमाने म्हणजे

त्याच्या ठायी निश्चल झालेल्या एकाग्रतेने (म्हणजेच मनोविकास सामर्थ्याने) आत्मसात् होतो. मग भक्त आणि भगवंत हे द्वैतच राहात नाही. "**अवघे साखरेचे अंग । नोहे व्यंग निवडिता ।।**" असे शुद्ध अद्वैत. सर्वांगसुंदर असे आत्मचैतन्य हेच ब्रह्मचैतन्य अशी एकता, अनुभवास येते. त्यात एकात्मतेचे, ऐक्याचे अनुभव "**एकान्त भक्ति गोविंदे ।**" या भाग्यात प्रकट होतात.

भक्त हे नेहमीच गंगौघाप्रमाणे समुद्र-गंगाजळावत्-स्वस्वरूपाशी-परमेश्वराशी अखंडत्वाने संलग्नच असतात. भक्तिप्रेमहर्षकाळी चित्ताच्या द्रवीभूत झालेल्या अवस्थेत तो बन्सीवाला, नंदाचा अलबेला, मनमोहन, चित्तचकोरचंद्र जो का एकदा भक्तहृदयात प्रकटतो; तो तेथे कायमचाच स्थित होतो. त्याच्या चित्तात घर करून राहतो.

मग क्रमाक्रमाने कशाला? भक्ताला भावसाक्षात्कार, भक्तिप्रेमसाक्षात्कार, स्वप्नसाक्षात्कार, सगुणसाक्षात्कार प्रसंग वारंवार अनुभवास येतात.

भक्तिरसाचा स्थायीभाव भक्ती. त्यात पूर्णानंद, आणि भक्तिप्रेमरसाचीच लयलूट. रसरूप मृदूचित्त, द्रुतचित्त हेच नवनीत!!! भगवंतास अति प्रिय असते. भक्ताचे हृदय हे जणू भक्तिप्रेमाचे रत्नभांडारच आहे. रत्नकांत लक्ष्मीपती हा त्या अशा भक्तांचा परमप्रेमास्पद, परमप्रिय भक्तिप्रेमात्मा आहे. भक्तहृदयातून प्रकट होणारे नामकीर्तन हे भगवंताच्या मुरलीरवाप्रमाणेच, भगवंतालाच मुग्ध करणारे आहे.

* * * *

# चिंतन ३३

कालपासून मुसळधार पाऊस कोसळत आहे. आज नवा आठवडा, नवा महिना, नविन वर्ष, इतकंच काय पण शतकपण नविनच; नविन आणि जुने या कल्पनाच किती सापेक्ष आहेत नाही का? नविन काहीच नसतं. आहे ते सनातन, शाश्वत परब्रह्म. "**म्हणोनि जाणतेने गुरू भजिजे**" (ज्ञा. अ. १ ओ. २५) ही ओवी चिंतनासाठी घेतली आहे.

प्रेमाला भक्तीचे खाद्य हवे; मग त्यातून भक्तिप्रेमाची पुष्टी येते. या परमप्रेमास्पदाचे गोपींना सतत ध्यान. त्यामुळे त्यांच्या जीवनांत नवचैतन्य, नवप्रकाश यांची प्रभा पसरली. गोपीमानसमनरंजनाचा अमृतकार त्यांना नित्यप्राप्त झाला. नंदाच्या वाड्यातील बाळरूप गोपींकरता अनंत रूपांनी लीला करू लागले. गोपींच्या डेऱ्यातील नवनीत त्यांने खाल्ले. त्यांना परमानंद दिला. पण येवढीच लीला करून जर तो थांबता, तर तो कसला लीलापुरुषोत्तम? त्याने भक्तिप्रेमनवनीत जेथे तयार व्हावयाचे तो गोपींच्या अंत:करणाचा डेराच हरण केला. त्यामुळे गोपींचे अंत:करण निर्मळ आणि दिव्य झाले. म्हणूनच मग तो वृंदावनविहारी शरद पौर्णिमेच्या आल्हाददायक निशीसमयी **पूर्णानंद** स्वरूपाने प्रगटला. त्यांच्या (म्हणजे गोपींच्या) कारणदेहांत प्रत्यक्षत्वाने प्रकट झाला. गोपींना महारसाचा (रासक्रीडेचा) महानंद लाभला. गोपीजनांच्या मनोवृत्ती विशाल अशा कृष्णचैतन्यांत विराम पावल्या.

या प्रेमभक्तीमध्ये मग गोपींनीसुद्धा भक्तिप्रेमविजयाच्या वैजयंतीमाळा

धारण केल्या. भक्तिप्रेममाधुर्याचेच सुवर्णालंकार (कंकणे, नूपुर, कंबरपट्टे, वाकी, वेळा, मुदी, नाग, चंद्रहार, गोंडफुले, ठुशी, टिका-साज आणि कितीतरी) त्या अलंकृत झाल्या.

भक्तिप्रेमानंदाचा सौंदर्यभाव व भक्तिप्रेमाचा **आनंदसुखसोहळा** या योगयोगेश्वराच्या कृपाप्रसादात आहे. श्रीकृष्णमय झाल्या त्या गोपी. वृत्तींचे आत्मारामाला भेटणं, म्हणजेच आत्मपदी आत्मार्पण म्हणजेच **स्वात्मसमर्पण.**

श्रीकृष्णस्मरणात/भगवत्स्मरणात/श्रीगुरूस्मरणात लीन झाल्यानेच त्या गोपी धृतिसंपन्न, आनंदसंपन्न झाल्या. भक्तिप्रेमाच्या वैभवाने ऐश्वर्यसंपन्न झाल्या. धन्य त्या गोपी. धन्य ते वृंदावन, धन्य ती यमुना, धन्य ते गोकुळ, ते गोप, गायी, वासरे धन्य!!! धन्य!!! धन्य!!!

* * * *




सर्व प्राणीमात्राला सुख हवे. दु:ख कोणालाच नको. परंतु आपणा सर्वांना खरे शाश्वत सुख काय आहे त्याचा पत्ताच नाही. या जगात प्रत्येकाच्या सुखाच्या कल्पना वेगवेगळ्या आणि असंख्य आहेत. सुख सगळ्यांनाच हवे असले तरी प्रत्यक्षात सुखी लोकांची संख्या फारच थोडी ना??? अगदी **''अनामिका सार्थवती बभुव।''**

आणि याच कारण काय असेल? तर, फारच थोड्या जाणकारांना खऱ्या शाश्वत सुखाचा ठेवा हा क्षणभंगुर वस्तूंच्या पलीकडेच आहे, याची जाण आहे. या नित्य सुखाबाबत आपल्या सगळ्या वेद, शास्त्र, पुराणांनी, संतांनी, अकारादी, प्रकरणादी ग्रंथांनी खूपच छान विचार केला आहे आणि नुसता विचारच नाही तर ते सुख मिळवण्याचा उपाय सुद्धा सांगितला आहे. श्रीतुकोबारायांनी या सगळ्याचे सार एकाच सूत्रांत सांगितले आहे की **''आपुला तो एक देव करूनि घ्यावा। तेणेंविण जीवा सुख नोहे।।''**

आपण ज्याला सुख-सुख म्हणून कवटाळतो, ते सुख इंद्रियांमार्फत जाणता येते. **''विषय आणि इंद्रिया। मेळ होता धनंजया। जे सुख जाय थडिया। सांडोनि दोन्ही।।''** हे सुख इंद्रियांशिवाय अनुभवता येत नाही. पण खरीखरी सुखरूपता ही **''इंद्रियाते चोरोनि जेवी। तयासिच फावे।।''**

एखादा दगड, सुखदु:खाची जाणीव उपभोगू शकत नाही. कां तर त्या दगडाच्या ठिकाणी चेतना/भावना ही अत्यंत अप्रगत स्तरावर आहे. चेतना/भावना जितकी प्रगत तितकी सुख-दु:खाची जाणीव पण अधिकाधिक प्रगत.

दगडापेक्षा झाडा-झुडपांची, वृक्षांची चेतना-भावना जास्त, परंतु ती काही पूर्णत्वाने विकसित झालेली नाही. सर्वात विकसित चेतना-भावना ही एका फक्त मानवाच्या ठिकाणी. म्हणजेच काय तर सारांश हाच की, प्रत्येक जीव सुखाची अगर दुःखाची कल्पना त्याच्या ठिकाणी असणाऱ्या चेतना-भावनेच्या विकासानुसार करत असतो.

आता हेच बघा नां!!! आपण जर एखाद्या वृक्षाला विचारले "काय रे बाबा, तू या ऊन-पाऊस-थंडी-वाऱ्यात सुखी आहेस का?" तर तो वृक्ष म्हणेल "हो या सगळ्या वातावरणात मी फारच सुखी आहे." हे सुख वृक्षाच्यासाठी चांगले नित्य असेल, पण माणसाचा विचार केला, तर कोणता माणूस या सगळ्यात सतत उभ रहाण्याला सुख म्हणेल? मूर्ख-मंदबुद्धिचा माणूस सुद्धा याला सुख म्हणणार नाही; मग शहाणा-बुद्धिमान माणूस कसा बर म्हणेल सांगा ना!!!

एखादा पशू, दुसऱ्या एखाद्या पशूची कत्तल होत असतांना, स्वत: मात्र आपल्यासमोरील गवताचा आस्वाद घेत राहील. कारण यानंतर आपलीपण हीच गत होणार आहे याची त्याला जाणीव नाही. माणसाची जाणीव या पशूंपेक्षा विकसित आहे खरी पण, समर्थ म्हणतात तस "**मरे एक त्याचा दुजा शोक वाहे। अकस्मात तोही पुढे जात आहे।।**" अशीच तऱ्हा. आता माणूस काय करतो पहा-तर "मला मरण येणार नाही" यासाठी खूप प्रयत्न, धडपड करतो. पण इतके करून मरावे हे लागतेच हा भाग वेगळा.

भगवंतानी अर्जुनाला नित्य, निरामय, शाश्वत,आत्यंतिक सुखाची उकल करून सांगितली.

"**सुखमात्यन्तिक यत्द्बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम्।**

**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्वत:।।**"

सुख हे अतिन्द्रियच काय पण मनाची नखीसुद्धा न सोसणार अस आहे. आणि एकदा का अनुभवास आलेल्या अमर्याद दिव्य सुखाची अनुभूती आली की मनुष्य त्या सुखरूपतेन कायमचा स्थित होतो. तो त्या सुखरूपतेपासून कधीच ढळत नाही.

ही सुखरूपता जी आहे, ती कोणत्या जड-दृष्य-देश-काल-वस्तूंचा स्वभाव नाही, तर ती आत्मारामाची स्वरूपता आहे. सुख हा आत्मारामाचा गुण नाही, तर तो त्याचा स्वभाव आहे. गुण हे आगमापायी असतात. आज आहेत, उद्या असतीलच अस नाही, पण स्वभाव/स्वरूप. प्रकाश हा सूर्याचा गुण नाही तर ते त्याचे स्वरूप आहे. प्रकाश आणि सूर्य दोन नाहीत, तर एकच आहेत. तसाच आत्माराम आणि सुखरूपता यात भेद नाही. दोनपण नाही, एकच एक आहेत. तसाच जीव हा शिवस्वरूप आहे.

सारांश काय म्हणाल तर आपण सगळेजण एका आत्मारामाची लेकरं आहोत. आत्माराम सुखस्वरूप आहे. म्हणजे आपण सगळे सुखस्वरूपच आहोत नाही का? ही आपली स्वयंभू-सुखस्वरूपता अनुभवाला येण्याचे कलीयुगातील साधन म्हणजे ‘‘**सुखरूपच असणारे भगवंताचे नाम.**’’

* * * *




मनाचे अंत:प्रवाह बलवत्तर भक्तिप्रेमवृत्तीचे असले तर भावदर्शन, सगुणदर्शन, दिव्यदर्शन असे भाव क्रमशः विकसीत होतात. भक्तीप्रेमभावाची जननी आहे. भक्त-बालक प्रेमचैतन्य-मातेच्या/मायबापाच्या अंगावर लोळत-लोळत भक्तिप्रेमक्रीडा करत असते. त्या भक्तबालकाचे लीलाकौतुक ही चैतन्यमाता सगुणाचे लळे/हट्ट पुरवून करत असते.

जागृतीमध्ये अंत:करणात जे चिंतनाचे पडसाद उठतात, त्याचप्रमाणे स्वप्ने पडतात. ईश्वराने जसे जगत निर्माण केले, तद्वत् जीवही आपली मनोमय सृष्टी निर्माण करतो. त्या स्वनिर्मित सृष्टीत तोच प्रवेश करतो व त्यातच स्वयंप्रकाश भगवंतास पुण्यस्मरणद्वारा अवलोकन करू शकतो. सद्भक्तहृदयात आणि प्रत्यक्ष जीवनात तो प्रभू श्रीगुरूरूपात प्रकट होतो.

सप्रेमभक्तांचे हृदय श्रीहरीच्या चरणकमलांवर हंसाप्रमाणे पूर्णपणे रत झालेले असते. भगवान गीतेत अशा भक्ताला "**मय्यासक्तमन:**" अस म्हणतात. त्यामुळे भगवंताचा कृपाप्रेमप्रसाद त्यास प्राप्त होतो. कमळांचे जीवन पाणी आहे. कमळे ही पाण्यात असतात, पण श्रीहरीचे चरणकमळ असे आहेत की ते भक्तिप्रेमगंगेला निर्माण करतात. पुन: मौजेची गोष्ट म्हणजे या भक्तिप्रेमप्रवाहात श्रीपांडुरंग प्रकट होतो व मग भक्त त्याच्याबरोबर लोळतो, हसतो, खेळतो आणि रमतो. ही मनाची दिव्यता आहे. हेच मनाचे उन्मन वैभव आहे. मनाचा हा उन्नत विकास आहे. मग याच मनात आनंदसिंधू उचंबळतो. भक्तिप्रेमसिंधूला भरती येते.

मग **"आनंदले मन। प्रेमे पाझरती लोचन।।"** अशी स्थिती होते. श्रीगुरूकृपाप्रसादाने हृदय भक्तिप्रेमानंदाने भरून येते. कंठ सद्‌गदित होतो. नेत्रांतून प्रेमाश्रूंचा पूरच वाहू लागतो. अत:करणवृत्ती भक्तिप्रेमभावाने थबथबीत होतात. सर्वांगावर रोमांच उभे राहतात. अष्टसात्विकभावांनी भक्त आणि भगवंत चिंब भिजून जातात.

स्वप्नात/भावात जे तरंग उदय पावतात, त्यावेळी खर तर आपला सत्यसंकल्पच गतिमान होऊन आकाराला येतो. प्रत्यक्ष अनुभवाचा विषय होतो.

भक्त ज्या प्रेमाने हाक मारील त्याच भावनेप्रमाणे भगवंत आपले भक्तिप्रेमकृपाकिरण त्याच्याकडे पाठवत असतो. मग किरणच काय ,तर तो कृपासूर्यभगवंत भक्ताच्या अंत:करणातच प्रकट होतो. भक्तीप्रेमाचा सूक्ष्म, नाजूक पण पक्का रेशमी तंतू भक्त व त्याचा भगवान यांच्यात निर्माण होऊन तो क्षण प्रतिक्षण जास्तच घट्ट होतो. कर्तुम् अकर्तुम् सर्वथा कर्तुम अशा सर्वशक्तिमान् प्रभूला देखिल तो तोडता येत नाही.

सावळा पीतांबरधारी भक्तचकोरचंद्र असा भक्तिप्रेमभावातूनच प्रकटतो. मग त्या प्रेमामृतस्वरूप भगवंताच्या अमृतपानाने (नामामृत, भक्तिप्रेमामृत, अधरसुधामृत, रसामृत इ. इ.) भक्त सुखी होतात. हा त्रैलोक्याधिपती लक्ष्मीनाथ खरा पण भक्तांच्या बाहूपाशांत बद्ध होतो. कारण हा कोठे बाहेरून आत येतो थोडाच? नाही नाही; तर त्यांच्या अंत:करणस्फूर्तीतून प्रकटतो. भक्तिप्रेमाच्या प्रार्थनेतून प्रकटतो. डोळ्यातल्या भक्तिप्रेमाश्रूबिंदूतून हा बिन्दुमाधव आकारास येतो. मूर्तिमान् होतो. सगुण-साकार होतो.

भक्तिभावाची आंच, अंत:करणाची स्वच्छ रूप्यागत घासलेली बुद्धी, आत्मज्ञानाचे तीळ, भावामृताचा मळी काढून स्वच्छ, पारदर्शक केलेला

शर्करा पाक, सेवाभावाची स्वच्छ, शुभ्र, धुतलेली पांढरी फडकी, योग, ध्यान, नामयोगाचा पाक, चित्तचतुष्टयाच्या निर्मळ शुभेच्छा जळाचा भरलेला तांब्या आणि कोमल प्रेमभावाची मृदू ताटे. इतक असल की ह्या सगळ्यांतून भक्तिभावप्रेमानंदाच्या शुभ्र, दाणेदार, मनोहर अशा तीळशर्करा (म्हणजे हलवा) तयार होतो. नुसती साखर लगेच विरघळते, पण हलवा जीव्हेवर बराच काळ घोळत राहतो.

* * * *

# चिंतन ३६

पुढच्या माणसातील मोहरीएवढा गुण (असला तर,किंवा प्रसंगी नसला तर, आपला गुणालंकार त्याला घालून) त्याचे मेरूपर्वताएवढे वर्णन, गुणगान करणं हा सज्जनांचा स्थायिभाव असतो.

जीवन कृतार्थ होण्यासाठी श्रीगुरूकृपा अत्यावश्यक. सद्‌गुरूंचे दर्शन, भेट, सहवास, वचनामृतप्राशन, उपदेश आणि सेवा हा महालाभ, मोठाच एक योगायोग, पण घडला हे खरं.

**''अंग साने, परिणामे थोरू । जैसे गुरूमुखींचे अक्षरू ।''** याचा चिरकाल विचार, मनन, चिंतन याचा परिणाम झाला. एक समृद्ध भावजीवन. या भावामुळेच पांडुरंगच काय अवघ्या जीवमात्राबद्दल अंत:करणात आत्यंतिक प्रेमभाव आकारास आला की मग तो क्षण-प्रतिक्षण वाढता-चढताच असतो. महाराज श्रीतुकोबाराय तर म्हणतात **''अंगी प्रेमाचे भरते। नेघे उतार चढते।''**

एका सद्‌गृहस्थांनी विचारले ''अण्णा, तुम्ही बराच काळ नुसते बसून असता, वाचन नाही, जप नाही, ध्यान नाही, पूजा पाठ नाही, मग काय करत असता नुसत बसून?'' हे नुसत बसण दिसत. दिसायला, पण ती असते भावसमाधी बर का!!! साक्षित्वाचे साक्षित्वही जिथे संपते तिथे तन्मय, तद्रूप, तल्लीन होऊन राहणें हीच भावसमाधी.

अशा भावावस्थेत, त्या सच्चिदानंदघनाचे अखंड अनुसंधान राहावे, त्यातील अनुपमेय आनंद अखंडत्वाने लुटावा हाच एक हव्यास उरतो.

मग अंतरी एकला एक परमप्रेमास्पद आनंदच उरतो. या आनंद ऊर्मीची उत्कटता व व्यापकता, तशीच भव्यता, दिव्यता, उत्तूंगता, निरागसता, निरासक्तता, नि:संगता, अनुभवताना, वाणीला सखोल पण सूक्ष्म शब्दांची उणीवच पडते. ह्या भक्तीप्रेमभावात, मग संवाद होत असतो, पण तो शब्दांशिवाय. परा वाणीचा जेथे लाग लागत नाही, मग वैखरी काय कामास येणार? हा अनुभाव मूकास्वादनवत् असाच असतो.

अशा आनंदाकारतेत देहाला मरण आले तर ते वास्तविक मरण नसतेच, की ज्याला आपण लौकिकात मरण म्हणतो. त्यात आपण मरत नाही तर, पुन्हा-पुन्हा जन्म आणि मरण अशी फजितीच संपते, पुन्हा जन्म आणि पुन्हा मरण येत नाही तेच खरे मरण. असे मरण येण्यासाठी अहंकाराचा मृत्यू व्हावा लागतो.

एवंगुणविशेषण असे मरण आपल्याच डोळ्यांनी पाहण्याचा सोहळा जीवनात प्राप्त होणे ही महासमाधी, तो अनुपम्य सोहळा. जेथे मरोनी जन्मलो अशी नवलाई.

परमकारूणिक, दयाघन, उदारांचा राणा, अशा भगवंताजवळ म्हणून मी भिक्षा मागत असतो की भक्तिसुधेची पावन भिक्षा घाल. भक्तीभाव, वत्सलभाव, दास्यभाव, माधुर्यभाव आदी भक्तिभावांची भिक्षा घाल.

ह्या भावमाधुर्याचाच खाऊ सर्व संतमहात्म्यांनी मोठ्या प्रेमभरे, अजाण, अनाथ, अशा भुकेल्या बालकाला भरवावा हाही भाव मोठा गोड, आनंद देणारा आहे.

* * * *

# चिंतन ३७

एखादा प्रसंगच असा आला की मन निराश होते; पण ह्याचवेळी आपण नैराश्याचे वृथा विचार मनामध्ये घुसणार नाहीत याची खबरदारी घ्यावयास हवी. रस्त्यावरील जड वाहन आपण कसे रोखणार; ते आपल्याला न विचारता, येते, धडकते, नुकसान करते. पण नैराश्याचे विचार मनात घुसले तर फारच नुकसान करतात.

आपले ध्येयवाक्य असावयास हवे "लढा, लढा, लढा, उद्योग, उद्योग आणि उद्योग. प्रयत्न, प्रयत्न आणि प्रयत्न. हार खावयाची नाही. कधीच, कोठेही आणि जीवनाच्या कोणत्याच स्तरावर."

निराशेस अजिबात थारा देऊ नका. चिंता कधीच जवळ करू नका, तर चिंतन करा. निराशा आपली सर्व शक्ती, आपल्या साऱ्या उर्मी नष्ट करते. चिंता-काळजी-निराशा ह्या आपल्या जीवनाच्या सर्वविनाशक घातक शत्रू आहेत.

अशा प्रसंगी आपण मानसिकदृष्ट्या फार हीन-दीन, अगदी लोळा-गोळा होऊन गेलेलो असतो. ह्या आंतरिक लढ्याला तोंड देण्याकरिता आपण जणू पुन्हा उठूच शकणार नाही असे आपल्याला वाटावयास लागते. अशा वेळी आपण जणू मनापासून अगदी वेगळे आहोत असे समजून मनाची अवस्था त्रयस्थपणे पहावी. मनाशी आपण कधीच तद्रूप होऊ नये. तर कर्तव्याशी, उमेदीशी, भव्य-दिव्य-सुंदर-संपन्न उषःकाळाचे चिंतन करावे. ह्या चिंतनातूनच उद्याचा, भव्य-दिव्य-सुंदर-संपन्न उषःकाल उगवत असतो.

आपण जेव्हा मानसिकदृष्ट्या अवसन्न झालेले असतो, तेंव्हा आपल्या मनातील सारे नकारात्मक विचार हद्दपार करावयास हवेत. यासाठी अशावेळी "मी इतर कोणी सामान्य नसून कर्तुम् अकर्तुम अन्यथाकर्तुम सर्वतंत्र स्वतंत्र अशा सर्वज्ञ सर्वेश्वराचाच साक्षात अंशस्वरूप आहे" अशा विचाराचा आपल्या सर्व शक्तीनिशी जप करावा (म्हणजे अशी दृढ धारणा करावी) "भगवंत जर आमच्या पाठीशी आहे तर कोण आमचा नाश करणार, विरोध करणार, आमच्या प्रगतीत अडथळा आणणार"? असे पुनः पुनः म्हणून दृढ श्रद्धेने निष्ठापूर्वक जाणले पाहिजे. अशा रितीने, प्रसंगोपात आलेला उदासपणा निघून जातो.

अशा प्रसंगी, आलेल्या प्रसंगाला तोंड देण्यासाठी आपल्याला एक मानसिक जबरदस्त विजिगिषामुक्त, महान शक्तिशाली मानसिक यंत्रणा सज्ज ठेवावयास हवी. शहरातील अग्निशामक दलासारखी ही **मनोयंत्रणा** रात्रंदिवस आपल्या हाताशी सज्ज हवी.

राजयोगाचे आचार्य पतंजली या पद्धतीला "प्रतिपक्षभावनम्" म्हणजे विरूद्ध विचार उपयोजणे असे म्हणतात. मनोधैर्याला विघातक असे विचार मनात येत असतील तर त्याच्या विरोधी उत्साहाचे, सामर्थ्याचे, विचारतरंग मनामधे उठावयास हवेत. ह्या विचारांचे प्रचंड तांडव मनामधे गर्जून उगवावयास हवे, खरे ना?

अभय, दुःखमय, अक्षय शान्ती, अपूर्व समाधान, अखंडानंद, स्वास्थ्य ही सर्व भावंड मनाच्या बळकट, निश्चलतेच्या अधीन आहेत.

मनाशी खेळावयाचा हा खेळ फार मजेचा आहे. क्वचित्प्रसंगी आपली हार होत आहे असे वाटते, पण त्यात पण एक गंमत असते. ह्या खेळात कौशल्य लागते. चित्त सावध असावे लागते. विनोदबुद्धी शाबूत पाहिजे. मन

स्वच्छ, नितळ हवे, खेळावयाचे (मनाशी/प्रसंगाशी) डावपेच माहीत असावे लागतात. धीर असावा लागतो. शेकडो वेळा पडलो तरी नामोहरम न होणारी जिद्द आणि वीरश्रीही अंगात पाहिजे.

आणि याच्या जोडीला भगवंताचे अखंड स्मरण. मग भले कां आकाश कोसळो, भूगोल भंग पावो, अथवा वडवानळ त्रिभुवनाला जाळो. आपल्याजवळ असते मग श्रद्धा आणि सबुरी. मग यश हमखास. प्रगती निश्चित.

* * * *




भक्तीप्रेमभावाचा, महाभावाचा, आनंदभावाचा महाप्रसाद आमच्या कित्येक महावैष्णवांनी अनुभवला आणि तो महानंद त्यांनी साऱ्या जगास दिला. नामाभ्यासाने, ध्यानाभ्यासाने व ध्यासाने या सर्व साक्षात्कारभावांचा भक्ताच्या अंत:करणांत उदय होत असतो. तसेच भगवद्गुण, भगवत्लीला व भगवत्नाम यांच्या संकीर्तनाने सर्वभावसंपन्नता प्राप्त होते. भगवंताच्या चेतन सगुण स्वरूपाच्या ध्यानाने मनाची एकाग्रता होते. तदनंतर सर्व वृत्ती अंतरंग चैतन्यात विराम पावतात. मग त्यातूनच अष्टसात्वीक भक्तिप्रेमभाव सर्वांठायी/ सर्वांगावर प्रकट होतात. चित्तात नितांत गूढ पण प्रचंड सामर्थ्यशाली अशी भक्तिप्रेमशक्ती प्रकटते. ह्या उदयालाच काहीजण आत्मसौंदर्य म्हणतात. आत्मप्रकाशात या आत्माकारवृत्तिला सुंदर असे भक्तिप्रेमाचे अंकुर फुटतात.

मग चित्तात एक तीव्र ओढ निर्माण होते. कशाची? भगवत् दर्शनाची. योगेश्वर भगवान् श्रीकृष्णाचे वेणुगान कानांनी ऐकावे म्हणून मग कान भुकेले असतात; तर नयनाला प्रभूदर्शनाची तीव्र लालसा निर्माण होते. इतकच काय पण सगळ्याच इंद्रियांना त्या गोपीमानसमनरंजनाची ओढ लागते.

श्रीअरविंदबाबू घोषांसारखे म्हणत "**भगवत्दर्शनाचे मला वेड लागले आहे. भगवंतानी मला जो जन्म दिला तो त्याला पाहण्यासाठी, त्याला भेटण्यासाठी, त्याच्या सेवेसाठी, त्याच्याशी एकरूप होण्यासाठी.**" जे वेड व्रजवासियांना लागले, त्याच वेडात

विसावा घेण्यात बाबू अरविंदासारख्या थोर तत्ववेत्यांनाही परमानंद वाटतो. असा हा आनंदघन श्रीकृष्ण.

ह्या नटवराचे हास्य सर्व विश्वात प्रकटले आहे. तोच हसवितो आणि रडवतोपण तोच. आपल्या नेत्रांच्या बाहुल्यात तो प्रकटतो. नाही नाही, तेथे येऊनच बसतो. कमळनयन भगवंत अशांच्या हृदयकमळसिंहासनावर विराजमान होतो. भक्तांच्या हृदयकमळांतील भक्तिभावपुष्पांचा दिव्य सुगंध प्रभूस मोठा आल्हाददायक वाटतो, तो त्या सुगंधाला भुलतो, वेडा होतो. भक्तांचे लळे पुरवून, त्याच्याशी गुजगोष्टी बोलून, भगवंत दमला, मग विश्रांती कुठे घेतो? तर भक्ताच्याच नेत्रकमळात, भक्तीछटांच्या लांबसडक पापण्या पांघरून तेथेच निद्राधीन होतो. जागा झाल्यावर भक्ताच्याच नयनातील भावाश्रूंनी चूळ भरतो; तेच प्रेमाश्रू प्राशन करतो आणि आपली तहान भागवतो.

हा शामसुंदर, डोळे भरून आपल्या भक्तांना न्याहाळून न्याहाळून पाहतो आणि पाहता पाहता तो त्यांच्याशी तन्मय होतो. भक्त तर केंव्हाच भगवंताशी तद्रूप झालेलाच असतो ना. भक्त-भगवंत दोघे वेगळे राहातच नाहीत. ते गोपाळ तर श्रीकृष्णाला म्हणत, सारखे म्हणत, “**कृष्णा एकचि घोंगडे पांघरू रे**” त्याने मग **‘मी-तू’** पण दूर जाईल.

हा देवभक्तांचा संगम आणि या संगमाला पुन: ओघ येऊन मिळतो. नामसंकीर्तनाचा. मग ही त्रिवेणी केवळ अमृतस्वरूप सोनियाची. या आनंदडोहात भक्त डोलतातच; डोलतच असतात आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे भगवंतालाही डोलावयास लावतात.

अमृतभाग्यात न्हाणारा, वैकुंठात नांदणारा, भगवंत केवळ भक्तांसाठीच भूतलावर येतो. वैष्णवांच्या सदनी न बोलावता जातो. त्यांच्या घरी

भक्तिप्रेमामृताचे घट भरलेले असतात. भगवान् या अविटरसाचे आकंठपान करून तृप्त होतो. भक्त पण अखंड या भक्तिप्रेमानंदात निमग्न असतात. ''धन्य धन्य ते वैष्णव मंदिर।''

स्वतःच्या पीतांबराने व्रजांगनांचे प्रेमाश्रू पुसणारा हा आनंदचंद्र, बाळमुकुंद तोच आपला सूत्रचालक, तोच आपला खेळगडी आणि खेळातला मार्गदर्शक सुद्धा बर का!!! आपली सर्व जीवनसूत्र त्याच्या हाती. आपण फक्त त्याच्याच चिंतनात, स्मरणात असायचे, एवढेच आले कर्तव्य.

* * * *




एका आवडीची, ध्यासाची, छंदाची मंडळी एकत्र आली ना, मग दोन अगर दोनाहून कितीतरी, सगळ्यांची आवड एकच असल्याने त्यातून एक फार मोठा आनंदोत्सव आकाराला येतो. **''माझिये जातीचे मज भेटो कोणी। आवडीची धणी फेडावया।''** अशी अपेक्षा निरपेक्ष, निष्काम अशा वैष्णवांना सुद्धा असते. गीता पण या प्रसंगाच वर्णन **''मच्चिता: मद्गतप्राण:''** या श्लोकातून करते.

या सगळ्याचा (आनंदोत्सवाचा) केंद्रबिंदू असतो आनंदचैतन्य भगवान् श्रीकृष्ण. सर्व जीवांचा जीवप्राण; प्राणतंतू, सूक्ष्मतंतू, तेजतंतू एकमेव तोच. लोकांनाही हाच रमारमण आणि एकान्तात सुद्धा तोच गोपीमानसमराळ. असा हृदयस्थ आपल्या हृदयात अखंडत्वाने अनुभवण हाच भक्तांचा एकांत.

आपले सर्व जीवनसूत्र त्या नंदनंदनाच्या हातीच आहे असा वैष्णवांचा परमविश्वास. **''संत म्हणू तया। अवघी देवावरी माया।.''** अतृप्त, भुकेलेल्या नयनांनी त्या कमलनयनाला पुन्हा पुन्हा न्याहाळावे, त्याच्या मधाळ दृष्टीतील प्रेमामृतमधुवर्षावाने न्हाऊन निघावे, त्याच्याशी काया, वाचा, मनेकरून एकरूप व्हावे, हीच भगवंताची इच्छा. हेच त्याचे मानस असते. हेच परममहाभागवतांचे सौभाग्य. आनंदभाग्य.

भगवंत अशा भक्तांच्या प्रेमभावात पडतो. त्यांना आनंदाने झेलतो. आपल्या गळ्यातला ताईत करतो. त्याला हे सगळे करावेच लागते ना!!! भक्तासाठी त्याच्या तळमळीतून, निष्ठेतून, विश्वासातून, व्याकूळतेतून तो

प्रकटतो. त्यांचे लळे पुरवतो. कोडकौतुक करतो; हट्ट पुरवतो. सांभाळतो. अंतर्मनात घर करून राहतो. हा सुदर्शनचक्रधारीच मग त्यांच्या (म्हणजे) भक्तांच्या प्रत्येक कृतिचक्राला गती देणारा असतो.

हा भगवंतच लीलातनू धारण करून वारंवार आपल्या भक्तांकरिता "**रूप सावळे सुंदर। कुसुमशुभकांति जागर।।**" (स्वरचित) धारण करतो. महारासाच्यावेळी हाच गोपीजनांकरता चंद्रप्रकाशांत, यमुनाकाठी वेणीमाधव/ वेणूमाधव या स्वरूपात प्रकटला.

**जो सकळ कळांची कळा। जो परमानंदपुतळा।**

**जो जीवाचा जिव्हाळा। विश्वाचिया।।**

**जो सर्वज्ञतेचा वोलावा। जो यादवकुळीचा कुळदिवा।।**

**तोच हा श्रीकृष्ण!**

आणि हा श्रीकृष्णच तेजाचा क्षीरसागर आहे. महातेजाला याचेच तेजन्न आहे. तो अग्नीचे दीपन आहे; चंद्राचे जीवन आहे. इतकच काय सूर्याचे नयन सुद्धा ज्याच्या दृष्टीसत्तेने पाहतात.

सर्वत्र संपूर्ण एक तोच आहे. त्याच्याशिवाय काहीही नाही. अशा अद्वैतमाधुर्यप्रेमभावाचा उदय झाल्यावर सर्वत्र अतिदूर एक त्या आनंदकंदाचाच आनंदोत्सव सर्वत्र अनुभवास येतो.

**भक्तिप्रेमसुखसाक्षात्कारसंपन्न** अशा वैष्णवांना त्या तेजाचे लोट, उल्लाळ, तेजोतरंगांचा सर्वत्र प्रत्यय असतो. याकरिता मात्र भगवंताच्या भक्तिप्रेममंदिरात यावयास पाहिजे. हाच एक आत्मतेजाचा, आनंदजीवनाचा मार्ग आहे. पवित्र विचार, पवित्र आचार म्हणजे सत्कारयुक्त भक्ती. यातच आत्मोन्नतीचा प्रकाश आहे. भक्ती म्हणजे भगवंतावरील निष्काम परमप्रेम.

सत्संग, सदाचार (म्हणजेच सत्कारयुक्त नाम) ;नाम, गुण, रूप, लीलाचरित्र संकीर्तन, आणि परमसंतोष हेच भक्तांचे भक्तिभाग्य आहे. अशा भक्तांवर मग तो दयाघन प्रभू आपल्या प्रेमामृताचा अमृतवर्षाव करण्यास अवतीर्ण होतो यात नवल ते काय?

आत्मज्योतीचा आत्मप्रकाश नामस्मरण करणाऱ्या नामधारकभक्ताला प्रभुकृपेने प्राप्त होतो. भक्तिप्रेमाच्या सुखशय्येवर (निर्गुणाची बाज आणि सगुणाची शेज) भक्त भगवंताच्या कुशीत विसावतो. भगवंताच्या प्रसन्न अशा मुखकमळाच्या ध्यानाने भक्तजनांच्या शिरकमळात गुंजारव सुरू होतो. भक्ताच्या मन:कमळात कमलनयन श्यामसुंदर जेव्हा जेव्हा प्रकटतो त्या त्या वेळी इंद्रियरूप गोपी आपआपले विषय सोडून या आत्मारामाकडे धाव घेतात. जशा यमुनेच्या काठी, आम्र, कदंब, पळाश, ताळ-तमाळ वृक्षांच्या गर्द राईत श्रीकृष्णाचा मधुर वेणुनाद श्रवण करण्यास गोपी धावत असतात अगदी तशाच. त्यांना जो आनंद प्राप्त व्हावयाचा ना तोच आनंद मग तो माऊली आत्माराम श्रीकृष्ण भेटल्यावर सगळ्या वृत्तिनां, सर्वेंद्रियात प्रकट होतो.

या आत्मानंदाने भक्तिप्रेमभावात ईश्वरी आनंदसृष्टीचा उदय होतो. ईशचैतन्य तर सर्वत्र आहेच. त्यामुळे हा आनंद अंतरंगात व बहिरंगात व्यक्त होतो. भगवंत हा अनंदसागर आहे मग आनंदसागरातील कोणताही भाग / अंश हा आनंदाचाच ना!!! या योगाने सर्व मनो-इंद्रियवृत्तींचा गलबला शांत होऊन आनंदचैतन्याचा आविर्भाव सर्वेंद्रियात प्रचीतीस येतो. (उदा. काल सकाळी पूजेच्या प्रारंभी ध्यानाच्या श्लोकापासूनच **''कंठी प्रेम दाटे,। नयनी नीर लोटे। हृदयी प्रकटे रामरूप।''**)

हे आनंदसौभाग्य संपादन करण्याकरिता मनाला नामाबरोबर नामाच्या सर्वांगसुंदर स्वरूपाच्या ध्यानाभ्यासाची सवय लावली पाहिजे. आपण या

ध्यानानंदात मग्न, मश्गुल होऊ लागल्यावर, चित्तचकोराला भक्तिप्रेमचंद्र भगवंतच प्रिय, नुसता प्रिय नाही प्रियतम वाटू लागतो. मग हा चित्तमयूर, भक्तिप्रेमाच्या वेड्या अवस्थेत ध्यानमग्न भक्त आनंदाने डोलू लागतो. या ध्यानानेच चित्तात ब्रह्मचैतन्य/आनंदचैतन्य प्रकट होते. प्रकाश व आनंद हा या अभ्यासप्रक्रियेने साध्य होतो. मन-पवनाचे ऐक्य झाल्यावर आपल्या प्राणावर सहजच सत्ता संपादन करता येते आणि ब्रह्मानंदाचा झरा अंतरंगात प्रकटतो.

मग भगवत्स्वरूपाचे ध्यान कोणात्याही माध्यमातून होवो. अभ्यासाने, चिंतनाने, वैरबुद्धीने, मग प्रेमभावाचा तर प्रश्नच नाही ना. भगवंताचे आश्वासन आहे की, **''जे कोणत्याही भावनेने माझे ध्यान करतात, ते माझ्या स्वरूपाला प्राप्त होतात.''** ज्ञानाने, भोगाने, विवेकाने जे साध्य तेच भक्तीने साध्य. भक्तीने मनाचा-चित्ताचा लय प्रभू श्यामसुंदर भगवान् योगयोगेश्वराच्या स्वरूपात होतो. भगवंताच्या तेज:पुंज, लावण्यसंपन्न मुखकमलाचे ठायी, भगवन्नेत्रात (म्हणजे त्याच्या डोळ्यात डोळा घालून) आपली दृष्टी स्थिर करावी व मग तेच मंगळस्वरूप नेत्र मिटून आपल्या चित्तात स्थिर करावे व त्याचबरोबर भ्रूमध्यात अग्निचक्राचे ठिकाणी तेजोमय भगवंतस्वरूपाचे ध्यान करावे.

मोठ्या प्रसन्न चित्ताने, या भगवत्स्वरूपात (आपल्या प्रिय आराध्य भगवंताच्या सगुणप्रेम स्वरूपात) अंत:करण स्थिर करून भगवंताच्या कोमल, सुकुमार, चरणकमलापासून ध्यानास सुरवात करावी. याप्रमाणे मग भगवंताच्या केळीच्या गाभ्यासारख्या जंघा (म्हणजे पोटऱ्या), मांड्या, उदर, नाभी याचे ध्यान करावे. तदनंतर भगवंताचे विशाल उन्नत वक्ष स्थळ, मधुर कंबुग्रीव कंठ, कंठातील तेज:पुंज कौस्तुभ आणि वक्षस्थळावरची आपादमस्तक रूळणारी श्रीमंत वैजयंती माळा, करकमळे, शंख, चक्र, गदा,

पद्म या सर्वांचा चित्तात आठव करून मग प्रसन्न अशा मुखकमळाच्या ध्यानास प्रारंभ करावा. तेथील कर्णांची, कर्णकुंडलांची कांती, कपाळाची शोभा, सुंदर सरळ नासिका, विशाल कमळाकार कमळनयन, धनुष्याकृती दाट भुवया, लांब सडक पातळ पापण्या व स्मितहास्ययुक्त प्रेमळ नेत्रकटाक्ष या ठिकाणी चित्त स्थित करावे.

अशा प्रकारे ध्यान करताना नामाच्या चिंतनाची धार तैलधारेसारखी अखंड धरावी. भगवंताच्या निर्मळ हास्यातून प्रेमभक्तिभावाचा आपल्या चित्तात अविर्भाव होतो. या भक्तिप्रेमानंदाची माधुरी, अगदी अवर्णनीय अशीच आहे. शब्दांच्या कुबड्या घेऊन तो आनंद कसातरी शब्दांकित करत आहे एवढेच एक मार्गदर्शन म्हणूनच केवळ नाहीतर हे सगळे शब्दांच्या पलिकडले आहे. हे मोडके तोडके शब्द त्याच्याच ध्यानातून, त्याच्याच कृपेने कागदावर उमटतात (म्हणजे लिहिले जातात.) जादू-मंत्र-तंत्र काहीच नव्हे.

नेत्रात जे प्रेमाश्रू/आनंदाश्रूंचे बिंदू चमकतात, ते त्याला कृपावर्षावाचेच फळ. मग आपण आनंदात तन्मय होतो. अंगावर रोमांच उभे राहतात. भगवत्स्वरूपाचेच तेजोकिरण मनात प्रवेश करतात. मनात उन्मनभाव प्रकट होतो.

एक दिव्य, अद्भूत आनंद व परमशांतीचा चित्तात उदय होतो. मन परम शांत-शांत होते. आनंद, अनुभव, प्रकाश, साक्षात्कार, सगुण सौभाग्यात उदित होतो आणि या सौभागाच्या प्रभावळीत तो श्यामसुंदर उभा असतो.

वैकुंठातील सुखापेक्षा भक्तवृंदावनातील हे भक्तिप्रेमसुख भोगण्यास; भक्तांचा अवघा लळा पुरविण्यातच भगवंताला परमसुख वाटते. लक्ष्मीनाथ जसा जनकराजाला प्रसन्न झाला तसाच किंबहुना त्यापेक्षा जास्त हा जनार्दन जनाबाईच्या आनंदाकरिता प्रकट झाला. भक्तांच्या भक्तिप्रेमसृष्टीत हा प्रेमळ

भक्तांना भेटतो. भक्तिप्रेमपान करतो; करवतो. तृप्त होतो-तृप्त करतो.

या साक्षात्कारात पूर्णानंद आहे. आनंदसाक्षात्काराचे भाग्य, आत्मसाक्षात्काराचे सौभाग्य, चैतन्य चिद्‌विलास साक्षात्कारात आहे. पण भगवत्‌दर्शन, संभाषण, दृढभक्तिप्रेमालिंगन, चरणारविंदी प्रणाम, भक्तिप्रेमभाव, महाभाव, सुखानंदभाव भक्तांस प्राप्त होतात.

रससुधासिंधू असा भगवान. भक्तांच्या भक्तिभावप्रेमचंद्राच्या उदयाने उसळ्या मारून त्याला भरती येते व तो आपल्या भक्तप्रेमभावनांच्या लाटा हेच सहस्त्रकर, त्यांनी भक्तांना मिठीत घेण्यास उत्सुक असतो. त्यांना आपल्या प्रगाढ मिठीत घेतो.

* * * *

# चिंतन ४०

इतकेच काय पण ज्ञानोत्तर भक्तितपण साधक भक्ताच्या जीवनात भावावस्थेस अतिशय श्रेष्ठ मूल्य आहे. ज्ञानेश्वरमहाराज केवढे मोठे योगीराज, पण ते सुद्धा म्हणतात "**भावेविण भक्ति,**" बोलूच नये. या भक्तिभावात / रसभावात माधुर्य आहे. या माधुर्यात आनंद आहे आणि हा आनंद शांत / (निर्वेद) रसाला पोषक आहे.

हा जो भक्तिरस आहे. त्या रसाचा आपल्या परमप्रिय भगवत्/देव/ गुरूंची सगुण-साकार मूर्ती हा ह्या रसाचा विभाव आहे. (रसशास्त्र आहे) स्वरूप म्हणजे रतिरूप. या भावांपैकी एक स्थायीभाव भक्तिरसाचे रूप धारण करतो. चित्त रसरूप होते. यशोदा, गोपी, उध्दव इत्यादिकांनी या रसाचा आनंद लुटला. गोपी म्हणत "**पायखु (म्हणजे चाहूल) झाला संचारू नवल। वेद्ये विंदाण लाविले म्हणे विठ्ठल विठ्ठल।**" त्या आपल्या सखीला विचारावयाच्या ह्या रसभावातून "**जागृति पुसे साजणी। कंकण बोलिले अंगणी?। निरखिता वो नयनी। वृंदावनी देखियेला।।**" यशोदेच्या-नंदाच्या मनात श्रीकृष्णाविषयी भगवंत म्हणून भक्ती आणि पुत्र म्हणून वात्सल्यही होते. म्हणजे एकाच भगवंताविषयी नानाविध भाव. जसं "**कृष्ण माझी माता, कृष्ण माझा पिता। बहिणी-बंधु-चुलता कृष्ण माझा। कृष्ण माझा गुरू, कृष्ण माझे तारूं। उतरि पैलपारू कृष्ण माझा। कृष्ण माझा सखा।**" किती म्हणून सांगावे? नां?

वृंदावनातून गाई-वत्स-गोपाळांसह नंदकुमार येत आहे हे पाहून यशोदेस

पान्हा फुटायचा. शरीरावर रोमांच उभे राहायचे. हृदयात आनंदाची कारंजी थुई-थुई नाचू लागावयाची. मूर्तिमंत वत्सलरसाचे हे आनंदमय वर्णन/दर्शन म्हणजे वात्सल्यरसाचा अनुभव.

भगवंताच्या गुणगान-नाम-चरित्र-लीला-संकीर्तनात भक्ताची वाणी सद्‌गदित होते. भागवतकार म्हणतात, "**वाग्गद्‌दा द्रवते यस्य चित्तं, रूदत्यभक्ष्णं हसति क्रचिव्य। विलज्ज उद्गायति नृत्यतेच, भद्‌भक्तियुक्तो भुवनं पुजाति।।**"

चित्त भक्तिप्रेमाने आर्द्र होते; त्यांच्या नेत्रांतून वारंवार भक्तिप्रेमाचे अश्रु पाझरतात. केव्हा प्रेमानंदाने हासतात, कधीतर निर्लज्ज होऊन नाचतात. असा भक्तिप्रेमाने नटलेला, मंडित झालेला महावैष्णव त्रिभुवनाला पावन करतो. भगवत्प्रेमाकरिता भक्ती, त्याच्या मुखदर्शनात आल्हाद, त्याच्या भेटीत, बोलण्यात, परमानंद हेच भक्ताचे सौभाग्य. हा आनंदविहार त्या आनंदकंदाबरोबर हा अनुभाव आहे. अजिंक्य, त्रिभुवनपालक, वैकुंठाधिपती लक्ष्मीनाथ भगवंताला आपलासा केला ह्या भावनेने त्यांना हसू येते आणि बहुकाळानंतर प्रभु भेटला म्हणून जो अमाप आनंद होतो त्या आनंदात भक्त रममाण होतात. इतकच काय पण कोणी 'तो भेटणार आहे' असे सांगितले, मग तो कावळा का असेना, त्याचे पाय सोन्याने मढवून टाकण्यास तयार होतात. इतका आनंद नुसत्या निरोपात तर मग प्रत्यक्ष गाठी-भेटीत-दर्शनात-गुजगोष्टीत किती आनंद? कल्पनाच करा. नुसत्या कल्पनेत पण आनंद आनंद ना!!!

खेद, रोमांच, कंठ दाटून येणं, कंप सुटणं, विकलता, आनंदाश्रुंचा पूर आणि जीवभावाचा लय हे अष्टसात्विकभाव भक्तिरसाचेच अनुभाव आहेत. भगवद्‌साक्षात्कारात याची प्रतीती भक्ताला वारंवार येते व त्याचा मनमोर

आनंदाने नाचू लागतो.

उत्कट स्मृती, निद्रेचा अभाव, उद्वेग, कृशता, स्वशरीराविषयी उपेक्षा अशा अवस्था भक्ताला भगवंताच्या भेटीत खंड पडल्याने प्रतीत होतात. गोपीजन, गौरांगमहाप्रभू आणि कितीतरी महावैष्णव या भक्तिप्रेमभावात हरपून गेले. त्या गोपी म्हणू लागल्या "**हे नाथ रमण श्रेष्ठ, क्वासि क्वासि महाभुज। दास्यास्ते कृपणाया मे सखे दर्शथ सन्निधिम्।।**" हे भगवंता! कोठे आहेस? आम्ही दीन आहो. हे दीनानाथा, भक्तवत्सला, दयावान, धाव रे! धाव. ज्ञानोबाराय म्हणतात "**पडिले दूर देशी मज आठवे मानसी।**" कधी म्हणतात "**आस्था लावूनि गेला अजूनि कां न ये?।**" तर तुकोबाराय म्हणतात "**झुरोनि पांजरा होऊ पाहे आतां। येई पंढरीनाथा भेटावया।**" हे गोविंदा! विदुल कुरळे केस, कोमल भाषण, कमलाप्रमाणे सुंदर नेत्र, सुंदर अधरोष्ठ, प्रसन्न मुखचंद्र, सरळ नासिका, धनुष्याकार दाट भुवया आणि काय? काय? अरे त्रिभुवनसुंदरा, दर्शनासाठी नेत्र आसुसलेत रे! कधी भेटसी केशवा? केव्हा तू प्रत्यक्ष दर्शन देणार?

गोविंदा, गोपाळा, माधवा, अच्युता किंवा गोविंद-दामोदर-माधवेति असा टाहो, त्याच्या नामाचा जयघोश ही भक्तिप्रेमसमाधिच. योगसमाधिपेक्षा ही भाव-महाभाव समाधी कितीतरी श्रेष्ठ. ही भावसमाधी आपल्याला साधावयास हवी. मग काय? आनंद.

* * * *

# चिंतन ४१

भगवान् भक्तिप्रेमरससुधासिंधू आहे. तोच आत्माराम आहे. आत्मारामाच्या संगतीत, आत्मसंगतीत आत्मप्रत्यय आहे. आनंद आहे.

हाच गोपींच्या हृदयीचा चैतन्यचोर आहे. या चैतन्यचोरामुळेच सर्व काही चैतन्यमय आहे. सर्व तोच एक आहे. सर्वत्र तोच एक आहे. अगदी ओतंच-प्रोतंच. चराचराच्या रूपांनी तोच नटला आहे. वृंदावनात एकेका गोपीकरता ह्याच गोपीमानसमनरंजनाने अनेक स्वतंत्र रूपे धारण केली. अशा या चित्तचैतन्य चोराबरोबर ज्यांना ज्यांना म्हणून क्रीडा करता आली ते सगळे, गोपबालक, गोपबाला, गोपकन्या, गोपांगना, गाई-वासरे धन्य धन्य झाले.

हे सगळेजण म्हणजे भक्तिप्रेमाचे पुतळेच. पण चालते-बोलते-सजीव-चेतन. धातू पाषाणाच्या पुतळ्यासारखे नाही काही!!! त्यांनी अनुभवलेल्या भक्तिप्रेमसुधारसाचे वर्णन करावयाचे म्हटले तर शब्दांचे सारेच्या सारे सौंदर्य-माधुर्य येथे आटते. क्रियेचा (म्हणजे गुणगान क्रियेचा) प्रवाह आनंदसागरांत मिळून जातो आणि तेथेच विश्रांती घेतो. ही महाभागवत् मंडळी, वैश्णवजन प्रसन्न भक्तिभावसंपन्न असून विश्वात नांदताना विश्वज्योतीशी लीलया समरस होऊन त्याचबरोबर, त्याचसमयी आत्मज्योतीबरोबर विहार करत असतात. त्यांच्या योगाने सर्व चराचर आनंदाने भरून जाते. निरागस बालकाला सारे जग आनंदमय असते, त्याचप्रमाणे भगवंताच्या या अत्यंत प्रिय, नाही नाही तर प्रियाची परमसीमा असणाऱ्या भक्तांना अखंडत्वाने आनंदाचाच प्रत्यय असतो. हे महात्मे आनंदाचे आगर, सुखाचे सागर, समाधानाचे सहोदर तसेच

पराशांतीसुभगेचे नरवर असतात.

तत्वज्ञानाच्या दृष्टीने त्यांचा बोध काय कमी असतो काय? नाही नाही. जे एकमेवाद्वितीय चैतन्य या चराचरात व्यापलेले आहे, तेच सत्‌तत्व आपण आहो; अनेकात जे एक तत्व आहे, तेच आपण आहो या दिव्य बोधभावाचा उदय त्यांच्या अंत:करणात सदा ठसावलेला असतो. आत्मानंदाचा अनुभव, आत्मप्रकाशाची जाणीव, हाच भावसाक्षात्कार. आत्मसाक्षात्कार हा हृदयांत ज्योतीस्वरूप आहे, समाधान व आनंद ज्ञानतेजांत आहे आणि सगुणसाक्षात्कार हा भक्तिप्रेमतेजात/प्रकाशात आहे. भावस्थितीत अष्टसात्विकभाव या भक्तिप्रेमातच प्रत्ययास येतात. भक्तांच्या अंत:करणातील भक्तिप्रेमज्योत भगवंत आपणहून प्रज्वलित करीत असतो.

भक्तमानसमराळ भगवंताचे वात्सल्य या भक्तिप्रेमभावांत आहे. अष्टसात्विकभाव हे या भक्तिप्रेमभावातूनच उदयास येतात. भक्तिनवनीत लुटणारा लाला; त्याला भक्तिनवनीत फार प्रिय. भागवतकारांनी त्याला नवनीतभोजी, नवनीतप्रिय म्हणून वाखाणले आहे. "**भक्ति गोकुळी नवविधा नारी। गर्जे चालती भारी वो।**" असंच संतांनी याचं वर्णन केले आहे. भक्तिप्रेमभाव-महाभाव-रसभाव आणि कितीतरी श्रेष्ठ-श्रेष्ठ असे भावसौंदर्य, भावमाधुर्य भगवंताच्या लीला-आठवात, त्याच्या चरित्रगायनात, त्याच्या नाम-गुण-स्वरूप संकीर्तनात भक्तांच्या ठायी प्रकट होतात.

या सर्व भावाची परिणत अवस्था म्हणजे चित्ताची रसरूपता. पुन: या चित्ताच्या रसरूपस्थितीत विविध भक्तिभावाच्या छटा, प्रतिमा प्रकट होतात. भक्तिप्रेमशास्त्रकारांनी त्याचे स्थूलमानाने चार विभाग केले आहेत. १) स्थायीभाव; २) विभाव; ३) अनुभाव; आणि ४) संचारीभाव. विभावाचे पुन: दोन उपप्रकार २अ) आळवन विभाव; आणि २ब) उद्दीपन विभाव.

स्थायीभाव बीजरूपाने चित्तांत सुप्त असतातच. चित्तातील स्थायीभाव ज्याच्या दर्शनाने रसरूप धारण करतात तो विभाव; रसरूपचित्तात उठणारे तरंग म्हणजेच भक्त. भगवद्विषयक रती म्हणजे भक्तिप्रेम हा भक्तिरसाचा स्थायिभाव.

रतिरूप स्थायीभाव भक्तिरसात परिणत झाला की त्यात चार स्थिती संभवतात. पूर्वराग; प्राप्ती; वियोग आणि संयोग.

संत्समागम, सत्संग, सत्श्रवण झाल्यावर भगवद्विषयक रती निर्माण होते आणि मग मन तन्मय होते. या तन्मयतेमुळे आणि भक्तिप्रेमाच्या वाढत्या-चढत्या वर्धमानतेमुळेच भगवंताच्या आनंदमयस्वरूपाचे अखंड चिंतन होते.

* * * *

# चिंतन ४२

ज्ञानेश्वरीतील १६ व्या अध्यायात ७ व्या क्रमांकाची ओवी मोठी सुंदर आहे.

**'' जेणें पाहालिये पाहाटें। भेदाची चोरळी फिटे।**

**रिघती आत्मानुभववाटे। पांथिक योगी।।''**

ज्ञा. अ. १६, ओ. ७

**''सावळ्या वनमाळी। ये रे बा सावळ्या वनमाळी।।''** असा मनाचा एकच निजध्यास, जागृती-स्वप्न-सुषुप्तीत लागला म्हणजे मग तो वनमाळी सर्व अवस्थांत अभेदबोधाने प्रत्ययास येतो. अनुभवाचा विषय होतो की ज्या अनुभूतीमध्ये अनुभव-अनुभाव्य आणि अनुभाविता अशी त्रिपुटीच शिल्लक उरत नाही. मग काय उरते? तर **''उरला उरे विठ्ठल.''** **''जागृति स्वप्न सुषुप्ती नाठवें। मग? पाहतां रूप आनंदी आनंद साठवे।।''** कातर **''पांडूरंगी मन रंगले।**, इतकेच नाही तर **गोविंदाचे गुणी वेधिले''** म्हणून.

**''तुझी पाऊले सुकुमार। तेथें मन माझें भ्रमर।।''** अशी तुकोबारायांची साक्ष. अशा त्याच्या चिंतनात सर्वकाळी-सर्वस्थळी सदा-सर्वदा त्याचाच प्रकाश; त्याचेच दर्शन, भक्ताला घडत असते. भगवंताच्या अशा अखंड चिंतनात फार मोठे सामर्थ्य आहे. या चिंतनशक्तीचा नामधारकाच्या जीवनावर अंतर्बाह्य परिणाम होतो. भगवंताच्या स्पर्शामधे मोठी अद्‌भूत विद्युतशक्ती आहे. त्याच्या नामचिंतनानेच हा विद्युतसंचार पेशी पेशीतून वाहू लागतो.

ही अद्भूत दिव्य अशी चिंतनशक्ती दैवी तेजाने चमकू लागते. भगवंत हाच आपल्या सर्व भक्तांच्या जीवनरथाचा सूत्रचालक. भक्त केवळ (भक्तच काय यच्चयावत् प्राणीमात्रच त्याच्या हातातील खेळणी; पण हा विश्वास फक्त भगवत्भक्तांनाच असतो) खेळणी. आता त्याचाच खेळ; त्यानेच आपल्या भक्तांकडून खेळवून घ्यावयाचा. तो अतिशय कुशल क्रीडापटू असा खेळगडी आहे. नुसता खेळिया आहे असं नाही तर उत्तम श्रेष्ठ असा कर्णधार, संघनायक आहे.

आपण त्याची करूणा भाकावी; प्रार्थना करावी. ''स्वत:च्या नेसत्या पीतांबराने गोपीजनांचे भक्तिप्रेमाश्रू पुसणाऱ्या प्रभो!!! तू नेशील तिकडे जावे; तू जे जे करवशील, करवून घेशील ते ते करावे. हीच अनन्यभक्ती. तुझे चिंतन-स्मरण हेच आमचे कर्तव्य आहे. ''**दिन रजनी हाचि धंदा। गोविंदाचे पवाडे।।**'' बस् ''**आणिक काही नेणे धंदा। नित्य ध्यातसे गोविंदा।।**'' हाच उद्योग. तूच आम्हाला तुझ्याकडे येण्याचा, तुला ओळखण्याचा, तुझ्या स्वरूपाशी तदाकार, तल्लीन, तद्रूप होण्याचा मार्ग दाखव ना रे.

अशा निजिध्यासातच मग त्याच्या स्वरूपप्रकाशाने दाही दिशा उजळतात. त्या उष:काळातच ''**पीतांबर शेला कैचा गगनी झळकला। गरूडावरी बैसोनि माझा कैवारी आला।**'' असे दूरून दर्शन. मग हळू हळू हे अंतर संपते. तो समीप येतो. भेटतो, बोलतो, अंत:करण त्याच्या स्वयंप्रकाशाने, स्वानंदाने भरून जाते. उत्साह, आनंद, हर्ष, चित्तात मावत नाही. नयनांना दिपवून टाकणारे प्रकाशकिरण अवघ्या त्रिभुवनात पसरतात. नवे प्राण, नवा प्रकाश, नवे मन, नित्यनूतनता.

असा श्रीकृष्ण सर्वांगानी प्रकटतो. आम्र/कदंब वृक्षाच्या घनदाट सावलीत

उभा असतो. त्याच्या ओष्टद्वयांत मुरली विराजमान् असते. मुरलीच्या मंजुळ आवाजाने तो भक्तजनांना पाळवीत (म्हणजे बोलावीत) असतो. तो भक्तांना जवळ घेतो. आपल्या कोमल करतळाने भक्तांना क्षेम देतो. भक्तांच्या हृदयाची कपाटे उघडतो. मग त्या भक्तजनांच्या हृदयकपाटांत दाटून राहिलेल्या भक्तिप्रेमाच्या रसधारा मुक्तपणे वाहू लागतात. हृदय शांत-शांत होते. परमशांती-आनंद-परमानंद-प्रवाह भगवंत आणि भक्त त्यांच्या दरम्यान वाहू लागतो.

अशा अविर्भावात तो भगवंत आपल्याबरोबर खेळत आहे, खेळता-खेळता आत्मस्वरूपाचे, स्वरूपानंदाचे खेळ शिकवीत आहे असा अनुभव येतो. अशा प्रकारे सर्वव्यापी चैतन्यब्रह्मच सगुणाची खोळ पांघरून निर्गुणाच्या क्रिडांगणावर ''सगुण साकार नाम-रूप-गुण'' अशी मनोवेधक नेत्रदीपक क्रीडा करते/करत असते. आपल्याला त्याचा खेळगडी झाले पाहिजे.

* * * *

# चिंतन ४३

श्रीमद्‌भागवतात एक सुंदर प्रसंग आहे. नंदकुमार अक्रूराबरोबर रथात बसून निघाला आहे. भगवान् श्रीकृष्ण अक्रूराला म्हणतोय, ''**वेगे हाकावे रथासी**'' कां तर या ''**गोपींच्या शोकासी न पहावे मजसि।**'' आणि रथ हालला. वेगाने निघाला. दूर-दूर निघाला; आणि भगवत्प्रेमाने गोपीजनांचे अंत:करण उचंबळून आले आणि बघता-बघता रथ दिसेनासा झाला. गोपी विव्हळ झाल्या. आता पुन्हा केव्हा भेटेल बरे?!!!

त्या म्हणू लागल्या -

**'' हे देव हे दयित हे भुवनैकसन्धो।**

**हे कृष्ण हे चपल हे करूणैकसिन्धो।।''**

याच बरोबर त्यांच अंत:करण श्रीकृष्णमय झालेल आहे.

लोकलोचनानंद त्रिभुवनसुंदर भगवान् ज्यावेळी हस्तिनापुरात आल्याची वार्ता राजस्त्रियांनी ऐकली, तेंव्हा हातातील कामं जशीच्या तशी, तेथल्या तेथे टाकून त्या धावत आल्या; अति औत्सुक्यांनी राजमार्गावर कशासाठी तर श्रीकृष्णदर्शनार्थ. त्यांचे केशबंध शिथिल झाले होते. अलंकार इकडेतिकडे झालेले. प्रसाधनाची वाट लागलेली. आपण राजस्त्रिया आहोत हे पण भान नाही. एकच उत्कट ईच्छा. भगवत्‌दर्शन. विव्हल झाल्या. इथे व्यासांनी त्यांच्या उत्सुकतेचे मोठे सुंदर मनोज्ञ दर्शन घडवले आहे.

राजस्त्रियांची, गोपीजनांची अशी अवस्था!!! यांत नवल ते काय? भगवन्मूर्तीवर निर्गुणोपासक अशा योगीजनांचे चित्त खिळून राहते. मग

गोपीजनांनी त्या गोपीमानसमनरंजनाच्या दर्शनाचा रसास्वाद किती आणि कसा घेतला असेल? केवढ मोठं सद्‌भाग्य त्यांच!!!

श्रीनाथराय म्हणतात -

**" जो नित्यसिद्ध सच्चिदानंदू। प्रकृतिपर परमानंदू।**
**सगुण झाला जी गोविंदू। स्वानंदकंदू स्वलीला ।।"**

ज्याच्या लीलेमध्ये जग सहज उत्पन्न होते, त्या सर्वतंत्र, स्वतंत्र, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान परमेश्वरास सगुण रूपात प्रकट होण्यास कितीसा वेळ लागणार? वृंदावनात भक्ती पुन्हा तरूण झाली. म्हणजे भक्तजनांच्या हृदयवृंदावनात प्रत्यक्ष आणि कायम स्वरूपात नांदू लागली. गोपगोपीजनांस प्राणधन, प्राणप्रिय नंदनंदन गोकुळेंद्र भगवान् सर्वाधार वाटू लागला. (भक्तिरसातला आळंबन विभाव) चंद्रोदयाबरोबर जसा सागर उचंबळतो, त्याप्रमाणे श्यामकांताच्या दर्शनाने भक्तांचही अंत:करण उचंबळून येते. त्या आनंदात सर्वांगावर रोमांच उभे राहतात (अनुभाव) गोपीगोपजन भगवंताच्या ध्यानांत मग्न व्हावयाचे. त्यांना डोळे मिटलेले असतांनाही आत-हृदयात-तेज:पुंज लावण्यसंपन्न भगवत्मूर्ती अनुभवास यावयाची. डोळे उघडून पाहावे तर समोर तीच चिन्मयमूर्ती. आपला श्यामसुंदर मुरलीधर मंजुळ वेणू वाजवीत आहे. असं प्रत्यक्ष दिसायचं (उद्दीपनभाव).

त्या गोपीजनांच्या हातात नानाविध पुष्पांच्या सुगंधी माळा असावयाच्या. वनमाळी कृष्णाच्या गळ्यात त्या पुष्पमाला घालण्यासाठी त्या उत्सुक. आता माळा त्यांच्या गळ्यात घालणार तोच भगवान कुंजविहारी गुप्त व्हावयाचा. मग त्या आर्तभावाने प्रार्थना करावयाच्या.

रे। नंदकुमारा, तू वेणूधारी आहेस. पण प्रकट हो रे बाबा. आम्ही

आमच्या वेणीच्या केसांनी, तुझ्या सुकुमारचरणांकरता जागा स्वच्छ करून ठेवली आहे. तुला काही बोचू नये-टोचू नये म्हणून. पण बाबा, तू हा असा लपंडाव का खेळतोस रे???

त्यांचे नेत्र भगवंताचा शोध घ्यावयाचे. आर्तस्वराने त्या त्याला आळवायच्या ''**प्रभो येरे ये**'' आणि ह्या आर्तस्वरांनी, तो पीतांबरधारी, यमुनातीर विहारी भगवान् श्रीकृष्ण त्यांच्या पुढ्यात पुन: प्रकट व्हावयाचा.

या लीलेमध्ये आर्तता, उद्वेग, उत्कंठा असे भक्तिरसातील संचारी भाव आहेत. भक्तिरसप्रवाह वाहत असता त्याच्या अविरोधी, रसान्तर आणि विविध भाव. जे प्रकट होतात. त्याला भक्तिरसशास्त्रकार संचारी भाव असं म्हणतात. अशा विविध रसभावांतून भक्तजन रसरूप परमेश्वराचा साक्षात्कार सदोदीत अनुभवत असतात.

* * * *

# चिंतन ४४

भक्तिरसाचा रती (म्हणजे पराकोटीची आवड, भक्तिप्रेमभाव) हा स्थायीभाव आहे. स्थायीभाव जरी एक असला तरी आश्रयभेदामुळे (म्हणजे पुत्राविषयी वात्सल्य; भगवंताविषयी परमभक्तिप्रेम) असे रस वेग-वेगळ्या प्रकारचे झाले आहेत / होतात. हास्याचा हास, करूण रसाचा शोक, रौद्र रसाचा क्रोध, वीर रसाचा उत्साह, भयानक रसाचा भीती, बीभत्स रसाचा जुगुप्सा (तिरस्कार), अद्‌भुत रसाचा विस्मय आणि शांतरसाचा शाम हे स्थायीभाव आहेत. कारण सामग्री जशी जशी उपिस्थत होईल तसे तसे, त्या त्या रसाचे हे भाव रूप धारण करतात.

या रसविचारांच उत्तम उदाहरण म्हणजे ज्या वेळी मथुरेत आखाड्यात श्रीकृष्ण-बलराम हे दोघे बंधू प्रविष्ट झाले त्यावेळी हे दोघेजण तेथील उपस्थित मंडळींना कसे कसे भासले त्याचे सुंदर वर्णन भागवतात श्रीव्यासांनी केले आहे. कृष्ण राम तेच, पण ज्याचा त्याचा भाव वेगळा नां; आणि "भाव जैसा देव" होय की नाही???

मल्लांना वज्र (रौद्र रस), सामान्यजनांना अलौकिक श्रेष्ठपुरूष (अद्‌भूत), स्त्रियांना मूर्तिमंत मदन (शृंगार); स्वकीय गोपाळांना हा तर आपला सखा, गोवळा, गोपाळ (हास्य); राजांना तयांचा नियंता (वीर); वसुदेव-नंदाला आपला बाळ (वात्सल्य); कंसाला आपला प्रत्यक्ष कर्दनकाळच (भय); अज्ञजीवांना नुसतीच शोभा; योग्यांना एकमेव परमतत्व (शांत) आणि वैष्णवांना, भागवतांना आपला प्रेमस्वरूप आराध्य आनंदमूर्ती

भगवंत (भक्तिरस) अशा विविध भावांनी प्रतीत झाले/झाला. याप्रमाणे सर्वरसरूप भगवान् त्या रंगस्थळात ज्याच्या त्याच्या भावनेप्रमाणे दिसला. व्यावहारिक जीवनात पण रसशास्त्राच्या ह्याच त्रिकालाबाधित सिद्धांताचा आपल्याला अनुभव येतोच नाही का? नवनीतभोजी नवनीतप्रिय नवरसात्मक भगवान् सर्व भक्तांना आपल्या रसस्वरूपाचा आनंदमय साक्षात्कार देतच असतो. मग भक्ती कोणत्या का भावांनी असेना?

"**नाम उच्चारिता कंठी। पुढे उभा जगजेठी।।**" भावसाक्षात्कारातील अवस्थेत श्रीतुकोबारायांचे मुखातून हे अनुभवाचे दिव्य अमृतमय बोल आहेत. यात त्यांच्या ज्वाज्वल्य अनुभवाचा प्रत्यय आहे. पूर्णचंद्र आनंदकंद भगवान् श्रीकृष्ण. स्वप्रकाशात, चैतन्याचे पाळण्यात, सच्चिदानंदाच्या सिंहासनावर, (हृदयात) ज्योती स्वरूपांनी नित्य नांदतच असतो. तोच नामोच्चाराने सगुणरूपात प्रकट होऊन भक्तांपुढे/नामधारकांपुढे प्रत्यक्ष उभा ठाकतो. एक महाशक्ती, अमृतशक्ती, स्वानंदशक्ती, आपल्या ज्योतिर्मय ऐश्वर्याने आपल्या अंत:करणाच्या उर्ध्व प्रांतात सतत वास करून असते. नामस्मरणाने, भगवत्‌चिंतनाने ती प्रत्यक्ष कार्यान्वित होऊन नामधारकाचे जीवन अंतर्बाह्य दिव्य करून टाकते.

* * * *

# चिंतन ४५

अरे बाळांनो, काही आनंदच असा असतो की, तो शब्दांच्या द्वारा व्यक्त करण्याचा प्रयत्न केला तर त्या आनंदालाच उणेपण येते. म्हणून शब्दसुद्धा मौन पाळतात. आपण सगळे आनंद वेगवेगळ्या माध्यमांतून प्रकट करतो, पण ते त्याचे फारच स्थूल स्वरूप असते. महासागरात उत्तरध्रुवाकडून मोठमोठे प्रचंड हिमनग वहात येतात, ते जलपृष्ठावर जेवढे दिसतात, त्याच्या कितीतरी पटींनी ते पाण्यात बुडलेले असतात. आनंदाच असंच आहे.

साहित्यशास्त्रकारांनी सौंदर्याच्या कसोट्या सांगितल्यात, कितितरी? ज्यात एक कसोटी अशी आहे. जेवत असतांना, खात असतांना सुद्धा ज्या सौंदर्यात नखभर उणेपणा येत नाही ते अभिजात सौंदर्य. तसाच प्रकार ह्या आनंदाच्याबाबतीत सुद्धा. आनंद अनुभवत असताना त्यात नित्य नूतनता प्रत्ययास येते, घराच्या अंगणावरून घरातील स्वच्छता, पावित्र्य, शिस्त, प्रसन्नता कळते तसा आनंदात डुंबणाऱ्याच्या चेहऱ्यावरून त्या आनंदाची प्रत, उंची कळत असते. हा निखळ आनंद "शारदिचिये चंद्रकले अत्यंत कोवळे" अमृतकिरण असतात, मृदूपणे चकोरतलगे जशी ते सेवन करतात अगदी तसाच हा आनंद आनंदाकार झालेल्याच्या मुद्रेवरून आनंद देणाऱ्यांनी जाणावयाचा. खरं ना? शब्दापलिकडे असणाऱ्या ह्या आनंदाला शब्दबद्ध करावयाच म्हणजे मोकळेपणे अवकाशात भराऱ्या मारणाऱ्या पंचरंगी शुकाला, लोखंडी पिंजऱ्यात कोंडल्यासारखे. आनंद शब्दबद्ध करणं खरंतर त्याचं अवमूल्यन करणारं.

उत्सव, सण, व्रते, उद्यापने आणि काय काय? सगळ्याचा उद्देश एकच. "**स्वानंदाभिमुखता**" प्राप्त व्हावी. भगवंताचे जन्मोत्सव, संतांच पुण्यस्मरण,

अगर तत्सम कोणता का उत्सव असेना. त्यात तीन स्तर. अध्यात्मिक, आधिभौतिक आणि अधिदैविक. खरंतर त्यांत अध्यात्मिक अंग निदान कमीत कमी ७०% तरी हवे. पण बहुतांशी आधिभौतिकताच त्याची जागा व्यापून असते.

उत्सवाचे निमित्त ब्रह्मचैतन्यांच्या सारख्या नामयोगी महापुरूषाचा जन्मोत्सव!! हे झाले त्याचे निमित्त. पण हे निमित्त जरी असले तरी याचा प्रमुख उद्देश आहे. आत्मज्ञानाचे प्रतिपादन; त्याचीच चर्चा. त्याचाच संवाद. पण काय कराव? नुसत ज्ञान नको असत. जनमानसात सामान्यत: हा आत्मज्ञानविषय तेवढा(?) महत्वाचा वाटत नाही. प्रिय तर नाहीच नाही. उत्सवांत केवळ त्या बोधाच्याच परवडी असतील तर बिचाऱ्या ज्ञानाचीच परवड व्हावयाची.

म्हणून मग ह्या भौतिक, दैविक गोष्टींनी तो नटवावा लागतो. **''वधूवरांचिये मिळणी। वऱ्हाडियाहि लुगडी लेणी।''** अगदी तसच येन केन प्रकारेण. लोकांना आकर्षित करून घेऊन मगच बोध करावा लागतो.

गारूडी सापाचे खेळ दाखवण्याआधी ढोल वाजवतो, आपल्या सहकाऱ्याबरोबर थोड्याफार विनोदी गप्पा मारतो, लोकांना हसवतो; लोकांना एकत्रित करतो. त्यांनापण त्या खेळापुरते आपल्या खेळात तात्पुरते का होईना खेळगडी करून घेतो आणि मगच आपल्या टोपलीतून नाग-साप बाहेर काढतो.

ह्या आनंदोत्सवामध्ये, कित्येक भाविक माय-बाप, बंधु-भगिनी एकत्र आले. सूरश्री-स्वरभास्करांच्या मैफलीला जसे गानवेडे जामतात, तशी ही प्रेमळ सत्जन मंडळी आली. मला तर विश्वास आहे की, नुसते उगाच सहज या म्हणले असतेत तरी माणसं आलीच असती. मग इथं तर काय? महाराजांच्या जयंती उत्सवाची पर्वणी. एका भावाने, एकाप्रेमाने, एका आत्मीयतीने ही सगळीजण जमली. त्या साऱ्यांना साष्टांग प्रणिपात.

जेवढे म्हणून एक झाले त्यांचा भाव एकच होता. महाराज आपले

आहेत; आपण महाराजांचे आहोत; आणि ज्यांच्या घरी हा उत्सव होत आहे ते यजमान दांपत्य तर आपले अतिशय आवडते, प्रिय, लाडकेच आहे. यांच्या कडचा उत्सव हा काय फक्त त्यांचा थोडाच आहे. ह्यांच्याकडचं कार्य म्हणजे आपल्या घरातीलच कार्य की हो!!! मग आपलं जास्तीत जास्त योगदान ह्यात हवेच की, आपलं कामच आहे ते याच एका भावनेने ही सगळी मंडळी राबत होती. आता काही अपवाद असतातच. गालावर टेकवलेल्या गालबोटाने शोभा तर वाढतेच पण दृष्ट लागू नये म्हणून हा उतारा. नि:श्रेयस् आणि अभ्युदय यांचा संगम असा हा उत्सव खरोखरच दृष्ट लागावी असाच. हा उत्सव मोठ्या ऐश्वर्यात, उत्साहात, आनंदात, भक्तिप्रेमाने संपन्न झाला. उत्सवातील सुख-सोहळा पाहून आनंदघनराम असा आनंदआत्मा जो त्यालाही स्वानंदाचे धुमारे फुटले असतील.

पण ह्या निमित्ताने थोडी-चिंतनाची बाळगुटी. नागराज आपल्या फणीतील मणी बाहेर काढून त्याच्या प्रकाशात आहार शोधतो, तरी त्याचे सारे लक्ष त्या मण्याकडे, तसेच साधकाचे लक्ष काम करतानाही आपल्या साधनेकडे हवे.

आई घरातील अनेक कामांत गुंतलेली असली तरीही तिचे लक्ष पाळण्यातील लेकराकडे. तसे अनेक व्यावहारिक कामात गुंतले असताना लक्ष आपल्या स्व-रूपाकडेच.

सगळ्याचं सूत्र काय? तर सगळ्या दैनंदिन, नैमित्तिक व्यापात आपल्या हृदयस्थ परमात्मस्वरूपाकडे लक्ष केंद्रित असणं हाच अभ्यास, अशा साधनेद्वाराच "**श्रीराम जयराम जयजयराम**" असं स्मरण अखंड चालून रामरूपता अंगी बाणते.

हेच साध्य. त्याच साधन एक फक्त **अखंड नामस्मरण**.

* * * *

# चिंतन ४६

भक्तीशास्त्रकारांनी भक्तीचे मुख्या आणि गौणी असे दोन प्रकार केले आहेत. त्यात पुन: वैधी विधिसाध्यमाना आणि रागात्मिका असे प्रकार. ''**विधिसाध्यमाना वैधी सोपानरूपा,**'' म्हणजे अनेक विधिविधानाच्या द्वारा केलेली ती वैधी भक्ती होय. आणि ''**रसानुभाविकानंद शांतिप्रदा रागात्मिका,**'' अर्थात भक्तीप्रेमाचा अनुभव आणून देणारी, परमानंद आणि परमशांतीचा लाभ करून देणारी ती रागात्मिका भक्ती होय.

रागात्मिका भक्तीतही अनन्य भक्तीप्रेमलक्षणा मधुरा भक्ती परम-परम श्रेष्ठ. ही ज्ञानोत्तर प्रेमलक्षणास्वरूप भक्ती, ज्ञानोबारायांना ही भक्ती अत्यंत प्रिय. ते म्हणतात, की भाग्यवशात् ज्याला या भक्तीची प्राप्ती होते; त्याला मोक्ष सुद्धातुच्छ वाटतो. ते मोक्षालाही बजावून सांगतात, ''की माझ्या मार्गातून दूर हो; भक्तीप्रेमसुखाच्या आड जरासा सुद्धा येऊ नको.'' कबीरदास पण ह्या भक्तीप्रेमसुखात मोठे मस्त. ते म्हणतात, मला या दुनियादीरीची काय पर्वा? भगवंतच भक्ताचा प्रियतम. तो तर भक्ताच्या हृदयात बंदिस्त झालेला. कबीर महाराज म्हणाले, ''**हमारा यार है हममें, हमको इन्तजारी क्या?**'' आणखी पुढे ते सांगतात की चालायला ही वाट फार नाजुक आहे; पण माझ्या डोक्यावर आता द्वैताचे ओझेच नाही नां!!!

नारदांनी भक्तीसूत्रात सांगितलेले प्रकार (भक्तीचे) भावभक्तीवर आधारीत आहेत. भगवंताबद्दल आपल्या मनांत जो भाव असेल, जे नाते असेल, त्याच माध्यमातून भक्ती प्रकट होते. मुळात भक्ती ही भावना एकच

आहे. हे प्रकार म्हणजे एकाच भक्तीची निरनिराळ्या प्रकारे केली जाणारी अभिव्यक्ती आहे. त्याची अनेक उदाहरणे सगळ्या संतांच्या साहित्यात विपुल प्रमाणात सापडतात.

या ज्ञानोत्तर परमप्रेमलक्षणा मधुराभक्तीचा सर्वोत्कृष्ट परिपोष ज्ञानरायांच्या अभंगातच कळसाला पावला आहे. ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभवात तत्वज्ञ ज्ञानेश्वरांच्या बुद्धीची सखोलता व सूक्ष्मता आहे, तर त्यांच्या अभंगात रसिक व भावमधुर भावनांचा भक्तीप्रेमाचा उद्रेक आहे. भावभक्तीचा संबंध बुद्धीपेक्षा हृदयाशीच जास्त आहे. त्यांच्या अभंगात श्रीकृष्णदर्शनाची ओढ, कृष्णविरहाची व्याकुळता आणि पुनर्मीलनाचा आनंद या तिन्ही गोष्टी आहेत. आणि विशेष आनंदाची गोष्ट म्हणजे हा मधुरभक्तीप्रेमभावाचा अपूर्व ठेवा. आपल्याला आपल्या श्रीसद्‌गुरू निवृत्तिनाथांच्या कृपाप्रसादानेच मिळाला असल्याचा निर्वाळा त्यांनी अगदी प्रांजळपणे सांगीतला आहे.

भगवंताच्या दर्शनाच्या बाबतीत हे सगळे संतश्रेष्ठ विरागी–विरही आहेत. या सगळ्यांना निर्गुण भगवंताचे ज्ञान आहे. तरी त्यांच्या अंतरंगात सगुण साकाराची एक विलक्षण ओढ आहे. त्यांच्या आंतरिक भावना सर्वत्र भक्तीप्रेमाची भाषा घेऊनच प्रकटल्या आहेत. ते आपल्याकडे कांता भाव घेऊन आपला कांत जो भगवंत त्याला वारंवार हाका मारतात; त्याच्या दर्शनासाठी, भेटीसाठी, सुखसंवादासाठी आतुर होतात, व्याकूळ होतात. कबीर तर म्हणतात, भक्तीप्रेमशक्ती महान् आहे. या परमेश्वरी भक्तीप्रेमाचे रहस्य वेगळेच आहे. त्याचे वर्णन करता येत नाही, येणारही नाही. ''**अकथ कहानी भक्तीप्रेमकी कछु कही न जाई।**''

आपल्या अविनाशी, आनंदकंद, सच्चिदानंदघन प्रिय आत्मारामाच्या शेजेवर क्रीडा करण्याची कबीरदासांची अदम्य इच्छा आहे. त्याचे नितान्त

सुंदर, अत्यंत भावमधुर, भावरम्य वर्णन त्यांनी केले आहे.

**अविनासी की सेजका, कैसा है उनमान्।**
**कहिबेकी शोभा नाही, देखे ही परमान्।।**
**अविनासी की सेजपर केली करै आनंद।**
**कहे कबीर बा सेजपर विलसत परमानंद।।**

या भक्तीप्रेमरहस्यात भेटीसाठी मनाची तगमग आणि त्याचबरोबर विरहाची श्रेष्ठता याला फार महत्व आहे. कबीर तर त्याला बादशाह, सुलतान म्हणतात. असा हा अपूर्व भक्तीप्रेमा नां? त्यांच्याच कृपाप्रसादांनी प्राप्त झाला तरच थोडा अनुभव!!!

* * * *

# चिंतन ४७

नामसाधन प्राणापलीकडे करावयास हवे. नुसत्या साधनेनं भागत नाही. तर जोपर्यंत श्रीगुरूंची कृपा होत नाही; तोपर्यंत साधन सफल होत नाही. श्रीगुरूकृपा होण्यासाठी खूप-खूप नाम घ्यावयास हवे बर का! नामाशिवाय एक क्षणसुद्धा वाया घालवला नाही की त्यांची कृपा आलीच म्हणून समजा.

आपले ज्ञानोबाराय सद्‌गुरूंचा महिमा गातात. त्यांना चित्‌सूर्य मानून त्यांची पूजा करतात. सद्‌गुरूंच्या मार्गदर्शनाची आवश्यकता त्यांनी प्रकाशाइतकी स्पष्ट केली आहे. सद्‌गुरूकृपेने अध्यात्म प्रांतातील सर्व मनोरथ परिपूर्ण होतात. सद्‌गुरूसेवेची (सगुण स्वरूपातील) अभिलाषा त्यांनी कोठवर प्रकट केली आहे? श्रीगुरूच शिष्याचे सर्वस्व असतात. सत्‌शिष्य कृश होतो तो गुरूसेवेनेच आणि पुष्ट बनतो तो पण गुरूप्रेमानेच. ज्ञानोबाराय म्हणतात समरसभावाने मी त्यांच्या चरणी घट्ट मिठी घालीन.

कापूर आणि अग्नी यांचा संबंध येताच दोन्हीही नष्ट होतात; त्याचप्रमाणे श्रीगुरूंशी अनन्य संबंध जडतात. शिष्य आणि श्रीगुरू हे द्वैत उरतच नाही. सेवक-सेवा-सेव्य ही त्रिपुटी नष्ट होते. मग उरतो फक्त एकच आत्मभाव.

ज्ञानोबाराय म्हणतात, श्रीगुरू हा संतकुळीचा राजा आहे; साधकाचा विसावा आहे. सुखाचा सागर, भक्तिप्रेमाचा आगर आणि धैर्याचा मेरूपर्वत म्हणजे श्रीगुरू. भक्तीचे भूषण असणारा श्रीगुरू हा गुरूभक्ताघरची कामधेनू आहे. प्राणविसावा, देव, मायबाप सर्व काही एक श्रीगुरू.

श्रीगुरूंच्या सहवासात नित्य आनंद असतो. कारण ते आनंदस्वरूपच

असतात. चिन्ता, दु:ख, वेदना या गोष्टी त्यांच्याजवळ फिरकूसुद्धा शकत नाहीत. नित्य, नैमित्तिक, कायिक, वाचिक, मानसिक कर्मे करीत असतांना सुद्धा ते नैष्कर्म्य बोधावरच आरूढ असतात. ते निर्भय असतात. (अद्वैताच्या अनुभूतिमुळे निर्भय असतात. दुजेपणात भय असते.)

श्रीगुरू मन आणि शरीरावर जबरदस्तीने नियंत्रण ठेवत नाहीत तर आत्मबलामुळे आपोआपच मन आणि शरीर नियंत्रीत राहते. त्यांच्या कृपेमुळे ज्ञानचक्षू उघडतात. दिव्यदृष्टी लाभते आणि अनंताचा/आनंदघनाचा अनुभव येतो. श्रीगुरूंचा बोधामृताचा बाण भक्तीप्रेमाच्या धनुष्यातून (ज्ञानाच्या भात्यातला) सुटला, की तो आपल्या हृदयात घर करतो. त्या बाणाने अज्ञानाचे आवरण नष्ट होते आणि भक्तिप्रेमज्ञानाचा निर्मल झरा वाहू लागतो आणि तो झरा थेट प्रेमस्वरूप सच्चिदानंदकंद भगवंत स्वरूपसागराला जाऊन त्याच्याशी एकरस होऊन राहतो.

* * * *



# चिंतन ४८

भक्तीप्रेमसुखाचा आधारभूत पाया अद्वैतसिद्धी आहे. शिव आणि शक्तिमध्ये पूर्ण अभेद आहे. त्यांचा संबंध चंद्र आणि चंद्रप्रकाशाप्रमाणे आहे. **''शिवस्याभ्यन्तरे शक्तिः शक्तेरभ्यन्तरे शिवः। अन्तरं नैव जानीयात् चंद्र चंद्रिकयोरिव ।।''**

ही शक्ती काही वेळा व्यक्त स्वरूपात असते, तर काही वेळा ती अव्यक्त स्वरूपातही असते. जेव्हा विश्वाच्या रूपाने शक्तीचे स्फुरण होते, त्यावेळी शिवच विश्वाचा निर्माता, नियंत्रक आणि संहारक बनतो. शक्ती ज्या वेळी अव्यक्त स्वरूपात असते, त्यावेळी ती अद्वैत रूपाने शिवातच वास करते.

ज्ञानोबारायांनी पूर्णतः अद्वैततत्त्वाचा पुरस्कार केला आहे; आणि हे अद्वैत द्वैतसापेक्ष नाही. ते परमात्मस्वरूपाशिवाय दुसरी वस्तू म्हणतच नाहीत; अनुभवत नाहीत. चराचर विश्वात एकच आत्मतत्व व्यापलेले आहे, असं नाही तर एक आत्मतत्वच विश्वरूपाने स्फुरत आहे. हा श्रीगुरूंचा सिद्धांत आहे. चिद्‌विलासाच्या द्वारा ते असं पूर्णद्वैत सिद्ध करतात. त्यासाठी त्यांनी अद्वैत शब्दाचा उपयोग करण्याऐवजी अद्वय शब्दाचा उपयोग केला आहे. दोन वस्तू मानून, मग त्यातील एकाचा निरास करून अद्वैत सिद्ध करण्यापेक्षा एकच एक परमतत्वाचे अखंड दंडायमान् अस्तित्व अनुभवणं म्हणजेच अद्वयानंदाची अनुभूती. भक्तीप्रेमुखात हाच अद्वयानंदाचा गाभा आहे. श्रीगुरूकृपाप्रसादानेच ही अद्वयानंदाची अनुभूती लाभते.

ज्याप्रमाणे अग्नी आणि अग्नीच्या कित्येक ज्वाळा मिळून एकमात्र अग्नीच असतो; किंवा चंद्र अथवा सूर्यविकासिनी कमळ विकसित झाल्यावर त्याच्या शेकडो पाकळ्या जरी दिसू लागतात, पण या पाकळ्यांच्या अधिकतेमुळे कमळ पाकळ्यांपासून वेगळे होत नाही; पाकळ्या कितीही असल्यातरी कमळ एकच. त्याप्रमाणेच अवघ्या चित्र-विचित्र विश्वाकाराने एक परमात्माच नटला आहे.

ज्याप्रमाणे मातीची अनेक प्रकारची, आकाराची, नावाची भांडी असतात, परंतु सर्वात एकच मातीतत्व असते; त्याप्रमाणे जगात अनेक स्वभावाचे, प्रकाराचे जीव असतात; परंतु सर्वांत एकच अविनाशी परमतत्व असते.

आपल्या श्रीगुरूज्ञानोबारायांचा असा सिद्धांत आहे की, हे विश्व निर्माण झालेच नाही; यात मग विश्व हा एक आभास आहे. असा अर्थ अभिप्रेत नाही, तर हे सारे विश्व हे एक परमेश्वराचा अखंड अविष्कार आहे. असा अर्थानुभव आहे.

ज्ञानोबाराय या दृष्य विश्वाला चित्विलास म्हणजेच परब्रह्म परमात्म्याची लीला म्हणून अनुभवतात. ते म्हणतात (श्रीकृष्णाच्या मुखातून) मी निर्माण केलेल्या जगापासून जर मी लपला गेलो, तर मग या जगाच्या रूपाने कोण प्रकट झाले? दृष्टांतासाठी म्हणाले की माणकाच्या तेजामुळे माणिक झाकले जाते काय?

**जालेनि जगे मी झांके। तरी जगत्वे कोण फाके।**

**किळेवरी माणिकें। लोपिजे काई।।** ज्ञा. अ. १४. ओ. १२३

चिद्विकासाच्या दृष्टीने वरील ओवीतील दृष्टांत फार-फार महत्वाचा आहे; सोन्याचे अलंकार बनवल्यावर सोन्याचा सोनेपणा नष्ट होतो का? किंवा

कमळ विकसित झाल्यावर ते आपल्या कमलत्वाला मुकते का? जगताचा आभास दूर करून मला पाहण्याची आवश्यकता नाही. कारण सर्वत्र मीच (म्हणजे परमात्मा) आहे; सर्वत्र मलाच (म्हणजे भगवंताला) पहायला पाहिजे.

हीच गुरूवी म्हणजे श्रेष्ठ भक्ती, हाच गुरूबोध. हेच भक्तीचे तत्वज्ञान. हेच साधनमार्गातले रहस्य. नामस्मरण करता करता नामधारक अहंकार विसरतो; श्रीगुरूंशी/भगवंताशी एकरूप होतो. म्हणूनच गोपी म्हणाली, **''लाली मेरे लालकी, जित देखौ उत लाल। लाली देखन मैं गयी, मैं भी हो गयी लाल।''** हाच अद्वयानंद भक्तिप्रेमसुखात अनुभवायचा आहे. श्रीगुरूपरंपरेने प्राप्त झालेलं रहस्यच.

* * * *



# चिंतन ४१

रघुकुलभूषण, जानकीजीवन, कौसल्याहृदयनंदन, अयोध्यापती श्रीरामरायांचा जन्मोत्सव चालला आहे. हा 'श्रीराम' 'आत्मारामाहून' जरासुद्धा वेगळा नाही. आत्माराम हा 'आनंदाभिराम' आहे. हा स्वानंद हेच आपले निजस्वरूप आहे.

बालकाच्या अंगाखांद्यावर रत्नखचित बाळलेणं माता घालते. बालकाला त्याची जडण-घडण, कलाकुसर, सौंदर्य, मूल्य याची कुठली कल्पना; पण माता बाळाला नखशिखान्त नटवते त्या बाळलेण्यांनी; कशासाठी? तर आपलं राजस-सुकुमार बछडं, आणिक साजरं-गोजरं दिसावं, त्याला असं पाहण्यात आईलाच आनंद; तसे श्रीगुरूमाय आपल्या शिष्यस्वरूप अपत्यास ''आत्मसुखाची'' बाळलेणी घालते; आणि त्यांत एकुलतं एक असल्यावर तर काय केवळ आनंदी आनंदच नां!!!

श्रीगुरूकृपेने सबीज नाम मिळाले आहे. नामस्मरण हा राजयोग आहे. या नामस्मरण साधनेने 'सोऽहं' तत्वाचा अपरोक्ष बोध होतो. 'सोऽहं' तत्व ध्येय व ज्ञेय असे दोन प्रकारचे आहे. ''**सोऽहं भावे उपासीत। ज्ञानिये जे। सोऽहं भावे पारंगती। रमिजे जेथ। सोऽहं भाव प्रतीति। प्रकट होय।।**'' असे श्रीज्ञानोबाराय याचे वर्णन करतात.

'सोऽहं' तत्व ध्येयस्वरूपाने आपल्यापुढे ठेवले म्हणजे ती उपासना होते. यासच 'अहंग्रहउपासना' म्हणतात. 'सोऽहं' शब्दातून स्व आणि हं ही दोन व्यंजने वगळली म्हणजे उरतो तो 'ॐ' प्रणव. त्याचीही उपासना केली जाते.

त्याला प्रणवोपासना म्हणतात. अजपाजपही यांतच अंतर्भूत होतो. हेच निर्गुण ध्यान.

अशी 'सोऽहं' स्वरूपी अनन्यता, एकात्मता, एकरसता, प्राप्त होणे ही भक्तीप्रेमाची पराकाष्ठा आहे; असे श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात,

**हो का तरंगु लहानु। परी सिंधूसी नाही भिन्नू।**

**तैसा ईश्वरी मी आनु। नोहेचि मा।।**

**ऐसेनि बा समरसे। दृष्टी जै उल्लासे।**

**तै भक्ति ऐसे। आम्ही म्हणो।।**

**आणि ज्ञानाचे चांगावे। इयाचि दृष्टी मानावे।**

**योगाचे ही आघवे। सर्वस्व हे।।** ज्ञा. अ. १४

ज्ञान, भक्ति, योग या सर्वांचे ऐक्य होण्याचे हे ठिकाण आहे. खरी-खरी ईश्वर-शरणागती हीच. श्रीकृष्ण भगवानच सांगतात,

**तैसा ती एकवांचूनि काही। मग भिन्नभिन्न आन नाही।**

**सोऽहं बोधे तयाच्या ठायी। अनन्यु होय।।** ज्ञा.

एक भक्त 'दासोऽहं' 'दासोऽहं' असे म्हणून देवास आळवित असे. अशा चिन्तनांत तो जेव्हा अनन्य बनला, तेव्हां 'दासोऽहं' पदातील 'दा'चा चिरहरणकारी श्रीकृष्णाने अपहार केला, मग शेवट काय उरलं तर 'सोऽहं'

अनन्य सतशिष्याला श्रीगुरूंची आवश्यकता, ओढ कां वाटते त्याचे स्पष्टीकरण श्रीज्ञानदेवांनी १४ व्या अध्यायाच्या मंगलाचरणांत सांगितले आहे. ''सोऽहंभावसुहावया सोऽहं'' भावाचे भोजन करावयास लावणारे श्रीगुरू. अनुभवाच्या ताटांत स्वानंदरसाचे भोजन वाढतात. बाळाला भरवतात.

"सोऽहं" या पदांत दोन पदे आहेत. स: म्हणजे तो आत्मा व अहं म्हणजे मी जीव. म्हणजे अर्थ झाला मी अज, अजर, अक्षय, अक्षर, अपूर्व, आनंद आहे. असा अनुभव. तसेच मी अचल, अच्युत, अनंत व अद्वैत आहे. आद्य, अव्यक्त, व्यक्त मीच आहे; मीच ईश्वर, अनादी, अभय, आधार, अधेय सर्व मीच आहे; मी स्वामी, सदोदित (देश, काळ, वस्तू परिच्छेदरहित) सर्व मी, सर्वगत मी, तसेच सर्वांतही मीच. मी नवा तसाच पुराण, म्हणजे जुना, शून्य मी, संपूर्ण मी, अस्थूल मी, तसाच अनणु, अक्रिय, एक, असंग, अ-शोक, प्राप्य व व्यापक, किंबहुना १५ व्या अध्यायांत क्षरा-अक्षरापेक्षा वेगळा असणारा, पुरूषोत्तम ज्याला म्हणतात तो मीच आहे, अशब्द, अश्रोत्र, अरूप, अगोत्र, सम, स्वतंत्र किंबहुना परब्रह्म मीच आहे. हा बोध म्हणजे सोऽहं. म्हणजेच भक्तिशास्त्रांत देव-भक्ताचे, गुरू-शिष्याचे ऐक्य, जीवा-शिवाचे ऐक्य. ज्ञानोबाराय तर म्हणतात, 'सोऽहं' ही अहंकाराची पूर्ण अवस्था आहे.

सर्वजनसुलभ भक्तिमार्गाच्याद्वारा पंढरपूर, आळंदी वारीच्या माध्यमातून भजन-कीर्तनाच्या योगे हा 'सोऽहं' बोध, सगळे भागवत-महाभागवत अवघ्यांना देत आहेत. भगवंत नामस्मरण हा या बोधाकाशांतील दैदीप्यमान तारा आहे. भक्तिप्रेमातील खूप अंगे, भावप्रकार, तारका म्हणून या ताऱ्याच्या भोवती जमा होतात. "**गातो वासुदेव वासुदेवा।**" आणि राम हमारा जप करे यातील बोध हाच 'सोऽहं' बोध आहे. "**राम म्हणता रामचि होईजे।**" याचा अर्थ अद्वैतभक्ती.

* * * *

# चिंतन ५०

फुलांचा गंध, मातीचा गंध, अत्तराचा गंध, आणि कितीतरी प्रकारचे गंध. गंध म्हणजे सुवास; पण या सगळ्या गंधापेक्षा-सुगंधापेक्षा 'भावगंध' हा सर्वश्रेष्ठ सुगंध. वायुलहरीवर सुगंध येतो. काही थोडाफार काळ दरवळतो; आणि मग हलके हलके तो कमी कमी होतो. संपून जातो. भाव-गंधाचे तसे नाही. तो नित्यनूतन जास्तच फुलत जातो. हा भाव जपावा, त्याला नामामृताचे खत पाणी घालावे, तो जोपासावा, त्याची निगा राखावी; कुभावाची वाळलेली पाने, असंभवाचा पाचोळा, तण-काडी काढून टाकावी म्हणजे याच भावाच्या अक्षयवेलीला साक्षात्काराची फुले लगडतील. ही भाववेल मग डवरून येईल आणि **फुले वेचिता अति बहरू । कळियासी आला**, असा पुष्पांचा सडाच पडेल.

असा महाभाव असल्यामुळे ध्यानाचा अभ्यास जड जाणार नाही. त्याकरिता मनाला नामाबरोबर ध्यानाभ्यासाची सवय लावली पाहिजे. निर्गुण ध्यानापेक्षा भावसंपन्न साधकाला सगुणध्यान जास्त हितावह. नाम घेत असतांना नामी जो मनमोहन बन्सीधर, त्याचे आपल्याला आवडणारे अष्टवर्षीय अतिशय साजरं गोजरं स्वरूप आपण प्रत्येक नामाश्वासाबरोबर पहावं. म्हणजे मग कृष्णप्रकाश व कृष्णानंद अनुभवास येतात. याच प्रक्रियेत मन-पवनाचे ऐक्य होते. प्राणावर सत्ता संपादन करता येते. आनंदाचा झरा आपल्या अंतरंगात प्रकटतो. अविरतपणे झुळु-झुळु वाहत राहतो.

भगवान् म्हणातात, "अभ्यासाने, चिंतनाने, स्मरणाने, भक्तीप्रेमभावाने,

इतकेच काय तर वैरबुद्धीने जे माझे ध्यान करतात ते माझ्या स्वरूपाला प्राप्त होतात. विवेकाने, योगाने जे साध्य तेच प्रेमलक्षणा भक्तीने साध्य आहे. मनाचा-चित्ताचा लय, प्रभू, श्यामसुंदर भगवान् योगयोगेश्वराच्या स्वरूपात होतो. त्याच्या ते:जपुंज स्वरूपात, मुखारविंदाचे ठायी, त्याच्या राजीवलोचनात दृष्टी स्थिर करावी; व तेच महन्मंगल स्वरूप आपल्या चित्तात स्थिर करावे आणि त्याचबरोबर आपल्या भ्रूमध्यात, अग्निचक्राचे ठिकाणी भगवंतस्वरूपाचे ध्यान करावे.

अशा नामकरण + ध्यानाभ्यासाने, भगवंताच्या निर्मल हास्यातून भक्तिप्रेमाचा अविर्भाव आपल्या चित्तात प्रकट होतो. या भक्तिप्रेमानंदाची माधुरी अवर्णनीय आहे. नाम + ध्याननिष्ठांच्या नेत्रात अश्रुबिंदूच चमकतात. ते भक्तिप्रेमाश्रू-आनंदाश्रूच असतात. भक्त आनंदात तन्मय होतो. तदाकार होतो, तद्रूप होतो. अंगावर रोमांच उभे राहतात. आत्मारामाचे तेज:किरण मनात प्रवेश करतात. मनाचे उन्मन होते. दिव्य आनंद आणि परमशांती यांचा चित्तात उदय होतो. यामुळे चित्त भगवंताच्या ठिकाणी स्थिर होते. जशी गंगा सागराला मिळाल्यावर कृतार्थ होते. "**तुका म्हणे गंगा सागर संगती/ अवघ्या झाल्या उर्मि एकरूप।।**"

आनंदप्रकाश, आनंदानुभूती यांचे सौभाग्य या सगुण-साक्षात्कारांत उदयाला येते. नामाने + ध्यानाने जलवर्षाव, विद्युत्ज्योती, मेघनाद, बासरीचे सूर, दीपज्योतीचे दर्शन, तारका यांची दर्शने होतात. मग यातूनच आपल्या जिवातील ज्योत आत्मस्वरूपात आपल्यासमोर तरळू लागते.

भक्तांच्या या भक्तिप्रेमभावा-महाभावाकरिता भगवंताला सगुणरूपात प्रकट व्हावे लागते; तो प्रकट होतो व आपल्या भक्तांना सर्वतोपरी सुखवितो. वैकुंठातील सुखापेक्षा भक्तवृंदावनातील सुख भोगल्यास भक्तांचा लळा

पुरविण्यात भगवंताला जास्त सुख वाटते. **"या सुखाकारणे देव लाचावला। वैकुंठ सोडूनि भक्ताघरी धावला।।"** अशी श्रीतुकोबारायांची साथ आहे.

भक्तवृंदांच्या ठायी त्यांच्या चित्ताकाशांत भक्तिप्रेमविद्युल्लतेची प्रभा आहे. किरीट-कुंडले, वैजयंती माळा धारण करणारा असा श्रीहरी या भक्तिप्रेमात सापडतो; भाळतो. जनक राजाला प्रसन्न होणारा जनार्दन जनाबाईच्या भक्तिप्रेमानंदाकरिताही सगुण साकार रूपात प्रकट झाला. सवंगडी झाला ना!!!

भाग्यवान् भगवद्भक्तांच्या भक्तिभावप्रेमसृष्टीत हा प्रेमळ भक्तांना भेटतो, भक्तिप्रेमसुधारस देतो/करवतो/करतो; आणि भक्तिप्रेमपानाने तृप्त होऊन सर्व भक्तांना पुष्टि-शांती-महानंद-प्रदान करून सुखावतो. तो भक्तांच्या भक्तीप्रेमपाळण्यात झुलतो आणि भक्तिप्रेमरसायनांनी उड्डाण करणाऱ्या महानंदभावाच्या विमानातून भक्तांना आनंदवनभुवनात विहार करण्याचे भाग्य देतो.

या आनंदसाक्षात्काराचे भाग्य, आत्मसाक्षात्काराचे सौभाग्य, चैतन्यचिद्विलाससाक्षात्कारांत आहे. भगवत्दर्शन, संभाषण, चरणारविंदी प्रणाम, क्षेम-आलिंगन असे महाभाव या सुखानंदात भक्तीस नित्य लाभतात. त्यांतूनच विश्वतादात्म्य, चराचरांशी तादात्म्य हाच आत्मसाक्षात्कार. किंबहुना **"चराचर आपणचि पै झाला"** नाथराय म्हणतात. म्हणजेच **"अवघेचि त्रैलोक्य आनंदावो आता। चरणी जगन्नथा चित्त ढळे।।"**

* * * *

# चिंतन ५१

आपलं स्थूल शरीर पंचतत्वांच बनलेलं आहे. पृथ्वी, जल, तेज, वायू आणि आकाश. प्रत्येकाच्या शरीरात वेगवेगळ्या तत्वांचे कमीअधिक मिश्रण असतं. त्या मिश्रणात एक तत्व प्रमुख व इतर चार तत्व गौण असतात. वेदांत शास्त्रांत याला पंचीकरण म्हणतात.

असं हे शरीर. ह्या कुडीत आत्मचैतन्य आनंदकंद वास करून आहे. आत बाहेर आहे; सर्वत्र आहे.

पण आपण मात्र आनंद बाहेर शोधण्याचा व्यर्थ खटाटोप करतो. असा खटाटोप न करता मग काय करावं? तर बाहेर शोधण बंद कराव. धापा टाकू नयेत. स्वस्थ शांत मांडी घालून बसावं आणि सतत, सहज सुरू असलेल्या श्वासावर लक्ष ठेवून पश्यंती वाणीने नाम घ्यावे.

आपले कान, डोळे, श्वास, उसासे सगळे सगळे एका लयीत बांधून घ्यावेत. त्यायोगाने आपल्या शरीरातील सगळेच्या सगळे धातू स्वच्छ होतात. मग धमनीतल्या सळसळीला (म्हणजे नाडीच्या ठोक्यांना) एक संथ लय प्राप्त होते.

अशा वेळी आसन मांडी घातलेले शरीर स्थिर होते. हातापायांची वळवळ मग शांत होते. स्थिरावते.

मेरूदंडाच निशाण (स्पायनल कॉर्ड) जरा उचलावे. पापण्या अलगद, अगदी हळूवारपणे मिटून घ्याव्यात (गच्च नव्हेत) आपल्या सगळ्या अंत:करण वृत्ती भ्रू-मध्याशी एकत्र व्हाव्यात.

लयदार असा जो श्वास, त्याचा एका लयीतला नाद लक्षपूर्वक पहात रहावा. याने काय होते?

(स्वा)आनंदाची गोडी कळते

मनच आता म्हणू लागते

**"आनंदी आनंद जाहले**

**नरदेहाचे सार्थक झाले"**

**जगदंबा अंबा स्तंभाला धरूनि राहिली गुप्त।**
**कुंडलिनी शक्तिचा झराच आहे, तरी राहिला सुप्त।।**
**क्रिया-शक्ती ती शुभ कर्ती जी सांभाळे साऱ्यासे।**
**भक्तिबळाने हृदयिं रहावा कृष्ण क्षेत्र संन्यासे।।**
**सहजासनि स्थिर येता-जाता श्वास पहावा सतत।**
**विचार येता नाम-बळाने श्वासावरि घे परत।।**
**असे सहज परि या भावाने करी सतत अभ्यास।**
**हीच साधना, श्रवणे-मनने, होईल सकळ निरास।।**
**प्रात:काळी, सायंकाळी, अधिकाधिक बसावे।**
**एकांती स्थळ, गडबड गोंधळ, यातुन दूर असावे।।**
**शरीर हलके होईल कधी, कधी अमृत लहरी।**
**क्रमाक्रमाने, अभ्यासाने, आनंदाकाशी संचारी।।**
**श्वासावरूनी नकळत जेव्हा, भ्रू-मध्यावरी जाशी।**
**चित्त राहू दे तिथेच, आनंदाची राशी।।**

**अष्ट पदीचा अष्ट सात्विक हा अष्टांगचि हा योग।**

**निष्ठेने साधिता होतसे स्वानंदी संयोग।।**

जगदंबा म्हणजे कुंडलिनी शक्ती. नाम स्मरण + लयदार श्वास म्हणजेच ध्यान. चिन्मय ध्यान. ज्या ध्यानांत, ध्येय-ध्याता व ध्यान वेगळे न उरता ध्याता हा ध्यानाच्या योगाने ध्येयाकारच होतो. **''राम स्मरता रामचि होईजे''**

* * * *

# चिंतन ५२

परमार्थ, साधना, उपासना म्हणजे भेंड्याची भाजी नाही. मनाचा दुबळेपणा म्हणजे अध्यात्म नव्हे. मन धीट, निर्भय, असावयास हवे. दुर्बल अंत:करणात भगवंत कसा राहणार? सांगा बरं!!!

आपल्या मनाचा हौद, त्या चक्रपाणीच्या चिंतनाने भरला पाहिजे; मगच तो श्रीहरी आपल्या सर्वांगात, रोमा-रोमात, पेशी-पेशींत प्रकट होतो. भगवंताचा भक्तिप्रेमसाक्षात्कार हा त्याच्याच मंजूळ वेणूनादाच्या मंगलकारक पार्श्वसंगीतावर/नादावर होत असतो. हा बन्सीधर आकाशांतील तारकात, का हिमालयाच्या शिखरावर, अगर क्षीरसागरात थोडाच आहे? नव्हे, नव्हे, तो तर सर्वत्र आहे, तसाच आपल्या हृदयात आहे. हा वृंदावनविहारी आपल्या अंत:करणस्वरूप वृंदावनात आहे.

हा आनंद-परमानंदाचा पुतळा भक्ताच्या हृदयसिंहासनावर बसून बासरी वाजवत असतो आणि नित्यानंदाच्या मधुरातिमधुर मंजुळ आलापात आपली पंचज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये भरून टाकतो. अंतर्मनात तोच प्रविष्ट होतो. सस्मित सुहास्यवदनाने आपल्या भक्तासमोर उभा ठाकतो. भक्तांच्या अंतर्नाड्यातून तोच भक्तिप्रेमरसाने पाझरत असतो. तोच जगदादिकंद आपल्या आंत-बाहेर खेळत असतो व आपल्या भक्तांबरोबर मोठ्या प्रेमाने खेळत असतो; त्यांना खेळवत असतो. जशी आई आपल्या लेकरांना खेळवत असते!!!

आपण मात्र आपली वाणी त्याच्या नामोच्चारांत आणि चित्त त्याच्या नामस्मरणात पूर्णत: लीन करून टाकले पाहिजे. मग तो आपल्या

भक्तजनांच्या डोळ्यांचे लळे पूर्ण करण्याकरिता सगुण-सुंदर, साजऱ्या-गोजऱ्या स्वरूपात आपल्या भकतजनांच्यासमोर मूर्तिमंतपणे उभा ठाकतो. आपल्या लाडक्या भक्तांच्या भक्तिप्रेमसुखसोहळ्याकरिता नामा-रूपांनी नटतो. वैकुंठापेक्षा असे प्रेमळभक्त, त्यांचा भक्तिप्रेमपाश त्याला जास्त प्रिय आहे. हा गोविंद मग आपल्याला देहबंधनातून सोडवतो; विश्वप्रांगणात रमवतो; तो आपल्या लाडक्या भक्तांच्याबरोबर भावभक्तिच्या आंगणात खेळत असल्याकारणाने संपूर्ण आनंद, स्वातंत्र्य व आल्हाद यांनी भक्तांचे चित्त भरून ओसंडते. संकुचित भाव, अहंभाव, देहभाव शांत होतात. तो निजभक्तांवर स्वानंदाचा अखंड वर्षाव करत असतो.

अशा योगाने बुद्धी चिदाकाशात स्थिर होते. दिव्य आत्मप्रकाशाने सर्व मन उजळून निघते. आपल्या आत्मज्योतीत व विश्वज्योतीत तोच एक आत्माराम विराजमान झालेला आहे.

अशाच प्रकारे आपण श्रीकृष्णप्रकाशात आहोत, आपले सर्व व्यवहार योगयोगेश्वर श्रीकृष्णप्रकाशात होत आहेत, आपले अंतरंग व बहिरंग-सर्वच अस्तित्व श्रीकृष्णमय, आनंदमय झाले आहे या महाभावाचा दिव्य अनुभव येऊ लागतो व तो होता होता स्थिर होतो.

अशा भक्तिप्रेमानंदात तल्लीन झालेली गोपी नामस्मरणवृक्षाच्या शीतल छायेत बसली होती. गोंदवणाऱ्याच्या रूपाने भगवान् श्रीकृष्ण तिच्यासमोर प्रकट झाला. म्हणू लागला, अगं, ''मला चांगलं गोंदता येते!! तुझ्या हातावर छानसं गोंदवून देतो.'' विश्वाचे चित्र काढणारा/रंगवणारा हा कुशल कारागिरी, तिच्या हातावर आपले चित्र गोंदू लागला. त्याबरोबर तिच्या अंतर्नाडीचा प्रवाह श्रीकृष्णभक्तित/भक्तिप्रेमात विलीन झाला. मन प्रभुलिलाचिंतनात तन्मय झाले. प्रभू तिला सांगत होता की, मुळी हे गोंदणे काहीच नाही, मला

डोळ्यांच्या बाहुलीत गोंदता येते; तुला कळणार सुद्धा नाही, इतक्या हळुवारपणे, बघ गोंदू का? तशी ती व्रजांगना म्हणाली ''काय रे तुला मनाच्या मनात गोंदता येते का रें? तसा कन्हैय्या म्हणाला; ''अगं तो तर माझ्या हातचा मळ. त्यात काय अवघड आहे?''

असे ऐकल्याबरोबर तिचे अंत:करण व शरीर रोमांचित झाले. ती हर्षनिर्भर झाली. मुरलीमनोहराचे स्वरूप सौंदर्यपान करण्यात ती देहभाव विसरली. डोळे मिटले तरी श्यामसुंदर व उघडे ठेवले तरी तोच श्यामसुंदर अशा महाभावात ती व्रजांगना विरघळून गेली. आनंदकंद आनंदघनाशी एकाकार झाली. स्वानंदसुखाचा असा महाअविर्भाव त्या सुखसागराच्या स्मरणातच एकवटलेला असतो.

* * * *

# चिंतन ५३

विचार, श्वास किंवा नामस्मरणातून येणारा अनाहत ध्वनी, यांच साक्षीत्वाने निरीक्षण, यापैकी जे साधेल, सोप वाटेल, त्या मार्गाने ध्यानाची बैठक साधली म्हणजे कर्त्याचे आपण द्रष्टे/साक्षी होतो.

अशा अनुभवातून खोल-खोल जाताजाता, मग साक्षीत्वाच्याही साक्षीत्वान बघण जमू लागत. मग अखिल जीवनात एक नित्य-नूतन कोरेपण लाभत!!! मग व्यवहारकाळी सुद्धा, जाऊ तेथे जाताना, गेल्यावर, करताना, केल्यावर, शरीराने, शरीरात, भोवताली जे जे घडत, त्याच अलिप्तपणे निरिक्षण घडू लागत, जागृतीच अस निरीक्षण साधल की मग झोपेचही आपोआप घडू लागेल.

एकदा का हा जागेपणा प्रकट झाला, म्हणजे ध्यानापासून/ नामस्मरणापासून अगदी रोजच्या व्यवहारात तो उतरू लागतो. हा पालट अकस्मात घडतो. कुणामध्ये ही क्रांती कुठल्या क्षणी घडेल काऽही सांगता येत नाही. (अर्थातच साधना करणाऱ्याच्या).

मात्र साधक आसुसलेला पाहीजे. सावध-साक्षेपी-दक्ष असेल त्यालाच ही जागृतता लाभेल. श्वास आणि प्रश्वास मिळून जस श्वसन तस निद्रा आणि जागृती मिळून हे जागेपण!!! **"निदे परौते निदेजणे। जागृती गिळूनि जागणे।।"** असं श्रीज्ञानोबाराय या बोधाचं वर्णन करतात. झोप कमी, पण विश्रांती भरपूर पूर्णत्वाने; या स्थितीत जगू लागल की लोक, आप्त स्वकीय वेडा/वेड म्हणतात. त्यांना तस म्हणू द्या. आपण उत्तर देऊ नये. ध्यानासहित जीवन ही महावस्था.

महावस्था म्हणजे कर्मात सहजता, सोपेपणा, न थकता-कंटाळता, तणावरहित कर्म, क्रिया करीत असताना आणि झाल्यावर त्यातून मोकळेपणा,

मागच्या-पुढच्या क्षणाचा कोणताच लेप नाही अशी सहजस्थिती म्हणजेच महाभाव!!!

या महाभावात गाढ प्रगाढ झोपेतला शांतपणा, शिथिलपणा जागृतीतही अगदी तसात टिकून रहातो.

अशा अवस्थेत आपला आपल्या मनाशी एक वेगळा संबंध, वेगळ नांत जुळू लागत. आपला आपल्या मनाला स्पर्श होत नाही; आपण त्याला दूरून, त्रयस्थपणे न्याहाळतो. यामुळे 'मी'च केंद्र हरवत. म्हणूनच पराधीनता संपते. आत-बाहेर अस काही नसत. वाळलेल्या पानासारखी निर्हेतुक, अकारण अशी हालचाल घडते. त्याला ना बीज - ना अंकूर. 'मी'च्या हालचालींचा शोध घेता-घेता, 'मी'चा अंत होतो. (म्हणजे स्वरूपाकारता उरते). काळ-स्थळ हरवतात. राहातो तो भूत-भविष्य निरपेक्ष वर्तमान. बुद्धीच-बोधात रूपांतर होत. म्हणजेच मनाच अ-मन झाल.

आता साधनेतच साध्य सापडल. आपला सहजपणा गवसतो. हीच ती पराभक्ती. हा परमशांतीचा अथांग डोह आहे. सुखामृताचा सागर-महासागर आहे. आहे त्या सुखाचा-आनंदाचा अनुभव (आधी शोध) म्हणजे परमार्थ. नाही ते शोधत बसण म्हणजे प्रपंच.

ही जागृतता-स्वरूप जागृती चिरशांतीने-प्रशांतीने भरून जाते. सगळ जीवन ओतप्रोत व्यापून टाकते. पहाणाराच हरवतो. पण पहाणे चालूच. करणारा 'मी' हरवतो पण कर्तव्य सुरूच. "**देव पहावया गेलो। तेथे देवचि होऊनि ठेलो।**" द्रष्टा, दृष्य, दर्शन त्रिपुटातले दृक् मात्र उरते.

जीवनाला परिघ नसतो/उरत नाही; त्यामुळ त्रिज्या-व्यास, केंद्र काहीच नाही. सर्व काही अथांग-अमर्याद. याच जीवनातून आपली मूळची प्रेमस्वरूपता/पराभक्ती स्त्रवू लागते. या अमृतस्त्रवाचच नाव आहे नाम. रामकृष्णहरि. समाधीचही संजीवन नाम.

* * * *

# चिंतन ५४

नामस्मरणाच्या योगे मनोवृत्तीची एकाग्रता होण्याला खूपच मदत होते. नामस्मरण हाच मुळात महायोग आहे.

नामस्मरणाच्या गाढ अभ्यासाने भूत व भविष्य यांचे स्मरण/चिंतन, या मनाच्या दोन्हीही वृत्ती बंद होतात. या मुख्य दोन प्रकारच्या कल्पना जर बंद झाल्या तर सहजच चित्तवृत्तिचा निरोध होतो.

नियम असा आहे की, कोणचाही शब्द वारंवार उच्चारला तर त्याच्या द्वारा चित्ताचा लय होतो; परंतु भगवंताच्या नामावाचून इतर शब्दामध्ये जड संबंध असल्यामुळे मन जरी एकाग्र झाले तरी त्याची शुद्धी होत नाही. त्यामुळे परमार्थात नुसत्या असल्या एकाग्रतेचा उपयोग नाही. श्रीहरिच्या नामाची गोष्ट मात्र तशी नाही. परमेश्वराच्या नामाचा, त्याच्या गुणसामर्थ्यासहित उच्चार व स्मरण, यात परमपावित्र्य आहे. त्यामुळे एकाग्र झालेले मन परमपवित्र होते.

नामाचा उच्चार होत असताना त्या उच्चाराकडे कान देऊन ऐकावयास हवा (तो उच्चार) यालाच म्हणतात नामात लक्ष. वैरूवरी नामोच्चारापेक्षा मनाने नामाचा उच्चार करणे अधिक उपयोगाचे.

सद्गुरू अशा नामकनकाचे दान करत असतात. जीवाचे जीवत्व नष्ट करून "मी वासुदेवच आहे" अशा प्रकारचे अपरोक्षज्ञान देण्याचे सामर्थ्य एका सद्गुरूच्याच ठिकाणी.

आता हा गुरू-शिष्य संबंध कसा असतो? कापूर व अग्नी हे दोन पदार्थ आहेत; जोपर्यन्त ते आपले अस्तित्व स्वतंत्रपणे ठेवीत असतात तोपर्यन्त ते

दोन वेगळे-वेगळे आहेत. एकदा का कापूर व अग्नी यांची भेट झाली, मग मात्र कापराला स्वतंत्र अस्तित्व नाही व अग्निलाही नाही. ते दोन्ही इतके एकरूप होतात की त्यांची वेगळीक/निवड कोणालाच करता येत नाही. या दोन्ही वस्तू इतक्या एकरूप होतात की कापूराचा कापूरपणा व अग्नीचा अग्नीपणा शिल्लकच राहात नाही.

तसाच प्रकार नाम, नामधारक आणि नाम देणारे सद्गुरू यांच्यात आहे. गुरू आणि शिष्य ही दोन व्यवहारात दिसणारी दोन रूपे दिसण्यात निरनिराळी दिसली तरी खुषाल दिसोत, पण एकच नाही. एक म्हणण्याचे पण प्रयोजन नाही. **म्हणोनि शिष्य आणि गुरूनाथु। या दोन्ही शब्दांचा अर्थु। श्रीगुरूचि परी होतु। दोहों ठायी।।** (अनु. प्र. २-६१) आणि या ऐक्याला नेणारे नाम.

असे नाम साधले की मग ''**नाना कापूर आणि परिमळु। कापूरचि केवळु। का गोडी आणि गुळू। गुळुचि जेवी।।** (अनु. २-६३)

* * * *




दिनचर्येत, नियम ठेवण्यात फार सामर्थ्य आहे. जागे होण्यापासून, ध्यान (नामाचे ध्यान) स्नान, पूजा, भोजन, आहार-विहार यापासून शयनापर्यंत सर्व कार्यक्रम घडाळ्याच्या काट्याप्रमाणे ठेवल्यास, त्याचा आपल्या सर्वांगीण प्रगतीस आणि विकासास कसा लाभ होतो ही गोष्ट फक्त अनुभव व प्रयोग यामधूनच दिसून येते. वेळ आणि एखाद्या गोष्टीचे सहचर्य या दोन गोष्टी पाळल्यास आपल्या बुद्धीस व मेंदूसच, संगणकाप्रमाणे आपण अगदी सहजगत्या राबवून घेऊ शकतो.

बर असे करताना, कोणताही मानसिक तणाव वा दबाव अजिबात नसतो. एखाद्या श्वानास अन्न देताना रोज घंटा वाजिवल्यास, एखाद्या दिवशी अन्न न देता नुसतीच घंटा वाजवली तरी कुत्र्याच्या तोंडास लाळ सुटू लागते. आपण तर नरदेहात आहोत. सहसंवेदनांचा उद्‌गम ठराविक वेळ आणि साहचर्य यावर अवलंबून असतो. याशिवाय प्रत्येक सेकंद, मिनिट, तास, दिवस, रात्र, आठवडा, पंधरवडा, महिना, षण्मास व वर्ष अशी कालचक्राची वलये सतत आपल्याभोवती फिरत असतात. या चक्रांतील एका ठराविक क्षणी ठरावित कार्य करण्याची प्रथा/नियम सातत्याने ठेवल्यास काही आवर्तन/प्रदक्षिणा पूर्ण होताच ती क्रिया अधिकाधिक प्रभावी होते.

या सगळ्यामुळे, काही दिवसांनी याचे रूपांतर प्रतिक्षिप्त क्रियेत होते. ज्यावेळी सवयी अंगवळणी पडतात तेव्हा त्याची नोंद मोठ्या मेंदूत न राहता छोट्या मेंदूत राहते.

घड्याळ्याच्या काट्याप्रमाणे साधना, उपासना, अधिक करणाऱ्याच्या बाबतीत तो घड्याळाचा गुलाम बनतो, हे एका अर्थाने खरे असले तरी त्याच्या या गुलामगिरीमुळे तो साधक प्रत्यक्ष काळास आपला गुलाम बनवतो हे नाकारून चालणार नाही. या सगळ्याचा परिणाम साधकाच्या जीवनात सुरळितपणा येऊन तो प्रगती, विकास व आत्मोन्नतीच्या मार्गावर अत्यंत वेगाने दौडू लागतो.

या सगळ्या कायिक, वाचिक मानसिक क्रिया वेळापत्रकानुसार होत असतांना एका गोष्टीचे सतत भान राखले पाहिजे की आपली कोणतीही क्रिया आपल्याला भगवंतापासून दूर नेत नाही ना? आपल्या साधनेत त्यायोगे व्यत्यय तर येत नाही ना? आपल्या परमार्थ प्रवासात अडथळा आणत नाही ना? एवढे भान राहिले म्हणजे मग बस्. आणिक काही नको. यामुळे कोणत्याही क्रियेमध्ये आपले अनुसंधान नामाशी, म्हणजेच प्रत्यक्ष भगवंताशी राहते.

* * * *

# चिंतन ५६

उपासनेचे, साधनेचे फळ भगवंताचा साक्षात्कार, मध्यरात्रीचा निबिड अंध:कार संपल्यानंतर उष:काल होऊन जसा त्यानंतर सूर्योदय होतो; त्याचप्रमाणे साधनेनंतर, श्रीहरिगुरूकृपारूप उष:काल होऊन भगवद्साक्षात्काराचा सूर्योदय साधकाच्या जीवनात होतो. आत्मज्ञानाची प्रकाशकिरणे पसरून जीवनातील अज्ञानांध:कार पूर्णपणे नाहीसा होतो.

साक्षात्कार हीच मानवीजीवनाची खरी सफलता आहे. साक्षात्कार-साक्षात्कार म्हणजे तरी काय? तर साक्षात्कार म्हणजे भगवंताचे अपरोक्ष ज्ञान, प्रत्यक्ष ज्ञान, परमेश्वर मन बुद्धीला अगम्य आहे. मग त्याचे ज्ञान कसे होणार? या प्रश्नाचे उत्तर सगळ्या साक्षात्कारी साधूसंतांनी छन दिलय!!! परमेश्वर स्वानुभूतिगम्य आहे; अपरोक्ष ज्ञानाचा विषय आहे. असे शास्त्राचे पण उत्तर आहे. म्हणजे तरी काय अस विचाराल तर **''देव होऊन, देवाशी तन्मय, तदाकार, तद्रूप, तल्लीन अगदी एकरूप होऊनच देवाला जाणावे लागते''** आणि अशा प्रकारे भगवंत जाणून, भगवंतच होऊन, पुन: त्याची अत्यंत प्रेमभावाने सेवा करावयाची. हे भक्तिप्रेमसुख मोक्षापेक्षा नितांत अमृतस्वरूप आहे, श्रेष्ठ आहे.

भगवंताचा हा साक्षत्कार तेज, रूप, वर्णन अनाहत नाद, अमृतस्वाद, सुवास, स्पर्श अशा अनेक किंवा एक प्रकारे होतो हा अनुभव आहे.

या देवाच्या साक्षात्काराचे मानसिक, नैतिक व बौद्धिक परिणाम काय होतात?

भगवंताच्या चतुर्भुजरूपाचा/अथवा आपल्याला अत्यंत प्रिय असणाऱ्या सुंदर स्वरूपात त्याच्या सगुण दर्शनाचा अनुभव यावा ही भक्ताची तळमळ श्री पांडूरंग पूर्ण करतो. "**सुखाचे ओतले। दिसे श्रीमुख चांगले।। सुखाचे मंडण, सुस्वरूप हे गण।।**" पाहता येते (आपण ज्या सगुणस्वरूपाचे ध्यान, चिंतन, स्मरण करू त्याच स्वरूपात)

काया शीतल होते, भक्तिप्रेम ओसंडून वाहू लागते. भक्तिप्रेमानंदात इंद्रियसुखाचाच काय पण देहभावाचाही विसर पडतो.

देहभावाचा विसर पडल्यावर मग कुवासना कुठून कशी ती उद्‌भवतच नाही; पापाचा नाश होऊन दु:ख नाहीसे होते.

यापेक्षाही साक्षात्काराचे चढत्या-वाढत्या पायरीने उच्चतम परिणाम म्हणजे देवाने भार घेतला म्हणून चिंता व भीती राहातच नाही. का तर देवच कर्ता व तो देव भक्तवत्सल आहे म्हणून.

देवच कर्ता आहे अशा अनुभवामुळे/विश्वासामुळे काम नाही, कर्तव्याचे ओझे नाही; प्रपंचाचा भार दूर होतो; मन भगवंतापायी स्थिर होते.

देहबुद्धीच्या नाशाने आपल्या देहातील देवाच्या वस्तीचा/अस्तित्वाचा आनंददायक अनुभव येतो.

या नंतरची साक्षात्काराची विकसितता म्हणजे जीवाशिवाच्या ऐक्याची व ब्रह्मत्वभावाची प्रचीती.

या नंतर "**सर्वं खल्विदं ब्रह्मं**" म्हणजे ज्ञानरायांच्या भाषेत "**भरला घनदाट हरि दिसे।**"

भगवंताच्या दर्शनात खूप-खूप आनंद, नित्यानंद. या आनंदाचा परिणाम अंत:करणात देवाबद्दल अत्यंत गाढ भक्तिप्रेमभाव उत्पन्न होतो. तो नित्य

वाढतच जातो. जेथे आनंद तेथे भक्तिप्रेम हा शास्त्राचा नियमच आहे. ज्यापासून आनंद होतो, तिकडे मन ओढ घेते. याचेच नाव भक्तिप्रेम, आनंद व भक्तिप्रेम या यांच्या अनेकानेक मानसिक प्रक्रिया आहेत. भगवंताचा आनंद व भगवंताचे भक्तिप्रेम यांच्यातून अनेक सद्‌गुण, दैवीगुण आकारास येतात आणि ही गुणांची, भक्तिप्रेमभावाची श्रीमंती अमाप, अतुलनीय, पवित्र परमश्रेष्ठ आहे.

हे सगळे अनुभवास येते नामामुळे. नाम रस आहे; आनंद आहे; सुख आहे, परमशांती आहे. नामच भगवंत आहे. नाम घ्या; नाम गा; नामरस प्या. नाम देवाला बघा. नाम पहा.

* * * *

# चिंतन ५७

माणसाची मानसिक दुर्बलता घालवून त्याची जीवननिष्ठा उन्नत करण्याचे, विकसित करण्याचे आणि बळकट, निर्भय करण्याचे कार्य देवपदाला पोहोचलेल्या संतांनी, आपल्या आत्मसाक्षात्कारी संतांनी केले.

या बाबतीत संतांच/श्रीगुरूंच शिष्यावर केवढ ऋण असत हे सांगायला एक स्वतंत्र ग्रंथनिर्मिती करावी लागेल आणि कितीही ग्रंथ लिहिले तरी त्यात ते पूर्णपणे मांडता येणार नाही.

श्रीरामकृष्ण परमहंस एकदा अस म्हणाले होते, ''गंगेला जर स्पर्श करायचा असेल तर उगमापासून ते गंगा सागराला मिळते तेथपर्यंत प्रत्येक थेंबाला स्पर्श करीत जाव लागत नाही, एका ठिकाणी स्पर्श केला तरी गंगेला स्पर्श होतो. याच प्रकारे श्रीगुरूंचा बोधस्पर्शाच आहे. लोखंडाला परिस वारंवार घासावा लागत नाही. एकदा स्पर्श झाला की बस्. त्याचं (लोखंडाच) चोख सोनच होत ना!!! आणि अस झाल नाही तर त्यात लोखंडाचा दोष नाही. तो दोष परिसाचाच म्हणावयास हवा.

भक्ती म्हटल्यानंतर आपल्या डोळ्यासमोर, अनेक गोष्टी उभ्या राहतात; टाळ, मृदुंग, निरनिराळ्या प्रकारच्या मुद्रा, पूजाअर्चा; निरनिराळ्या उपासनापद्धती, हे आणि कितीतरी विविध प्रकार भक्तीमध्ये येतात. मग भक्ती म्हणजे निश्चित काय व याची सुंदर व्याख्या श्रीज्ञानेश्वर महाराजांनी केली आहे.

**ना तरी तरंगु लहानु। परी सिंधुसी नाही भिन्नु।**

**तैसा ईश्वर मी आनु। नोहेचि मा।।**

**ऐसेनि बा समरसे। दृष्टि जै उल्हासे।**
**ते भक्ती पै ऐसे। आम्ही म्हणो।।**

तरंग लहान असला तरी सिंधूपासून स्वरूपाने भिन्न नसतो, तसा भक्त आपल्या चैतन्यस्वरूपाने भगवंताशी एकरूप असतो. अशी समरसतेची दृष्टी/अनुभूती लाभण म्हणजे भक्ती. समरसता या शब्दामध्ये एक सौंदर्य आहे. अंत:करण आपल्या भगवंताशी/देवाशी सम म्हणजे एकरूप आहेच, पण त्यात भक्तिप्रेमाचा रस ही आहे. तरंग जसा सागरस्वरूपच असला तरी आकार घेऊन सागरावर आणि सागराशीच (म्हणजे तत्वत: आपला आपल्याशीच) खेळत असतो. तसाच भक्त आणि भगवंत/देव आणि दास यांच्यामधला संबंध असतो. हीच ज्ञानोत्तर परा सिद्ध भक्ती.

देव हेम म्हणजे सुवर्ण आहे, तर भक्त त्या सोन्याचेच (म्हणजे त्याचेच) अलंकार आहेत/आहे. बर अलंकारही ओबड-धोबड नहीत, तर नामी म्हणजे मोठे सुबक, कळाशीदार, नाजुक जडण घडणीचे सुंदर मोहक आहेत. ही अनुभूती नामी (म्हणजे नामात) राहिल्याने प्राप्त होते. तरंग पाण्यापासून वेगळा नाही, गोडी गुळापासून वेगळी नाही, तसा भक्त भगवंतापासून वेगळा नाही. "**भक्त म्हणजे विभक्त नव्हे। आणि विभक्त म्हणजे भक्त नव्हे।।**" समर्थांची ही व्याख्या ज्ञानेश्वर आणि तुकाराम महाराजांच्याप्रमाणेच आहे. सर्व संत एकच भाषा बोलतात. जी ज्ञानपूर्ण एकता भक्तिप्रेमाची गोडी सेवन करून पुष्ट झाली आहे तिला भक्ती अस म्हणतात. (अण्णांनी जमेल तशी भक्तीची व्याख्या केली आहे; बरोबर आहे कां???)

या भक्तिभावात अपार सुखराशी आहेत. आनंद, समाधान, शांती आहे. भक्ती ही सजीव आहे. सजीव भक्ती म्हणजे आपल्या भगवंताच/देवाच अस्तित्व सदोदित, सर्वत्र आहे ह्या उत्कट भावनेची सदैव जाणीव. स्मरण.

इतकच नाही तर प्रत्यक्ष अनुभव. आपल्या देवाकड पाहताना ''सुखाच्या/महानंदाच्या रसाच ओतीव अस हे श्रीमुख आहे. धातूच किंवा दगडाच किंवा हाडामासांच अस पार्थिव नाही असा परमश्रेष्ठ भाव असतो/असावा.

हा परमश्रेष्ठ महाभाव लाभावा म्हणून उपासना (म्हणजे साधन काय?) तर मन भगवंताला देऊन टाकण. मग ते नामाच्या, पूजेच्या, कीर्तनाच्या भजनाच्या अगर कोणत्याही माध्यमातून एकदा का आपल्या परमेश्वराला मन उक्तं देऊनच टाकल, स्वत:जवळ काही न ठेवता देऊन टाकल की मग या भक्तिप्रेमसुखात अगदी अंतरंगी रंगून जाण होत.

आनंदाने भक्त आणि भगवंत यांच्यामध्ये ओसंडणारे हे भक्तिप्रेम. दुसऱ्यांची दृष्टी पडू नये. याचा अर्थ माझ्या भक्तीला दृष्ट लागू नये. का??? तर भक्ती अगदी सुकुमार आहे; वचनाचा, शब्दाचाही भार होईल इतकी ती नाजुक, नि:शब्द, शांत, भक्तिप्रेममय आनंदावस्था आहे. तिच्याबद्दल स्वत: बोलूनदेखील त्या आनंदाला धक्का लावू नये. भगवंताशी परमशांतीतून घडलेला एकभाव, एकरस ही भक्ती भक्ताला रमवून टाकते. खरच भक्तीत रमलेला भक्त पाहण्यातसुद्धा आनंदाचा अमृतवर्षाव आहे.

* * * *

# चिंतन ५८

हरिपाठ म्हणताना, आणि अन्य कितीतरी प्रसंगी भावावस्था, भावांची उत्कटता, नाही नाही तर भावसमाधी पाहिली आणि पाहात असतो, ही भावारूढता जास्तीत जास्त सूक्ष्म तितकीच हिमालयासारखी उत्तरोत्तर उत्तुंग व्हावी/होत जावी आणि भावभुकेला भक्तवत्सल भगवंत या भावनैवेद्याने संतुष्ट, प्रसन्न, तृप्त व्हावा हीच त्या दयाघन भक्ताच्या चरणी माथा नम्र करून प्रार्थना.

जेव्हा गाथा वाचू लागलो ना (आता त्याला साठ वर्ष झाली) त्यावेळी अस मोठ्ठ कुतुहल वाटू लागल की एवढ या श्री तुकाराममहाराजांमध्ये आहे तरी काय? गाथेतील त्यांची अभंगवाणी आणि त्यातून दिसणारे महाराज पाहण्याचा मला छंदच लागला आणि महाराजांनी अनेक भावरूपातून पुसटस दर्शन देऊन मलाही तयांची ओढ लावली.

**''जेथे जातो तेथे तू माझ्या सांगाती।''** म्हणून देवाला बरोबर फिरायला लावणारे, **''नम्र झाला भूता। तेणे कोंडिले अनंता।।''** अशी नम्रतेची शिकवण देणारे, भल्यांना कासेची लंगोटी आणि नाठाळाच्या माथी काठी घालणारे, **''निरंजनी आम्ही बांधियेले घर।''** अशी अनुभूती स्पष्टपणे सांगणारे योगज्ञानी आणि त्याच बरोबर **'लडिवाळ तान्हे विठाईचे'** अस म्हणणारे महावैष्णव भक्तराज अशा विविध रूपात महाराजांच दर्शन त्यांच्या पदापदातून होत असे.

होता होता मी श्रीतुकोबारायांच्यावर बेहद्द खूष होऊन गेलो.

त्यांच्याशिवाय मला सूचेनासे झाले. गाथेत रममाण होत असतांना, त्यांच आभाळापेक्षा मोठ असलेलं मोठेपण आणि माझ मातीच्या कणापेक्षाही छोटं असलेल लहानपण विसरून मी त्यांना मनोमन मिठी मारत असे. महाराजही मला अगदी जवळ घेऊन, मोठ्या प्रेमान डोक्यावरून हात फिरवित आहेत असा भास-भाव निर्माण होत असे.

"**विठोबासी शरण जावे। निज निष्ठे नाम गावे।।**" हे वाचल्यावर तत्वज्ञानाच्या/तर्कज्ञानाच्या धुक्यातून एकदम प्रकाशाची वाट दिसू लागली. 'निजनिष्ठा' म्हणजे माझ 'मी'हे स्वस्फुरण नामाशी जोडावयाच, आणि अशा निजनिष्ठेने नाम घेता घेता आपण भगवंताशी जोडले जातो, हे नामसाधनेच वर्म आहे. अस महाराज सायास करून शिकवत असल्याचा विश्वास पटला आणि अशा शिकवणीतून त्यांच्या शब्दामागच्या भावछटा दिसू लागल्या. त्यांच्याच कृपाप्रसादान!!!

तुकोबारायांच्या गाथेत परमार्थपक्षावरच्या विविध भूमिका साकार झाल्यात. आर्त भक्तापासून तो "**तत्वमसि विद्या ब्रह्मानंद सांगे। तेचि झाला अंगे तुका आता।।**" असे छातीठोकपणे सांगणारे, आत्मसाक्षात्कारी, "**आम्ही मागू ऐसे नाही तुजपाशी। जरी तू भीतोसी पांडूरंगा।।**" असं देवाला ठणकावून सांगणारे मातब्बर सख्यभक्त, "**तुका म्हणे पाही। मजपाशी काय नाही।।**" अशी आत्मनिर्भर कृतार्थता, तसेच "**तुका म्हणे युक्ती परिणिली नोवरी। आता दिवस चारी खेळीमेळी।।**" अशी जीवनाची कृतकृत्यता, अशा किती अवस्था? शोभादर्शक यंत्रातल्या नित्यनूतन आकृतीसुद्धा याच्यापुढे फिक्याच. अगदीच नगण्य.

तुकोबारायांचे शब्द साधेच पण ठसठशीत. एवढे भरीव आणि एवढे भावपूर्ण/परिपूर्ण आहेत, की त्यातला एकही शब्द इकडचा तिकडे करता

येणार नाही. हे रचलेल काव्य नसून श्रीपांडूरंग कृपाप्रसादाने स्फुरलेल आहे. ‘‘**बोलविता धनी वेगळाची**’’ ही त्यांची साक्ष आहे. ही अभंगवाणी अंत:करणातली मूलभूत भक्तिप्रेमाची गोडी घेऊन, भक्तिप्रेमरसात चिंब भिजून; प्रकट झाली आहे. जशी, साजूक तूपात तळलेली, नळी पडलेली, रव्याची, खुसखुशीत आणि केशरी पाकात मुरलेली आणि बाहेर काढल्यावर तो पाक ठिबकवणारी जिलेबीच.

जस सागराच्या पाण्याने सागरालाच अर्घ्य द्याव तस श्रीतुकाराममहाराजांना त्यांच्याच शब्दरूप जलौघातील ओंजळभर पाणी घेऊन त्यांच्याच चरणाचे प्रक्षालन करावयाचे. साधक, योगी, ज्ञानी, धर्मोपदेशक आणि भक्त अशा भागवतधर्म मंदिराचे कळस असणाऱ्या तुकोबारायांना ही तरवडाची फुल (म्हणजे अण्णांचे शब्द) भावपूर्ण अंत:करणांनी वहावयाची. त्यांच्याच अभंगाच्या ज्योतींनी त्यांना पंचारती करावयाची नाही का?

आमच्या स्वरूपानंदिनीस सहजपणे साधन करता याव, साधक होता याव, म्हणून या गाथावाङ्मयाच्या निमित्ताने, तुकोबारायांची ही वाङ्मयीन पूजा. ह्या पूजेने प्रसन्न होऊन त्यांनी सर्वांवर कृपावर्षाव करावा हीच त्यांच्या चरणी विनम्र प्रार्थना. सर्वांची भावगंगा भगवत्स्वरूप भक्तीप्रेमानंद सागराशी जाऊन एकरूप व्हावी हीच सदिच्छा.

* * * *




महावैष्णव, भगवद्भक्तांनी खूप जप-तप, उपास-तापास, व्रत-वैकल्ये, जिवांची आखणी करून, मनाला कोंडून ठेवून भक्ती केली नाही. मग कशी केली? बसल्या जागी, निजल्या जागी, उद्योग-व्यवसाय करतांना, अहर्निश त्याला हाक मारली; त्याला आळवल, त्याचच स्मरण केल. भक्तिशास्त्रकारांनी दोन प्रकारे भक्ती सांगितली आहे. एक माकडाच्या पिलाची आणि दुसरी मांजराच्या पिलाची भक्ती. आता माकडाच्या पिलाची भक्ती म्हणजे काय? ते माकडिणीच्या पोटाला घट्ट धरून बसलेल असत; मजेत इकडे तिकडे लपत असत; पण जरा कुठ खुट्ट वाजल की दोन्ही हातांनी ते आपल्या आईला गच्च धरत, पण माजराचं पिल्लू हे पण कष्ट घेत नाही. ते पडल्या ठिकाणाहून आईच त्याला उचलते; आईला ते फक्त हाका मारत. त्याची पुढची व्यवस्था आईनेच करावयाची. तुकोबाराय म्हणतात, ''**निजलिया ठायी पुकारिला धावा ।**''

'निजलिया ठायी' हा शब्दप्रयोग सोपा दिसत असला तरी त्याचा अर्थ असा आहे की, आपल्या स्वत:च्या कल्पना, कामना, विचार, विकल्प ह्या आणि अशा सर्व वृत्ती निजलेल्या म्हणजे शांत झालेल्या असताना अशा अवस्थेत देवालाच त्याच्या नामाने हाका मारावयाच्या ''**तूच हवास**'' असं साकड घालावयाच. बाह्य कर्मकांडाच अवडंबर नाही; इतकच काय तर साध पाणीही घातल नाही तरी चालेल पण एक संतत धार मात्र धरावयास हवी ती त्याच्या नामचिंतनाची!!!

मायबापापुढे लाडक लेकरू कस बोलत? तर सहज साध बोलत आणि त्याच्या प्रेमामुळ आईवडिलांच्या अंत:करणातल प्रेम दुणावत. भक्ताचे भगवंताशी संवाद-वाद-बोल अशा प्रकारचेच असतात.

सतत सांगाती असलेल्या भगवंताशी भक्त अकृत्रिमतेन वागतात. ह्याच अकृत्रिम भक्तिप्रेमभावातून कधी कधी भांडण पण होत; आणि अशा भांडणातून तर भावभक्तीप्रेम जास्तच खुलत असत.

भक्ताला देवावाचून दुसर कोण आहे? त्यामुळे भांडायच झाल तरी त्याच्याशीच भांडाव लागणार; आणि भांडण तरी का? तर तू मला दूर ठेवतोस, मला पाहिल्याबरोबर पांघरूण घेतोस, माझे बोल ऐकतोस आणि न ऐकल्यासारखे करतोस. अस का? आपण एकाच गावचे (आत्मस्वरूप) आहोत, आणि आपल्याच गावातल्या माणसांशी तू अस वागावस, हे बर नाही; हे कुठल गाव? ब्रह्मचैतन्य हेच, ह्या भांडणामध्येसुद्धा एक अपूर्व गोडवा आहे. आंतरिक अवस्थेतल आहे.

अरे देवा, मला जरा भेटलास, एक दोन वाक्य बोललास तर तुझ काय जात? अरे!! तुझ रूप मी चोरून घेईन म्हणून लपून राहिलास का? तुझी एक दमडीसुद्धा मला नको आहे; तर आम्हाला फक्त तू मात्र पाहिजे आहेस. हे अस उत्तुंग, अशा तऱ्हेच मनातल्या मनातलच भांडण आहे. अशा प्रकारच भांडण हा देखील एक भक्तीप्रेमाचाच आविष्कार आहे.

ह्या भक्तिप्रेमात निरनिराळ्या भावछटा असतात. त्यातली एक भावना म्हणजे आत्यंतिक आर्तता. केवढी? ‘‘**चुकलिया माये। बाळ हुरूहुरू पाहे।।**’’ ‘हुरहुर’ हा शब्द किती सुंदर आहे. मूल चुकलेल आहे. खाली वर पाहात आहे. रडत आहे; पण मधेच थोड थांबून, आई कुठे दिसते का? म्हणून आजूबाजूला पाहात आणि दिसली नाही की पुन्हा रडत.

भगवंत अंत:करणात बसला आहे. जिभेवर तोच बसला आहे. तो आतमधून बाहेर कुठे जातच नाही. तो हृदयसिंहासनावर कायमचाच विराजमान झाला आहे. हा भक्ताचा अनुभव आहे/भावविशेष आहे.

सख्यभाव हा पण एक विशेषभाव आहे. तुकोबाराय गोपी भावातून एका ठिकाणी त्याच मनोहर वर्णन करतात.

नभाकडे पाहिल्यानंतर श्रीकृष्णाच्या शरीराच्या सावळ्या रंगाची शोभा आठवते. जीवाला तो जीवापेक्षा जास्त आवडतो. तो विश्वंभर आहे. जीवानेही विश्वंभरासारख व्हायला हव. म्हणजे आपल वेगळेपण टाकून त्याच्याशी एकरूप व्हायला हव.

भक्त केवळ एकाच भावान नाही तर विविध भावछटांनी भक्तिप्रेमरसाच आस्वादन करत असतात. गोकुळात जे जे कोणी होते त्यांच्या त्यांच्या भावामध्ये आरूढ होऊन भक्त ती ती भूमिका जगत असतात.

भक्तिभावाच्या या उपासनेत ताल असो नसो, सूर असो नसो, पण श्रीकृष्ण आतमध्ये आहे की नाही हे महत्वाच आहे. हे उर्जिता भक्ती आहे. ''**तुका म्हणे झरा। आहे मूळचाची खरा।।**'' असा अंतरी उमग पावलेला झरा म्हणजे ही उर्जित भक्ती. ह्या भक्तीत देवाबद्दलची ओढ, तळमळ, भक्तिभाव हा विलक्षण उत्स्फूर्त.

असा हा भक्तिप्रेमाचा झरा, वाहतच राहतो; आणि वाहात वाहात सागराला मिळून सुद्धा पुन्हा वाहतच राहतो.

* * * *

# चिंतन ६०

परमेश्वर एकच आहे व त्याची प्राप्ती करून घेणे हाच अखिल मानवतेचा एकच धर्म आहे. जगातले तथाकथित धर्म **अवडंबर** आहेत. सध्या 'एक जग' अशी घोषणा सुरू आहे. पण देव एकच आहे असे कोणी म्हणत नाही. एकच देवच आहे असे अनुभवास आल्यावाचून एक जग, एक मानवता, एक धर्म कसे होणार? एक देव, एक धर्म तसच एक विश्व, मानवता, विश्वबंधूता नाही का?

खरा धर्म भेदातीत आहे. दैवी राज्याची स्थापना, विश्वमानवाच्या अंत:करणात झाली तरच विश्वशांती प्रस्थापित होऊ शकते.

नामस्मरण करणे हाच खरा धर्म. तुकोबाराय त्याला चोखटा निजमर्ध म्हणतात. नामाशिवाय इतर धार्मिक उपद्व्याप काही कामाचे नाहीत. ध्येय असे असावे की त्यापुढे दुसरे ध्येयच उरू नये. असे ध्येय म्हणजे ईश्वराचा साक्षात्कार. साक्षात्कार हा परमार्थाचा कळस आहे. परमार्थ (म्हणजे भगवंत) ही वस्तू कोणी कोणाला देण्याची नाही; तर ती ज्याची त्याने अभ्यास करून अनुभवण्याची वस्तू आहे. ह्यासाठी सद्‌गुरूकडून मिळालेल्या दिव्य नामाचे स्मरण हा एकच मार्ग आहे. दुसरा यापरता अन्य मार्ग नाही.

नामस्मरण करणारे, नाम देणारे नामधारक कमलाप्रमाणे असतात. कमळ हे एक विशुद्ध, सुंदर आणि परिमल देणारे असे रमणीय पुष्प आहे. त्याची ही रमणीयता अवर्णनीय आहे. जलाशयात, कर्दमातून ते जन्माला येते. म्हणून त्याला पंकज असे दुसरे नाव आहे. चिखलात जन्म असून केवढी त्याची

निर्मलता. आईबाप (चिखल) आणि लेकरामध्ये केवढे हे अंतर. कुठे ती दलदल आणि कुठे हे कमलदल ना? जन्मभूमीतील दोष दूर करून, गुण तेवढे घेऊन, हे पद्मपुष्प आपल्या जन्मजात आकाराला अधिकच फुलविते, वाढविते. मलिन जलाशयातून डोके वर काढून ते आदित्याची आराधना करते. आदित्यच्या दिव्य किरणाने उमलते; आपल्यात त्या सुगंधाला पसरविण्यासाठी ते मंद वायूला विनविते. अशा या कमळातील मकरंद सेवन करण्याकरिता, दशदिशांतून भ्रमरांचे थवेच्या थवे त्याच्याकडे धाव घेतात. त्याच्यातील मधुसेवनाने आनंदभरित होऊन नाचू लागतात; गाऊ लागतात. आपल्याभोवती अशा प्रकारचे आनंदमय वातावरण निर्माण करून, आपल्याजवळ येणाऱ्यांना, आनंद देऊन संतुष्ट करणे हे कमळाचे कर्तव्य.

नेमके असे कमळासारखे कामच नामधारक, नामदास करतात. कोणच्याही कुळात जन्माला आले असताना देखील, पूर्वजांच्या पुण्याईचे उत्तम संस्कार घेऊन आपले जीवन विकसित करतात. नामधारक सदैव चित्सूर्याची, आत्मदेवाची आराधना करतात. बुद्धी नेहमी आत्मविचारात मग्न असते. अंत:करणात केवळ आत्मारामाचेच चिंतन असते. डोळे आत्मदर्शनासाठी अतुरलेले असतात. हे नामधारक त्यांच्याकडे/जवळ येणाऱ्या जीवभृगांना नामाचे परमामृत पाजून तृप्त करतात. "**पियत पियाला भक्तिप्रेमका। सुधरे सबही साथी।।**" अस कवीराजांनी त्याच वर्णन केल आहे. महती गायली आहे. भगवंताच्या भक्तीरसामृतपानाने तृप्त झालेले हे नामदास महावैष्णव सभोवतालच्या जीवाच परमकल्याण करतात.

नामधारक राजहंस आहेत. नुसते राजहंस नाहीत तर परमहंस आहेत. का? तर **क्षीररूप सत नाम है। नीर रूप व्यवहार।**

**हंसरूप कोई साथ है। तत का छाननहार।।**

प्रपंचात ‘‘नाम’’ हे क्षीररूप आहे आणि व्यवहार नीररूप. नीररूप व्यवहारापासून नामाला म्हणजेच भगवंताला वेगळे करण्यास, बघण्यास, अनुभवण्यास सांगणारे नामदास हे राजहंस/परमहंस. ही परमहंस मंडळी भक्ती-भावाचे, आत्मानंदाचे पुतळेच. पण निर्जीव नाहीत तर सजीव.

* * * *

# चिंतन ६१

प्रत्येकाला लाभलेले सुंदर आयुष्य हा ईश्वरी प्रसाद असतो. या आयुष्याला तीन स्तर असतात. आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक. हे तीन स्तर ही जीवनातील वेगळी-वेगळी दालने नाहीत. तर सगळे स्तर मिळून एकच सलग जीवन आहे. जसे सगळे अवयव, सगळी इंद्रिये मिळून एक शरीर तशीच जीवनातील या तीन स्तरांची एकरूपता.

आपल्या वैदिक संस्कृतीमध्ये जीवनाचे आश्रमीय विभाग आहेत. ह्या सगळ्या आश्रमांत गृहस्थाश्रम हा महान. का तर अध्यात्मातील शाश्वत जीवनमूल्ये प्रत्यक्ष जीवनात साकार करण्याची कार्यशाळा म्हणजे हा गृहस्थाश्रम. उरलेल्या तीनही आश्रमांचा जीवनाधार असणारा असा हा समाजव्यवस्थेचा महत्वाचा कणाच म्हणजे गृहस्थाश्रम.

गेली कित्येक वर्षे आपण या श्रेष्ठ आश्रमाच्या राजरस्त्यावरून वाटचाल मोठ्या उमेदीने, विश्वासाने, श्रद्धेने केलीत आणि यापुढेही ही वाटचाल अशीच सुख-समाधानाने होत राहाणारच.

वैवाहिक जीवनातील व्यतीत झालेल्या आतापर्यंतच्या जीवनपटाचे सिंहावलोकन करण्यास हा काही वर्षांचा उंचवटा छान आहे. महत्वाचा एक टप्पा आहे. आपला जीवनग्रंथ कसा-कसा उलगडत गेला हे उंचवट्यावरून उभे राहून पाहताना तुम्हीच आनंदाने, विस्मयाने, थक्क व्हाल. अशी सोनेरी अक्षरांनी भरलेली असंख्य पान या ग्रंथात आहेत आणि अशीच कितीतरी सुंदर-सुंदर पान या ग्रंथाची शोभा, मूल्य वाढवणारी असतील. इतकच नाही तर ओल्या वाळूवर उमटलेली पावले कुणाला ना कुणाला नेहमीच मार्गदर्शन करतात. अनेकानेकांच्या जीवनाची ती आधारभूत आहेत; तुम्ही आक्रमलेल्या

वाटेने जाणाऱ्या पांथस्थांची वाटचाल पण संपन्न होऊन, सारेजण जीवन साफल्याच्या शिखरावर आरूढ होतील.

सततचे परिश्रम आणि व्यवसायातील श्रेष्ठ मूल्ये जोपासून, धंद्याचे रोप लावले. धंदा भरभराटीस आला. त्याच वृक्षाला श्रद्धेने, निष्ठेने पाणी घाला, त्याची गोमटी फळे चाखा. त्या वृक्षाच्या पारंब्या पुन्हा भूमीतून रूजून परत आणिक जोमाने विस्तारतील आणि या वृक्षाची विशाल सावली निरंकार आनंद देत राहील. समाधानाची शीतल छाया देईल.

या जीवनात क्रियाशील, ज्ञानमय जीवनाबरोबर भावमय जीवनाला मोठे स्थान आहे. भावना हे श्रेष्ठ जीवनमूल्य आहे. सगळ्या जीवनाची, क्षणांची मोजणी करताना क्रियामय, ज्ञानमय जीवनापेक्षा भावनामय जीवनाचे क्षणच जास्त असतात.

क्रियेला, ज्ञानाला भावनेची जोड हवी. लहान मूल आईच्या साध्या गाण्याने झोपी जाते. पण ही शक्ती ध्वनीफीतीच्या उत्कृष्ट संगीतात नाही. भावनेचे सामर्थ्य असेच आहे. ते जितके सूक्ष्म तितकेच सर्वस्पर्शी असते. भावनेवाचून क्रियाज्ञान म्हणजे मुठीवाचून तलवार.

भिन्न-भिन्न रूची-आवड-छंद-स्वभाव-प्रकृती (शारिरीक नव्हे) तर गुणात्मक असणारी दोन किंवा त्यापेक्षा जास्त माणसे एका कुटूंबात गुण्यागोविंदाने नांदतात. एकमेकांचा आधार होतात, एकमेकांना धरून राहतात. या सगळ्यांचे श्रेय आहे भावनेला. आपल्याला भाव कळला पाहिजे, तो समजावून घेण्यात पण एक आनंद आहे. सुखी कुटुंबाचा कानमंत्र आहे. भावदर्शन, भावपूजन, भावजीवन, भाव ओळखला, देव कळला. भाव तोचि देव हे भावाचे सामर्थ्य आहे. हा भावानंद आहे. भाव सांभाळावा; भाव वाढवावा. या भाववृक्षाला आनंदाची रसाळ गोमटी फळे येतात.

* * * *

# चिंतन ६२

मायबापास लेकरू किती प्रिय, तुकोबारायांनी म्हटलं "**जीवापरिस ते वाल्हे आवडते**" लेकराला लेकर झाली, नाही नाही नातवंड झाली तरी, मायबापास लेकरू लहानच ना!!! बर दोन पाच असली तर वाटणी/ विभागणी? इथे तर एकुलते एक आणि परत गुणी!! मग? कण्वऋषींची अवस्था बघा ना शकुंतलेच्या बाबत. ते तर ऋषीमुनी.

रागावता येत नाही हे तर खरच. अण्णा साखरेसारखे नाहीत; तर मीठासारखे आहेत. मीठ दोन प्रकारे काम करत असते. ते शुचिकार आणि रूचिकारक आहे. मिठामुळे वस्तूंना शुद्धता येते व स्वयंपाकाला गोडी येते. जेथे लावण आहे तेथे घाण राहणार नाही; अशुद्धता उरणार नाही. अन्नपदार्थात मिठाचे योग्य मिश्रण केल्याने एक आगळा वेगळा 'रसा-स्वाद' येतो. म्हणूनच त्याला 'रसराज' असे म्हणतात. नामदास समाजात रसराजाप्रमाणे काम करतात. आम्ररस त्यातही तो देवगड हापूसचा, पण मीठकणिकेशिवाय त्याची गोडी खुलत नाही.

आण्णांच जीवन पाण्यातल्या मिठाप्रमाणे. भक्तिजनाला आनंद द्यावयाचा. दृष्टीस न पडता पाण्यात, पदार्थात, मीठ कोठे दिसते? पण पदार्थाशी एकरूप झालेले असते. रसाशी समरस होऊन रसाची गोडी, रूची वाढवते.

नामदास असणारे महात्मे हे परमार्थवृक्षावरील दीपगृहाप्रमाणे कार्य करतात. **They are the Light houses on the Pathway to God.** पण ही उपमा कमीच आहे नाही कां? दीपगृहे मार्गदर्शन करतात, आपली जागा न सोडता;

संत-महात्मे साधकाला पोटाशी धरून, प्रसंगी कडेखांद्यावर वाहून नेतात. आईप्रमाणे "**भागलेल्या मज वाहतील कडिये। त्यांचियाने जोडे सर्वसुख।**"

हा भवसागर भयंकर आहे. येथे माणसाला परमार्थाचे स्मरण राहात नाही. त्याची जीवननौका अहंकाराच्या (मग कोणताही आणि अगदी थोडासा सुद्धा) लाटांनी हेलकावे खाऊ लागते. त्यात षड्विकार त्याची ही जीवननौका बुडवू पाहतात, असे असताना ही नौका आपल्या निश्‍चित कायमच्या परमपदाला/ठिकाणाला (स्वरूपसाक्षात्काराच्या घरी) कशी बरे पोहोचणार? कर्तव्य आणि लौकिक-मोह यातली सीमाच कळत नाही ना? मग लौकिकालाच कर्तव्याचे शर्कराअंगुठन मायेच्या गाढ अंधकारामध्ये हेलकावे खात-खात बुडून जाण्याचा संभवच जास्त.

साधकाच्या जीवन नौकेस योग्य दिशा दाखवण्याचे काम कोण करतात? तर हे संतपुरूष. ते आपल्याला ज्ञान-प्रकाश देतात. आपल्या अंतरंगात दडून बसलेल्या, आत्मतत्वास, विघातक असलेल्या आसूरी शक्तीला प्रतिबंध करण्याची प्रेरणा देतात, दिशा दाखवतात. साधन सांगतात, नुसत सांगून थांबत नाहीत, तर आपल्याकडून करून घेण्यासाठी जिवाचा आटापिटा करतात.

त्याचबरोबर भगवंताचे दिव्य स्वरूप आणि त्याचे षड्गुणैश्वर्यसंपन्न वैभव याची कल्पना आपल्याला करून देतात; भगवंताची अप्रत्यक्षरित्या ओळख करून देतात आणि भगवंताकडे जाण्याचा, साधा, सरळ पण निश्चित उत्तम मार्ग ते आपल्याला दाखवतात.

त्या मार्गाने आपण साधक जात असताना, पुढे येणारे अडथळे दूर करतात, "**तेणेची पदे चालो जाता। न पडे गुंता कोठे काही।।**" आपला परमार्थपथावरचा प्रवास सुकर करतात. त्यांनी दाखविलेल्या प्रकाशात आपली

जीवननौका जात राहिल्यास आपल्याला आपले ध्येय (साक्षात्काराचे) गाठता येते; लवकर गाठता येते हे निश्चित.

संत हे परमात्मचैतन्याचे, आध्यात्मिक उर्जेचे आगार आहेत. **They are the power house of Spirituality.** संतांच्या अंतरंगात सच्चिदानंदरूपी आध्यात्मिक शक्ती वास करते. त्यांच्या हृदयात प्रत्यक्ष भगवंतच प्रकट झालेला असतो. तिथेच आपल्याला परमात्म्याचे सच्चिदानंदस्वरूप पहावयास मिळते. देवाच्या अस्तित्वाचा आणि सामर्थ्याचा अनुभव (प्रत्यक्ष) केवळ त्यांच्याच सान्निध्यात, सहवासात, संगतीत आपल्याला घेता येतो. याकरता आपण आपले हृदययंत्र संतस्वरूप जनित्राकडे (Generator) नेऊन, त्यांच्या अनुग्रहाच्या संस्पर्शाने/अमृतदर्शनाने त्याला सचेतन (Charge) करून घ्यावे. त्यांच्या अनुग्रहात्मक संस्पर्शाने, दृष्टिक्षेपाने, भाषणाने, प्रबोधनाने, आपल्यात दैवी शक्तीचा जागर होऊन त्याचे पर्यवसान भगवत् साक्षात्कारात होते. आपले जीवन चैतन्यमय-आनंदमय होऊन जाते. आपल्या पूर्वपुण्याईच्या महद्भाग्याने हे भगवंताचे लाडके भक्त आपल्याला भेटतात.

* * * *

# चिंतन ६३

जीवनात भाग्याचा, महद्भाग्याचा, सुवर्णाक्षरात लिहून ठेवावा असा दिवस जर कोणता असेल तर तो दिवस म्हणजे ज्या दिवशी समर्थ श्रीगुरू परिपक्व अंत:करण असलेल्या मुमूक्षूला सबीज नाम देतात, त्याच्या चित्तात नारायणस्वरूप दिव्य नामाचे बीजारोपण करतात हा दिवस म्हणजे खऱ्या अर्थाने पुनर्जन्म. हे लाभलेले परमार्थिक नवजीवन अत्यंत प्रभावशाली असते. श्रीगुरूंनी आपल्या हृदयात पेरलेल्या या नामबीजाचे साधन करता करता कालक्रमाने, आकर्षक अशा आत्मानुभवस्वरूप फळपुष्पांनी लगडलेला सुशोभित असा विशाल वृक्ष होतो.

श्रीगुरू सबीज नाम आपल्या आत्मानुभवाच्या दिव्य शक्तीसह नामधारकाला देत असताना त्याला बोध करत असतात. "तुझ्या निजस्वरूपाकडे लक्ष असू दे. भगवंताला विसरू नकोस; नियमितपणे नामस्मरण करीत जा." नामधारकाने हे शब्द कधीच विसरता कामा नये.

स्वतंत्रपणे विचार करण्याची पद्धत, सत्याचे संशोधन करण्याची पद्धत आणि विविध प्रचलित मता-मतांमधील गुण-दोष जाणून घेण्याची हातोटी श्रीगुरू शिकवत असतात. श्रीगुरूंच्या विचारांचा, आचारांचा प्रभाव जसा नामधारकांवर पडतो तसाच प्रभाव नामधारकाच्या सद्‌गुणांचा, निष्ठेचा, नियमांचा, सद्‌गुणांचा प्रभाव श्रीगुरूंवर पडतो आणि यामुळे गुरू-शिष्यांमध्ये एकप्रकारची आत्मीयता आणि मातापिता-पुत्र/कन्या भाव सहजच निर्माण होतो. हा भावबंध नामधारकाच्या परमार्थिक उन्नतीच्या दृष्टीने फार-फार बहुमूल्याचा असतो.

नामधारकाने आपली नामनिष्ठा कशी वाढेल याचा सातत्यानी विचार करावा; आणि नुसता विचार न करता त्यासाठी प्रयत्नांची, अभ्यासाची पराकाष्ठा करावी.

नाम-साधनेत सद्गुण-संपादन ही भावात्मक बाजू (Positive Aspect) आहे. परमार्थमार्गात हे सद्गुण कोणते? तर परमार्थ कसा आचरणात आणावयाचा? संसारातून मुक्त होण्याकरिता, गुप्तरूपाशी म्हणजे परमात्म्याशी एकरूप झालेल्या सद्गुरूंना शरण जावे लागते. त्यांच्याकडून अनुग्रहासहीत सबीज नाम मिळाल्यानंतर सदैव पारमार्थिक ध्यानात राहावे. हाताने काम, मनातून नामस्मरण करावे, परमार्थात अडथळे आले, संकटे आली तरी देखील भगवंतावरील श्रद्धा कायम ठेवावी. भक्ती अखंड-अव्याहतपणे अंत:करणपूर्वक करावी, परमार्थाचा अनुभव घ्यावा.

नामधारकाची परमार्थसोपानातील पहिली पायरी ही "परमार्थप्रेरणा" तर शेवटीची पायरी जर कोणती असेल तर "पारमार्थिक वैभव."

मनुष्याच्या मनात परमार्थाबद्दल प्रेम-श्रद्धा-विश्वास निर्माण होण्यास अनेक गोष्टी कारणीभूत होतात. आपणातील भ्रम व अज्ञानाची जाणीव, विश्वातील अलौकिक सौंदर्य आणि अद्भूतता हे सर्व दृष्य विश्व पाहून, आपल्यात निर्माण होणारे, आनंद-भय-आश्चर्य-जिज्ञासा हे भाव. त्याच बरोबर विश्वात दिसून येणारी कर्मे व त्यांच्या फळातील विषमता, जरामरणाचे भय, जीवनातील असहाय्यता आणि त्याचबरोबर त्यातील क्षणभंगुरता यांचा अनुभव, या आणि अशा अनेक गोष्टी परमार्थाकडे आकर्षित करणाऱ्या आहेत, पण कोणाला? तर डोळसपणे त्या दृष्य विश्वातल्या घडामोडी पहाणाऱ्याला. डोळसपणे पाहतांना आपल्याला कळते "अरे मूर्ख मानवा, तुझा अहंकार सोडून दे, अनन्य भावाने भगवंताला शरण जा. तोच एकटा

तुला यातून वाचवू शकेल. या करिता तुझे मन भगवंताच्या चरणावर स्थिर होऊ दे आणि हे मन स्थिर होण्यासाठी श्रीगुरूकृपाप्रसादाने प्राप्त झालेले सबीज नाम हाच एक तरणोपाय आहे.

नाम वाढल्यास सत्संगाची अत्यावश्यकता सद्‌वस्तू ज्यांनी ओळखली त्यांचा सहवास म्हणजे सत्संग. त्यांचा संग म्हणजे परमात्मवस्तूचाच संग. का? तर ते साक्षात भक्तीप्रेमाच्या मूर्तीच असतात. भक्ती ही सर्वांची जननीच आहे. भक्तिजनित आणि भक्तिपोषित असा भगवंताबद्दलचा भक्तिभाव हाच नामसाधनेतला, नामस्मरणाचा केंद्रबिंदू आहे.

अशा तऱ्हेने नामाचे मौनपणे, प्रेमाने,भावाने, एकाग्रतेने, दिवस-रात्र, देहात शक्ती असेपर्यंत नामस्मरण केले की आपल्यातील भाव जागृत होतो; तो भाव भगवंताच्या करुणेला पात्र होतो. मग त्या कृपाप्रसादाचे दर्शन होते. कधी ज्योतिरूपाने, नादरूपाने, आत्मरूपाने, सगुणरूपाने, आनंदानुभवरूपाने भक्तासमोर येतो; त्याला शांत-पुष्ट-तुष्ट करतो.

भगवंत दर्शनाचा हा अमृतानंदरस पिऊन भक्त आनंदाने बेहोष होतो आणि त्या आनंदात विरघळून जातो.

* * * *

# चिंतन ६४

एका आनंदकंद भगवंताव्यतिरिक्त दुसरे काहीही नाही, हा भाव ज्यावेळी आपल्या अंत:करणामध्ये निर्माण होतो; त्यावेळी त्या भक्तीला अनन्य, अव्यभिचारिणी, निश्चल भक्ती असे म्हणतात. भक्ती ही एक केवळ शारीरिक क्रिया नसून मनाचा तो एक उदात्त, परमपवित्र, रसाळ, मधुर भाव आहे. जेथे अढळ, नितांत, श्रद्धा असते तेथेच भक्ती, भक्तीप्रेम, जिव्हाळा निर्माण होतो.

भगवान् सांगतात ''माझ्या ठिकाणी भक्तीचा भाव निर्माण करावा. परमेश्वर कोठे आहे? कसा आहे? काहीच माहीत नाही. अशा अज्ञात ईश्वराची भक्ति करण्यासाठी, तो काय? हे प्रथम समजले पाहिजे.

भगवंत ही एखादी बिनबुडाची नुसती कल्पना नाही. या विश्वातील एखादी वस्तू नाही; किंवा अन्य जीवांप्रमाणे मर्त्य, मर्यादित व्यक्तीही नाही. तर परमेश्वर ही एक या विश्वामधील प्रचंड मोठी शक्ती आहे. विश्वाच्याही अतीत असणारी अद्‌भूत, अलौकिक, अनाकलनीय, अृदश्य शक्ती आहे. जगताच कारण आहे. जगत्कारण असणारा हा परमेश्वर स्वत:च आनंदस्वरूप आहे.

अशा या आनंदस्वरूप, विश्वनियामक, सर्वश्रेष्ठ, सर्व शक्तिमान, सर्वव्यापी परमेश्वराची अनन्य भक्ती करावी; असा नारदासारख्या भक्ताचार्यांचा संदेश आहे. मग भक्ती म्हणजे काय? तर भक्तीच्या अनेक व्याख्यामधील एक व्याख्या अशी आहे. **''भजनं रसनं इति भक्तिः।''** भगवंताचा, भगवंताच्या षड्गुणांचा आस्वाद घेणे म्हणजे ''भक्ती.'' भजन

म्हणजे रसास्वाद. असा एक अर्थ आहे. ज्याप्रमाणे गाय, बैल आदी प्राणी आपल्यासमोर टाकलेले गवत, वैरण, प्रथम भरभर खातात आणि नंतर एके ठिकाणी शांत बसून रवंथ करतात; पुन्हा पुन्हा त्यातील रसास्वाद घेतात.

त्याप्रमाणे भक्त सुद्धा कीर्तनामधून, भजनामधून, सत्संगामधून, श्रवणामधून, भगवंताच्या सगुण, साकार, मोहक, अत्यंत आकर्षक, सर्वांगसुंदर, रमणीय, प्रसन्न, आल्हाददायक रूप, पुन्हा-पुन्हा आठवतात, स्मरण करतात; त्यामध्ये तल्लीन, तन्मय, तद्रूप होतात. स्वत:चे देहभान विसरतात. भक्ताचे मनच भगवंतात पूर्णत: विरघळून जाते. ''**अधरी तूझे नाम, नयनी तूझे रूप। हृदयी तूझा ध्यास मनमोहना रे।।**'' (स्वरचित) अशी उत्कट भावावस्था प्राप्त होते. याच अवस्थेत भक्ताला भगवंताचे सान्निध्य अनुभवास येते. भक्तिरूपी सागरात भक्त सदैव डुंबतो. पुन्हा-पुन्हा त्यातील आनंद मनसोक्त लुटतो. या अपूर्व अमृतमधुर रसास्वादालाच भक्तिशास्त्रकार काही ठिकाणी भक्ती असे म्हणतात.

भक्तीचा दुसरा एक अर्थ आहे ''भाग'' म्हणजेच वाटणी. भगवंत हा स्वत:च आनंदकंद असल्यामुळे त्याच्या प्राप्तीने भक्ताला निरतिशय, शाश्वत, नित्यानंदाची प्राप्ती होते. म्हणून भक्ताने विश्वातल्या परमेश्वरालाच निवडावे. (Select) करावे. म्हणजे भगवंताला आपल्या जीवनाचा एक अविभाज्य भाग करावा. हीच भक्ती आहे.

भक्तीचा तिसरा अर्थ - ''**भग्जनं भक्ति:।**'' म्हणजे नाश करणे. जी आपल्या अंत:करणातील रागद्वेष, कामक्रोध, लोभ, मोह, मदमत्सर, असूया, द्वेष, स्वार्थ, अविद्या यांचा समूळ ध्वंस करते; तिलाच भक्ती असे म्हणतात.

अशी भक्ती म्हणजे शरणागती. ज्याप्रमाणे नदी सागराच्या दिशेने, सागराशी एकरूप होण्यासाठी रात्रंदिवस अखंडपणे प्रवाहित होते. ज्यावेळी ती

सागराच्या जवळ येते त्यावेळी तिचा वेग वाढतो आणि एका क्षणार्धात ती स्वत:ला सागरामध्ये झोकून देते, स्वत:चे अस्तित्व सागरामध्ये विलीन करते. ती स्वत:च सागरस्वरूप होते.

याचप्रमाणे भक्ताने भगवंताला पूर्ण समर्पण झाले पाहिजे. भगवंतासाठीच जगले पाहिजे. म्हणून नवविधा भक्तीमध्ये **आत्मसमर्पण** ही सर्वश्रेष्ठ भक्ती आहे. मग ही समर्पण भक्ती कशी असावी? श्रीनारद उदाहरण देतात. ''**यथा व्रजगोपिकानाम् ।।**''

भक्ती म्हटली की प्रथम आठवतात त्या वृंदावनामधील गोपी.

भक्तीच्या परमोच्च भावाने भगवंत प्रसन्न होतो. भगवंत भक्ताच्या भावाला वश होतो. परमेश्वर स्वत:च त्या भक्ताचे चिंतन करतो. भक्ताच्या हृदयकमळात भगवंताची स्थापना होते ती भक्तीची सुरवात आणि भगवंताच्या हृदयात भक्ताची स्थापना होते यात भक्तीची परिसमाप्ती आणि हे नामाने साधते.

* * * *

# चिंतन ६५

सगळेच संत आपणास वंदनीय आहेत. ते सर्वचजण महान भगवत्‌भक्त होते व त्या सर्वांचेच बोल आत्मसाक्षात्काराच्या अनुभवातून प्रकट झालेले आहेत. अवघे मिळून एकच एक देहातीत ''वस्तू'' झालेले आहेत.

''**सहज बोलणे हित उपदेश।**'' हा सर्व संतांचा सहज स्वभाव आहे. सर्व संतांनी नामसाधनेचे महत्व वर्णन केले आहे. संसारात गुरफटलेल्या मानवात भाग्यवान कोण व मानवी जीवन-सार्थक कोणाचे झाले याचे फार सुंदर विवरण सर्वजणांनी निरनिराळ्या प्रकारे केले आहे.

''**प्रपंच साधोनि परमार्थ केला। तो नर भला रे भला।।**'' हे शब्द ऐकण्यास गोड वाटतात पण प्रपंच आणि परमार्थ या दोन्हीही गोष्टी साध्य होण्याला फार मोठे भाग्य पदरी असावे लागते. अशी माणसे फार थोडी!!! विरळा.

संसारातील थाट, प्रपंचातले डोळे दिपविणारे वैभव एक नाथराय, त्याबरोबर परमार्थाचे ऐश्वर्य पहा. प्रपंचाचा पाठपुरावा करणारे समर्थ, बंधुभगिनीसह वावरणारे आमचे ज्ञानोबाराय किंवा गृहस्थाश्रमी तुकोबाराय यांच्यापाशी व्यावहारिक, लौकिक वैभव काय होते? पण हे वैभव कणभरही नसताना अखंड आनंद भोगणारे हे खरे खरे भाग्यवान.

''**भाग्याचे भाग्य धन्य ते संसारी।।**'' संसाराला येऊन ज्यांनी आपल्या हृदयमंदिरात भगवंताची - श्री हंसेची साठवणूक केली तेच महाभाग्याचे व तेच धन्य-धन्य. संसार म्हणजेच अनित्यता, अशाश्वता, आज

आहे उद्या नाही अशी स्थिती. अशा अस्थिर स्थितीतही, काळाचे हाती असलेले शरीर काळाच्या मुखी पडण्याचे पूर्वी, पदरी पाडून घ्यावयास पाहीजे. तो भगवंत, साक्षात्काराच्या स्तरावर मिळवून जे मोकळे झाले तेच धन्य. म्हणूनच समर्थ म्हणाले, "**साधूने आपुले। जीत असताच सार्थक केले। शरीर कारणी लाविले। धन्य त्याचे।।**"

तापला तवा आहे, तोवरच भाकरी/पोळी भाजून घेणारी गृहिणी खरी शहाणी; कार्य साधणारी. त्याचप्रमाणे जन्म, दु:ख, जरा, व्याधी यांची पूर्वसूचना ध्यानी घेऊन, शरीर, इंद्रियादी धड आहेत, तोपावेतो ज्याने केवळ भक्तिमार्गाने/भजनमार्गाने/नामस्मरणाने आत्मसुखाचा ठेवा साधून घेतला तोच भाग्यवान, तोच चतुर; तोच शहाणा, तोच धन्य.

हा आत्मानंदाचा खजिना हेच खरे ऐश्वर्य. या ऐश्वर्यात चिंर शांतिसुखाचा महालाभ असून तो केवळ नरदेहातच प्राप्त करून घेता येतो. हे ऐश्वर्य प्राप्त करून घेतले तरच भाग्यवान. यातच खरा पुरूषार्थ आहे. नाथरायांनी तर या भाग्याला "**भाग्याचे भाग्य**" म्हटले आहे. त्यात मोठे स्वारस्य आहे.

एक तर आधी मनुष्यदेह प्राप्त होणे हे पहिले भाग्य. कारण सर्व ८४ लक्ष योनींत मानवदेह हाच सर्वश्रेष्ठ आहे, या देहातच त्याला आपल्या मूलभूत देवत्त्वाची/सच्चिदानंद स्वरूपाची प्राप्ती करून घेता येते. त्यातून परत भारतात मानवजन्म येणे हे त्याच्याही पुढचे भाग्य. भरतखंडी नरदेह प्राप्ती; कारण अध्यात्माला याइतकी सुपीक अशी भूमी भूभागावर दुसरी नाही. "**ईश्वर निष्ठांची मांदियाळी**" अशा आशिर्वादाने भारलेले हे भरतखंड. "**प्रादुर्भूती सुराष्टेस्मिन्**" अस श्रीसूक्तकार पण सांगते ना!!! धन्य, पावन अशी ही आपली मायभूमी. मग अशा ठिकाणी जन्म येणे म्हणजे परमभाग्य होय. या दोन्ही गोष्टी लाभल्यावर, जर मनुष्याने हृदयसंपुटी हरीची साठवण

केली तर मग ‘‘**भाग्याचेही भाग्य धन्य तो संसारी।**’’ असेच त्याचे वर्णन करावयास हवे.

हृदयात हरीची साठवण, जोपासना करणारे स्वत: तर भाग्याचे आहेतच, पण त्यांचे कुलही धन्य; त्यांचे कर्मही धन्य, आणि नामस्मरणाचा त्यांचा ‘‘**स्वधर्मही**’’ धन्य.

धर्म या शब्दाची व्याख्या पाहू गेल्यास अनेकांची अनेक मते दिसतात. त्यात ही पुन: व्यक्तिगत व सामाजिक, आश्रमानुसार–वर्णानुसारअनेक प्रकार. पण भक्त ह्या भानगडीत पडत नाही. त्याची धर्माची व्याख्या अगदी सोपी–सुटसुटीत, आचरण्यास अगदी सोपी, आणि इतकं असून १००% शास्त्राला धरून. ‘**सकल धर्मामधे धर्म। स्वरूपी राहणे हा स्वधर्म।।**’ आणि म्हणूनच आपल्या हृदयकमळात साठविलेल्या हरीशी त्या हरीच्याच गोड नामाने तो एकरूप होतो. नामाशी म्हणजेच भगवंताशी नामधारकाने नामाने अनन्य होणे हाच वैष्णवाचा, महाभागवताचा, भक्ताचा स्वधर्म. ‘‘**धन्य त्याचा धर्म नाम मुखी।।**’’ असं संत म्हणतात. असे हे नाममाहात्म्य आणि त्याची धन्यता आहे.

* * * *



# चिंतन ६६

हे जे पत्रलेखन असते त्या लिखाणात एक सहजता असते. बागेत फुलझाडे लावावी लागतात; पण रानफुले सहज उगवतात. पण कधी कधी ह्या राजफुलांचा सुगंध गुलाबासही लाजवणारा असतो.

आपला मांडलेला भातुकलीचा खेळ कोणी पाहतय न पाहतय याची मुळीच खंत न बाळगता, लहान-लहान पोरी त्या लुटूपुटूच्या संसारातले संवाद जशा सहज पण तन्मय होऊन बोलतात, तशीच ही पत्रातील वाक्ये सहजी कागदावर येतात. अगदी एखादा दाणेदार तेजस्वी मोत्याचा सर ओघळावा अशी.

सुदाम्याच्या पोह्याच्या पुरचुंडीची आणा-रूपैच्या भावाने किंमत करायचीच नसते. लाडू करण्याच्या किंवा साधी लसणाची चटणी का असेना, ती पाठवण्याच्या मागली धडपंड लेकीच्या नामेच्या ओढीने स्पंदन पावणाऱ्या बापाच्या/पित्याच्या हृदयातील स्पंदने/ठोके एक आले पाहिजेत. असल्या अगदी साध्या साध्या गोष्टी पापणीच्या कडा भिजवून जातात नाही का?

असाच एक प्रसंग लिहिण्याचा मोह आवरत नाही. बऱ्याच वर्षापूर्वीची गोष्ट. माझ्या एका लांबच्या आजिला भेटायला त्यांच्या गांवी गेलो होतो. जवळ जवळ २५ वर्षांनी भेट होत होती. माझी चाळिशी उलटलेली. आजी तर ऐंशीच्या पलिकडे. इतक्या वर्षांनी आपला हा नातू आला म्हणून त्यांनी उठत बसत चविष्ट स्वैपाक केला. दुसऱ्या दिवशी जाण्यास निघालो. आजीच्या पुढ्यात नमस्कारासाठी वाकलो. थरथरता हात पाठीवर आला

आशीर्वादाचा आणि मग हळूच त्या आजीनी माझ्या हाती एक नोट ठेवली. मी म्हणालो, ''पैसे कसले? कशाला?''

'अरे खाऊसाठी दिलेत तुला.'ठेव.' आजीच्या लेखी आपण खाऊच्याच वयाचा होतो. श्रीहरिगुरूकृपेने मोठमोठ्यांच्या हातून, हार-तुरे, भेट, बिदागी, सत्कार स्वीकारण्याचे प्रसंग कितीतरी. पण खाऊ देणारे आपल्याला कोणीतरी आहे हा विचार मला पुन्हा माझ्या बालपणात नेऊन सोडणारा होता आणि ''**बाळपणीचा काळ सुखाचा.**''

बोलल्यासारखे सहज लिहिणे कर्मकठीणच. पत्र कस असाव? पूजा संपल्यावर रिकाम्या देवघरात अगरबत्तीचा आणि फुलांचा गंध दरवळतो अशी. पुजाऱ्याने ज्या निरागस भावनेने पूजा केली त्याच श्रद्धेने, भावाने पत्रे वाचावीत, उत्तरे लिहावीत अशी सद्‌भावना व्यक्त करण्यापेक्षा अण्णा तरी याहून अधिक काय लिहीणार? नुसत वाचू नये, लिहू नये. मग तो भाव, भक्तिप्रेम मनी धरावा.

* * * *

# चिंतन ६७

मुक्काम करत करत, ''ज्ञानोबा-तुकाराम'' या संतश्रेष्ठद्वयीच्या नामाच्या जयघोषात, संतसज्जनांच्या गोड अमृतमधुरवाणीचा रसास्वाद, टाळमृदुंगाच्या तालावर, श्रुतीच्या मंजुळनादात सेवन करत, पंढरीरायाचे लाडके डिंगर, ज्ञानेबारायांच्या बरोबर आज येथे आले. अण्णाला या सगळ्या अमृताभिषेकात सुस्नात होण्याची सुवर्णसंधी मिळते हे त्याचे महद्‌भाग्यच.

पूर्व जन्मी थोर सुकृते झाली असल्यासच आणि या जन्मी सद्‌गुरूंची कृपा झाली तरच नामस्मरण करून आत्मसाक्षात्कारसुख प्राप्त करून घेण्याकडे मनुष्याची बुद्धी वळते. या नामस्मरणसाधनेस आपला भगवंतानी दिलेला देह, इंद्रिय, मन आणि बुद्धी या सर्वांची साथ लागते. नाम हा अध्यात्मसाधनेचा पाया आहे. ''**न अन्यः पन्था विद्यते अयनाथ**'' असे प्राचीन काळच्या ऋषीमुनींनी आपले बाहू उभारून एक स्वराने सांगितले आहे. एका नामाखेरीज या जगात इतर कोणतेच पवित्र-पावन नाही असे सर्व काळातील, धर्मातील, पंथातील, संप्रदायातील आत्मसाक्षात्कारी संतानी ठामपणे, आत्मविश्वासपूर्वक सांगितले आहे. हा नामपाश टाकून जिता-जागता विठ्ठल कोंडता येतो; परमात्म्याला बांधून घालणारे, पकडून ठेवणारे हे नाम आहे तरी काय?

देवाच्या अनंत नावापैकी एखाद्या अगर अनेक नावांना सर्वसाधारणपणे ''नाम'' म्हटले जाते. परमात्म्याचे अनंत गुण आहेत. अमर्याद आहेत. अपरिच्छिन्न आहेत हे गुण. त्याच्या प्रत्येक गुणानुसार त्याला एक-एक नाव

प्राप्त झाले आहे. अखिल गुणनिधान अनंत भगवंत हजारो नावांनी नटला आहे. उदाहरणार्थ तो विश्वव्यापी आहे, म्हणून "विष्णु" असे त्याला नाव पडते. त्याच्या कल्याणकारी गुणामुळे त्याला "शिव" असे नाव दिले गेले. अवघ्या दृष्यविश्वाकाराचा ग्रास करणारा म्हणून "काळ" या नावाने तो ओळखला जाऊ लागला. भगवंताच्या अशा गुणापैकी एखादा अगर एकापेक्षा अधिक गुण ज्या व्यक्तीमध्ये प्रकर्षाने दिसून आले अशांना देव मानून त्यांच्या नावाला देवाचे नाम असेही लोक मानू लागले. कवीच्या कल्पनेतून उमटलेल्या काल्पनिक वर्णनांना आकार देऊन, त्या त्या आकाराला एक एक नाव देऊन त्यालाही देवाचेच नाम असे लोक समजू लागले. म्हणून **"राम हा कालचा। सुत दशरथाचा"** असं सांगण्याची पाळी श्रीतुकोबारायांच्यावरही आली. मानवी देहाचे नांव नामाची जागा घेऊ शकत नाही, अलंकारू शकत नाही. असं संतांनी स्पष्टरीत्या सांगितले आहे.

**"NAMA is the symbol of the Divine." नाम हे देवाचे प्रतिक आहे.** देव जसा निर्गुण-निराकार आहे, तसेच नामही निर्गुण निराकार आहे. श्रीसद्‌गुरूंकडून मिळालेल्या नामाचे ध्यान करताना, त्या नामाचे सूक्ष्मवाणीतून अंत:करणात स्मरण करतांना त्या ध्यानाच्या/स्मरणाच्या अतींद्रिय अवस्थेत साधकाचा आत्माराम आपले रूप अक्षररूपाने आपणच पाहतो, अगर ऐकतो. साधनाच्या वेळी त्रिपुटींचा (नाम-नामी आणि नामधारक) लय झाल्यामुळे अशी अक्षरे साधकाच्या अनुभवाचा (अतींद्रिये) विषय होतात. अशी अक्षरे म्हणजे आत्मारामाचेच अक्षरनाम स्वरूप अविष्कार असतात. म्हणून अशा आत्मरूपी अक्षरांना देवाचे प्रतिक म्हणजे नाम असं म्हणतात. नामाचा अर्थ इतक्या विश्लेषणानंतर सहज लक्षात आलाच असेल.

अशा नामाच्या प्रत्येक अक्षरा-अक्षरात ध्यात्याची आत्मशक्ती भरलेली

असते. अशा एक किंवा जास्त अक्षराच्या समुहाला नाम म्हणतात. असा नामाचा अनुभव आला तरी आत्मारामाच्या अगर आपल्या सद्गुरूंच्या आज्ञेखेरीज ते नाम दुसऱ्याला देता येत नाही. जरी दिले तरी फळ मिळत नाही. मिळेलच असे सांगता येत नाही. अशा निर्गुण नामाचा साक्षात्कार आणि ते इतरांना देण्याचा अधिकार ज्यांना मिळाला असेल त्याना सद्गुरू म्हणतात. अशा निर्गुणस्वरूप नामाशी एकरूप झालेल्या सद्गुरूकडून मिळालेल्या अक्षर अगर अक्षरसमुदायास नाम/सबीज नाम म्हणतात.

श्रद्धा हा नामस्मरणाचा पाया आहे. श्रद्धायुक्त नामस्मरणानेच आत्मसाक्षात्काराचे अमृतफळ मिळते. “**यो यत् श्रद्धः स एव सः**” असं भगवान् श्रीकृष्णांनी गीतेत सांगितल आहे. केवळ श्रद्धेच्या बळावर एकलव्याने धनुर्विद्या मिळवली. अण्णाला नाम मिळाले ते वै. प. पू. गुरूवर्य मामा/सोनुमामा दांडेकरांकडून. परंतु श्रीज्ञानेश्वरमहाराजच आपले श्रीगुरू अशी दृढ श्रद्धा आण्णाची.

नामस्मरणस्वरूप प्रेमलक्षणा भक्तीला भावाची नितांत गाढ आवश्यकता. जेथे भाव तेथे देव आहेच; पण या भावाचा उगम श्रद्धेत आहे. “**जैसे जयाचे भजन। तैसाचि देव होय आपण।**”

परवा अलंकापुरी श्रीगुरूज्ञानोबारायांच्या संजीवन समाधिवर “हरिपाठ रहस्य” अशा अक्षररूपांनी मिळाले आहे. चैतन्य स्वरूपात समाधिस्थ असणाऱ्या ज्ञानराजांकडूनच आपणास नाम मिळाले आहे अशा दृढ श्रद्धेने आणि निश्चयाने नाम घ्यावे. नाम कल्याणकारी आहे.

* * * *




आज आषाढी एकादशी. सर्व संतांचे माहेर, विठूरायाच्या नगरीत पंढरीत वास. चंद्रभागेचे स्नान; अनन्त ऐश्वर्य, अनन्त वीर्य, अनन्त यश, आनन्त श्री, अनन्त ज्ञान आणि अनन्त वैराग्य अशा षड्गुणैश्वर्यसंपन्न भागवान रमाकान्त रूक्मिणीरमण पांडुरंगाचे महापूजा-दर्शन; आनंदी-आनंद ना? त्या श्रीविठ्ठलाला सर्वांचा नमस्कार तर सांगितला पण, त्याबरोबर त्या करूणापारावर, दयाघन, सावळ्या, घननीळ, कमलनयन, कमलाकान्ताच्या पायाशी प्रार्थना करून, स्तुतीसुमनांनी पूजा करून, भावाची मंत्रपुष्पांजली म्हणून मंगल आशीर्वादाची, कृपाछायेची मागणी केली. त्याची कृपा आहे. लक्ष आहे. सावली आहेच.

उत्तमदेश, उत्तमकाळ, उत्तमकूळ, उत्तमधर्म आणि ईश्वरनिष्ठ मायबापांच्या पोटी जन्म या सर्वांचा परिपाक म्हणजे शुद्ध सत्वभावप्रधान जीवन. त्या दयाघन परमेश्वराची फार मोठी कृपा आहे.

सत्संग लाभण, लाभतो तो त्याच्या दयेनेच. ही त्याचीच फार मोठी कृपा, सत्संग ही अशी कृपा आहे की जी अत्यंत मोठ्यातला मोठा लाभ प्राप्त करून देते. त्यापरता मोठा अन्य दुसरा लाभच नाही. त्या लाभाला-शुभलाभाला मर्यादाच नाही. किती लाभ घ्यावयाचा ते घेणाऱ्यावर अवलंबून. ही सारी दयासागराचीच दया. त्याची दया आपण जाणतो ती फार थोडीच; पण उत्तरोत्तर आपल्यावर त्याची अधिकाधिकच कृपा होत आहे, असा ज्यांचा भाव, विश्वास, श्रद्धा असते त्यांना लवकरात लवकरच भगवत् प्राप्ती होते.

ही भगवन्ताची दया (आपल्यावरील) एक त्या श्रीहरीची लीलाच आहे. आपलं समग्र जीवनच त्याच्या अनंत लीलापैकी एक लीला आहे हा भाव असावा.

एका परमेश्वरालाच सर्व ठिकाणी जो पहातो, तो जे काही करत असतो, वागत असतो, बोलत असतो, भगवान म्हणतात, "तो माझ्यामध्येच, माझ्यासाठीच जगत असतो." सगळ्यांना भगवन्ताचेच स्वरूप मानून त्यांच्याबरोबर त्याचे जे वर्तन असते, ते वर्तन भगवन्ताबरोबरच होत असते. सगळ्या कृती, क्रीडा, नाही अवघे जीवनच भगवन्ताबरोबरच. मी त्याच्याबरोबर खेळत आहे, बागडत आहे, रममाण होत आहे. हाच नित्य अनुभव. या अनुभवातील परमानंद आणि परमशांतीचे वर्णन काय करावे नां???

या अनुभवासाठी ज्या ठिकाणी डोळे व मन जातील तेथे त्या सावळ्या राजस सुकुमार राधारमणासच पहावे!!! जसे गोपिका श्रीकृष्णाला बघत होत्या, नंदलाल तर त्यांच्या डोळ्यातच वसत होता; त्यांच्या हृदयकमळीच विराजमान झाला होतो. याचा अर्थ असा की, जी वस्तू नेत्रामध्ये निवास करते, तीच मग बाहेरही सर्वत्रच दिसू लागते. अशा प्रकारे आपण त्या आनंदकंदास आपल्या डोळ्या, हृदयांत बसवावं.

भगवान म्हणतात, "मग मी त्याच्या दृष्टीच्या टप्प्यातून दूर जाऊच शकत नाही रे" आणि तो भक्तही माझ्यापासून कधीच दूर होत नाही.

सर्व प्राणीमात्रांच्या ठिकाणी जो मी आहे, त्या परमात्मस्वरूपाच्या ठिकाणी स्थितता. अशा स्थिततेत, मग जगात जो आपल्या शीराने वर्णन करतो, हे अवघे ब्रह्मांडच परमात्म्यात स्थित आहे. अशी ज्याची अनुभूती. मग तो परमात्मस्वरूपातच वागत असतो. सगळेच जर परमात्म्यामधे तर मग त्याचे स्थूल शरीरदेखील परमात्ममयच. मग त्याच्याशीच तल्लीनता.

एकरूपता. एकरसता. सगळच्या सगळ जीवनच परमेश्वर समर्पित.

अशा प्रकारे श्रीहरीला समर्पित झाल्यावर भगवन्त देखील आपण स्वत:हून भक्ताला समर्पित होतात. हे त्या सर्वज्ञ सर्व सत्ताधीशाचे केवढे औदार्य ? केवढी दया ? केवढी कृपा ना ?

असा हा प्रेममय, आनन्दमय, चिन्मय, ज्ञानमय भगवंत. त्याच्या भक्तिप्रेमाचा विषय इतका सखोल, अथांग आहे की, वाचेची गतीच नाही की, ती त्याच्या ह्या प्रेमभावाचे वर्णन करू शकेल.

आपण काय करावे ? तर त्याच्या गोड, गोड़ाचेही/गोडाहून गोड नाम + रूपाचे चिंतन, स्मरण, ध्यान करावे.

* * * *

# चिंतन ६९

श्रीपांडूरंगकृपेने यंदाची आषाढी वारी सेवा झाली. खिरापतीचे भजन झाले. द्वादशीची पारणा झाली. विठाईमाऊलीचा निरोप घेतला!!! **''हेचि मज घडो जन्मो-जन्मांतरी। मागणे श्रीहरि नाही दुजे।।''** म्हणून प्रार्थना केली. **''कन्या सासुऱ्यासी जाये''** अशी जीवाची उलघाल. **''कधी भेटसी केशवा''** ही परत भेटण्याची ओढ. हा सगळा भक्तिप्रेमाचा खेळ.

आपला श्रीविठ्ठल हा भक्त पुंडलिकासाठी, गोकुळातून पंढरपुरास आला. तो संपूर्ण रस, संपूर्ण आनंद आणि सगळ्या शोभा-सौंदर्यादी गुणांचा मूलभूत समाश्रय आहे. तो समस्त ऐश्वर्य, माधुर्य, वीर्य, शक्ती, ज्ञान, योग यांचा मूल आश्रयतत्व आहे.

ज्या भगवंताच्या ऐश्वर्य आणि माधुर्याने समस्त जगत लालाभित आणि मोहित झालेले आहे; तोही आपल्याच गुणांवर मोहित झालेला आहे. तोच परमात्मा निजमनमोहन, भुवनमोहन, भवनमोहनसुद्धा. ज्या भक्तीप्रेमाने मोहित होतो, भुलतो, वेडा होतो, लाचावला भक्तीसी, हे भक्ती-तत्व किती महान आहे ? हे शब्दाच्या-भाषेच्या द्वारा कोणी कोणाला कसे समजावून सांगणार ना? ते शक्यच नाही.

ही भक्तिच गोकुळातील राधा आहे. भक्ती म्हणजे पूर्णचन्द्र श्रीकृष्णचंद्राच्या पूर्ण विकासाची आधारमूर्ती, पूर्णिमास्वरूपिणी, कृष्णकान्तागण-शिरोमणी स्वयंपूर्ण आल्हादिनी शक्तिच. या वृषभानुनंदिनी राधेचे म्हणजेच भक्तीचे तत्व जीवसमष्टिच्या भाषेत नाही समजावून सांगता येणार!!!

भक्तिभावाने आणि भक्ती तेजाने ज्याचा श्रीविग्रह सुशोभित झाला आहे, तो भगवंतच ह्या भक्तीचा महिमा थोडा फार सांगू शकेल. अथवा त्याचे परमभक्त, त्याच्याच आणि भक्तीच्याच/राधेच्या कृपेनेच भक्तीविषयक थोड-बहुत सांगू शकतात. अण्णासारखा एक अतिसामान्य भक्तीमहिम्याच्या सावलीससुद्धा स्पर्श करू शकत नाही.

व्रजरसनिधी, श्यामसुंदर, व्रजेन्द्रनंदन श्रीकृष्णचंद्र म्हणजेच रूक्मिणीरमण हा अनादी, सर्वादी, सर्वकारणकारण, सच्चिदानंद धनविग्रह, अद्वयज्ञानतत्वस्वरूप आहे. त्याच्याबरोबर त्याची हृदिनी शक्ती राधिका/भक्तीचा नित्य अविच्छेद्य संबंध आहे. ''राधा-कृष्ण'' म्हणजेच भक्ति-भगवंत दोन नाहीत. नित्य एकत्वच आहे. भक्ती पूर्णशक्ती आहे. तर भगवंत पूर्णशक्तिमान् आहे. भक्ती मृगमदगंध आहे. भगवंत मृगमद आहे. भक्तिप्रकाश आहे. भगवंत तेज आहे. भक्ती व्याप्ती आहे, भगवंत आकाश आहे. भक्ती ज्योत्स्ना आहे, भगवन्त पूर्णचंद्र आहे; भक्ती आतप आहे - भगवंत सूर्य आहे. भक्ती तरंग आहे, भगवंत जलनिधी आहे. हे सर्व जसे नित्य एकस्वरूप-एकरस आहेत, पण भक्तिलीला रसास्वादासाठी दोनपणे भासतात, तेही एकपण-एकरसता न मोडता.

वस्तुत: एकच एक नित्य सच्चिदानंदमय परमप्रेमतत्व भगवंतच/श्रीकृष्णच/पांडुरंगच आस्वाद्य, आस्वादक आणि आस्कंदन या रूपांनी लीलारत होतात.

कधी भगवंत भक्तीरूपाने भक्ताच्या आकारात येतो, तर कधी भक्तीच भगवंतरूपाने प्रकटते.

भगवान् ब्रह्मवैवर्तपुराणांत भक्तांना सांगत आहेत, ''जे तुम्ही आहात तोच मी आहे; आपल्या दोघात, भक्त-भगवंतात किंचित् सुद्धा भेद नाही. जसे दूध

आणि शुभ्रता, अग्नी आणि दाहक शक्ती, पृथ्वी आणि गंध एकच त्याप्रमाणे मी सदासर्वदा तुमच्यातच राहतो.

भक्तीभाव/प्रेमभाव भगवंतापासून पृथक वस्तू नाहीत. भक्तीप्रेमाश्रमाचा भाव भक्तीप्रेमविषयात, आणि तसेच भक्तीप्रेमविषयाचा भाव भक्तीप्रेमाश्रमात अनुभवाला येत असतो. गोपीजन भक्तीप्रेमाचा आश्रय आहेत तर नंदनंदन/गोपीजनवल्लभ भक्तीप्रेमाचा विषय आहे.

भक्तांचा अप्राकृत दिव्य भक्तीप्रेमभावच निर्गुण-निराकार परब्रह्मात दिव्य सुखेच्छा निर्माण करतो. भक्तीप्रेमाचा हा महान उच्च भावच. त्या पूर्णकाम परमात्म्यात कामना, नित्यतृप्तात अतृप्ती, क्रियाहीनामध्ये क्रिया आणि आनंदमयात आनंदइच्छा जागी करत असतो. ही सुखेच्छा, कामना, अतृप्ती, क्रिया, जड, पार्थिव नाहीत, मायामयी नाहीत कारण तो दिव्य आनंद आणि दिव्यभक्तीप्रेम अभिन्न आहेत.

विद्वानांची विद्वत्ता, बुद्धिमानांची बुद्धी, त्यागीलोकांचा त्याग, संयमींचा संयम, तपस्यांची तपस्या, साधुंची साधुता, विरक्तांचे नैराश्य, धर्मात्म्यांचा धर्म आणि आत्मज्ञान्यांचे आत्मज्ञान या सर्वांना भक्तीप्रेमाचा मोह पडतो; पण हे भक्तीप्रेमसुख त्यांना दुर्लभ.

भगवंताच्याच, अथवा श्रेष्ठ भागवतोत्तमोत्तमांच्या कृपाप्रसादानेच हा भक्तीप्रेमभाव अंत:करणात जागृत होतो. खर नां?

* * * *




श्रीकृष्णच परब्रह्म आहे. परमात्मा आहे. भगवान् आहे. तो सच्चिदानंद, स्वप्रकाश आणि अद्वय ज्ञानस्वरूप आहे. तो सर्वमय आहे, तसाच सर्वातीत आहे. सर्वज्ञ, सर्वंग, अनंत आणि विभू आहे. सर्वलोकमहेश्वर, सर्वशक्तिमान् आहे. अनन्त शक्तिचा परमाधार आणि त्याचबरोबर एकाधार आहे. सगुण-निर्गुण, तसाच निराकार आणि साकारही आहे. तो प्रत्यक्ष ब्रह्माचीसुद्धा प्रतिष्ठा आहे. आश्रयतत्व आहे. "**कृष्णस्तु भगवान् स्वयम्।**"

तोच द्विभुज, मुरलीमनोहर, श्यामसुन्दर नराकृती, लीलामय-लीलापुरूषोत्तम, सकलभुवन मोहन श्रीविग्रह आहे. अचिन्त्यानंत विरूद्ध धर्माश्रय आणि अपार करूणामय आहे. तो साक्षात् मन्मय-मन्मय, आहे. तोच आनंद-चिन्मय-रस-समुद्र, रसस्वरूप, आस्वाद्य, आल्हादक, तसाच रसिकशेखर आहे. इतक तर तो आहेच आहे, पण तो भक्तिप्रेमस्वरूप, प्रेममय, प्रेममूर्ती आहे.

राधा भगवंताची आल्हादिनी शक्ती आहे. श्रीकृष्णाला ती आल्हादित करते आणि नंदकिशोराला ती ज्या शक्तीच्याद्वारा आल्हादित करते त्याच शक्तिच्या द्वारा भगवत्सुखाचा आस्वाद ती स्वत: प्रत्यक्षपणे अनुभवत असते. व्रजभूषणाला आल्हादित करता करता स्वत:पण आल्हादित होत असते. "**तत्सुख सुखित्वम्**" हेच भगवद्भक्तिप्रेमाचे निजस्वरूप आहे. ही फार नितांत सुंदर गोष्ट आहे.

हे भक्तिप्रेम आनंद-चिन्मयरस आहे आणि या भक्तिप्रेमाचे जे परमस्वर

आहे, तोच आहे महाभाव. या महाभावाची मूर्तिमंत प्रतिमा महाभावरूपा अशी ही राधा. भक्तिप्रेमातील हा जो महाभाव तोच राधारूपाने सगुण-साकार झाला आहे. श्रीकृष्णविषयक अत्यन्त विशुद्ध भक्तिप्रेमरत्नांची खाण म्हणजे राधा.

सामरहस्योपनिषद् तर असे ठामपणे सांगते की, ''तो अनादि द्वितीय परमपुरूष भगवान एकटा एकच आहे. पण, अनादिकालापासून तो आपल्या आपल्यातच दोन रूपांनी नटून आपण-आपल्याच आराधनेमध्ये, आराधनेसाठी तत्पर आहे. याच तत्वानुसार वेदज्ञ महात्मे या एक असून दोन रूपांनी सगुण-साकार झालेल्या रूपातील एका रूपाला म्हणजे राधेलाच रसिकानंदस्वरूपा म्हणतात.

राधातापनी उपनिषदामध्ये ''**येथ राधा यश्च कृष्णो, रसाब्धि र्देहश्चैक; क्रीडनार्थ द्विधाभूत**'' म्हणजे जी ही राधा आणि जो हा कृष्ण 'रससागर' आहे; तो एकच आहे, पण क्रीडेसाठी दोनपणे नटले आहेत.

ब्रह्मांडपुराणात तर भवान् श्रीकृष्ण स्वमुखाने ग्वाही देऊन सांगत आहेत -

**''राधा कृष्णालिका नित्यं कृष्णो राधात्मको ध्रुवम्।**
**वृन्दावनेश्वरी राधा, राधैवाराध्यते मया।।''**

याचा अर्थ असा, राधेचा आत्मा सदा-सतत मी श्रीकृष्णच आहे, आणि माझा (श्रीकृष्णाचा) आत्मा निश्चयेकरून राधाच आहे. इतकं सांगून वृन्दावनविहारी थांबला नाही, तो पुढं सांगतो आहे की ''श्रीराधा ही वृन्दावनेश्वरी आहे, आणि म्हणून मी राधेची आराधना करतो. जो श्रीकृष्ण आहे तीच राधा आहे, आणि राधा आहे तो श्रीकृष्णच आहे. श्रीराधा-माधवाच्या रूपात एकच आत्मज्योत दोन प्रकारे, एकपणा न मोडता प्रकट झालेले आहेत.

स्वत: भगवान् श्रीकृष्णांनी राधानामाचा महिमा सांगितला आहे.

**''रा'' शब्दं कुर्वतस्त्रतो ददामि भक्तिमुत्तमाम्। ''धा'' शब्दं कुर्तत पश्चाद् यानि श्रवणलोभत:।।''** ज्या वेळेला मी कुणाच्या मुखातून ''रा'' हे अक्षर ऐकतो, त्याच वेळी त्याला मद्विषयक श्रेष्ठ भक्तिप्रेम बहाल करतो; आणि ''धा'' अक्षराचा उच्चार झाल्याबरोबर तर राधानाम श्रवणाच्या लोभाने त्याच्या पाठोपाठ चालू लागतो.

श्रीराधा भगवद्भक्तिप्रेमाचा आदर्श आहे. ती समस्त गोपींची मुकुटमणी आहे. ही वृषभानुकुमारी आनंदकंद चंद्राची कौमुदी आहे. अर्थात् भक्तरसराज श्रीकृष्णच आनंदस्वरूप चंद्र आहे आणि वृषभानुनंदिनी राधा त्याची ज्योत्स्ना आहे. श्रीकृष्णचंद्र समस्त गुण, रूप, केली, माधुर्य यांची पूर्णावस्था आहेत. मधुराधिपती श्रीकृष्ण माधुर्यरसाच्या साररूपाची ही साररूपा श्रीराधा आहे.

**''रसो य: परमानंद एक एक द्विधा सदा। श्रीराधाकृष्णरूपाभ्यां तस्मै तस्मै नमो नम:।।''** जो एकच एक परमानंदरसरूप आहे तोच सदा दोन प्रकारे नटून लीलारत आहे आणि तो राधाकृष्ण स्वरूप आहे. माझा त्याला वारंवार नमस्कार. भगवान् आणि भक्ती यांचे हे रूप म्हणजे राधाकृष्ण.

* * * *

# चिंतन ७१

जमेल तशी श्रीमद्‌भागवतकथा सेवा म्हणून केली. ही सर्व वाङ्मयीन सेवापत्रे श्रीकृष्णचरणारविंदी, भावाच्या ओंजळी भरून-भरून अर्पण केली; त्याच्याजवळ मागणं एकच, एवढच; भक्तिभावाच्या रोपाचा महान्‌वृक्ष व्हावा. त्याला भक्तिभावप्रेमसुखाचीं पुष्प-फळ लगडावीत आणि **''फळलिया तरूची शाखा''** असा हा भाववृक्ष भाराने झुकावा, लवावा, ओथंबून जावा.

भगवद्‌भक्तिप्रेम ही मोठीच मूल्यवान, अद्‌भूत पण मोठी दुर्लभ अशी वस्तू आहे. ही प्राप्त होण्यासाठी आपल सगळ काही समर्पण कराव लागत. भक्तांना मोठ्या कठिण, कठोर परीक्षांमधून पुढ-पुढ सरकाव लागत. अग्नितून तापून, तावून-सुलाखून निघाल्याशिवाय, सुवर्णालादेखिल कांती, झळाळी लाभत नाही. टाकीचे घाव सोसल्याशिवाय दगडाला देवपण मिळत नाही. प्रल्हाद, गोपीजन, मीरा या सगळ्या भक्तांना, भागवतोत्तमोत्तमांनापण काय थोडे कष्ट सोसावे लागले? परमप्रेमस्वरूप योग आणि संवादभोग एका केंद्रात वाढू शकत नाहीत; पण खरे भगवद्‌भक्त या संसारिक अडचणी-अपत्तींची पर्वा अजिबात करत नाहीत. परमानंदघन सुखसागर भगवंतापासून, आपले चित्त, दृष्टी यत्किंचित बाजूस सारत नाहीत. सर्वतोपरी भक्त हे भगवंताचेच होऊन रहातात. **''देव माझा मी देवाचा''** हाच त्यांचा निश्चय; नुसता निश्चयच नाही तर बळकट असा अनुभव असतो. मग परिवार, समाज, गण-गोत्रस्थ काहीही करोत अथवा म्हणोत; **''तुका म्हणे हासे जन। नाही**

**कान ते ठायी।।**'' कशी दृढ निश्चल अवस्था. आपल्या सगळ्या संपत्ती-आपत्ती-विपत्ती ते महावैष्णवजन भगवंताचीच लीला आहे अशा बोधात असतात. कधीच मग त्या सावळ्या सुकुमार आनंदघन राजसाला यत्किंचित बोल लावत नाहीत.

पण ही तर झाली भक्तिशास्त्रातल्या सिद्धांताची गोष्ट. खरोखर व्यवहारात, या स्थूल जगरहाटीत जे भक्तिप्रेमाचे वाटेने निघालेले असता, त्यांच्यापुढे फक्त दोनच मार्ग/उपाय असतात. एक तर हे सगळं स्थूल, संसारिक, लौकिक पातळीवरच, बोलण-सवरण, सहन करावयाच, किंवा या सगळ्याकडे पाठ करावयाची!!! यातील काहीच सोसायची आपली शक्ती नसेल तर युक्तिने मार्ग काढावयाचा असतो. आणि शक्तिपेक्षा युक्ती जास्त उपयोगी ठरते. मग हा युक्तिचा उपाय काय? नाम-स्मरण, सत्संग, भगवद्भक्तांची संगती-सहवास-सेवा, भगवंताचीच सेवा या भावनेने जीवमात्राची प्रेमपूर्वक सेवा. बहुगुणैश्वर्यसंपन्न अशा भगवंताच्या दया-करूणा-प्रेम या भावांनी भरलेल्या लीला-चरित्र-गुण-स्वरूपाच्या कीर्तनाचे श्रवण, पठण इत्यादी. जर बाह्य आडंबरांनी बाकीच्यांशी अप्रसन्नता होत असेल तरीसुद्धा, आपल्या अंत:करणात सत्चिदानंद नंदनंदनाविषयी जो भक्तिप्रेमभाव आहे तो कोण हिरावून घेऊ शकणार ना? आपण आपल्या हृदयाच्या गाभाऱ्यात त्यांचे चिंतन-स्मरण, करावे आणि त्याचबरोबर कातर स्वरांनी अंत:करणापासून, मोठ्या कळकळीने, व्याकूळ होऊन त्याची प्रार्थना करावी.

भक्तिप्रेमामध्ये, कर्मत्याग आपोआपच होत असतो. करावा लागत नाही. भक्तिप्रेमात मस्त असलेला भक्त आपल्या परमप्रिय भगवंतास सोडून अन्य गोष्टी जाणतच नाही. भक्ताचे मन सदाचेच श्रीकृष्णाकारच झालेले असते. त्याच्या डोळ्यात सदासर्वकाळ एका आनंदघनरामाचीच प्रतिमा असते. गोपी

म्हणतात "**रूप येवूनिया डोळा बैसले वो।।**" त्या म्हणतात "प्रभो, आमच चित्त गृहकृत्यात-व्यावहारिक कामात आसक्त होत, ते तर तू चोरलस!!! आमचे हात कामात गुंतले होते ते पण आपापल्या चेष्टा विसरले आणि आमचे पाय पण तुझ्या चरणकमलापासून एक पाऊल पण इकडे-तिकडे करायास तयार नाहीत. आता आम्ही देहतादात्म्यस्वरूप घराकडे कशा परतणार? आणि जाऊन तिथे करणार तरी काय ना? "**आता कैसी जाऊ घरा?।।**"

दृष्य जगत्चित्र चित्तरूपी पडद्यावरून पुसले गेले "**जेथ संसारचित्र उमटे। तो मनोरूप पट फाटे। सरोवर आटे। मग प्रतिमा नाही।।**" मग भगव्भक्त कोणत्याच लौकिक (स्मार्त) अथवा वैदिक (श्रौत) कर्म करण्यास धावत नाही.

आनंदस्वरूपाची प्राप्ती झाल्यावर सर्व कर्मे आपोआपच सुटतात. जाणून-बुजून त्यांचा मुद्दाम त्याग करावा लागत नाही. समर्पणाचा अर्थच मनातूनच समर्पण. या भक्तिप्रेमसुखावस्थेत मग विधि-निषेधाच्या पलिकडे जाणे होते. या स्तरावर गेल्यावर भगवंताच्या सत्यस्वरूपात इतकी प्रगाढ तल्लीनता लाभते की बस्!!! ज्याला हे भक्तिप्रेम लाभते तो भक्त सर्व बंधनांतून कायमचा मुक्त. शिल्लक राहाते फक्त एक भक्तिप्रेमबंधन आणि भले!!! भगवद्भक्त या भक्तिप्रेमबंधातून सुटले अशी कधी इच्छा करील शक्यच नाही!!! भगवंताच जर स्वत: या बंधनातच सदासर्वकाळ राहू इच्छतो मग महावैष्णवांची काय कथा???

* * * *

# चिंतन ७२

जेथे भगवद्विषयक उच्च महान् श्रेणीचा प्रेमभक्तिभाव असतो, की जेथे भावाभावसुद्धा समाप्त होतात; तेथे लहान-मोठा भाव नाही; दास्यभाव नाही, नाही वात्सल्यभाव. तेथे स्वकीय-परकीय संबंधच नाही. मग काय भावच नाही? नाही. भाव आहे तो अनिर्वचनीय. नारद म्हणतात, अनुभवस्वरूप; अनुभव कसा? 'मुकास्वादनवत्।' मुक्या माणसांनी स्वादिष्ट, रूचकर, सात्विक पदार्थांची चव घ्यावी!!! तेथे दोन गोष्टी उरतच नाहीत. ना देव - ना भक्त. दिसायला मात्र दोन; पण खरे दोन नाहीत. एकच आहे. हा एकभाव दोनला सापेक्ष नाही; द्वैतनिरपेक्ष अद्वैत आहे. वेदान्तसिद्धांताप्रमाणे "**एकम् एवम् अद्वितीयम्।**" पण भक्तिशास्त्रात एक असूनही देव भक्त दोन; फक्त दिसायला पण दोन दिसूनसुद्धा एकच.

या एकतेमध्ये स्थित होऊन भजन/सेवा करणे ही एक मोठी विलक्षण उपासना आहे. तेथे स्वामी-सेवक आणि सेवा तीन नाहीत; एकच आहेत. कसे? तर स्वामी सेवक आहे; आणि सेवक स्वामी आहे. एकत्वाच्या दृष्टीमध्ये स्वामीच सेवक आणि सेवकच स्वामी ही अभेदाची पराकाष्ठा आहे.

गोपींचा श्रीकृष्णामधे हा भाव आहे. हा भाव गुण, स्वरूप, प्रभाव, वैभव, ऐश्वर्य याला महत्व देत नाही. जेथे भक्तिप्रेमाची परिपूर्णता आहे; तेथे भगवंत आणि भक्त यांच्यात काही भेदच नाही. तो भगवंत, भक्ती आणि भक्त हे एकच आहेत.

हा जो भाव आहे, एकरूपता आहे, त्याच्याबद्दल इतक लिहील!!! तरी

पण रूपयातला एक नवा पैसा सुद्धा नाही लिहीता आल. वास्तवात जी एकाकारता आहे, ती अथांग सागरासारखी आहे. चिंतनात ज्या गोष्टी मनात आल्या, त्या थेंबासारख्या आहेत आणि लेखणीतून ज्या उतरल्या त्या परमाणूमात्र आहेत. जन्मभर जरी या देव-भक्तांच्या ऐक्याबद्दल बोलल/लिहील तरी एक थेंब सुद्धा, मूळच्या स्वरूपऐक्यातील अभेदतत्वाविषयी कधीच सांगता येणार नाही.

भगवन्त आणि भक्त हे तर या व्यावहारिक स्तरावरील दोन शब्द पण त्या विलक्षण ऐक्यभावात दोघही भगवान् आणि दोघही भक्त ही एक अलौकिक अद्वितीय एकता/स्वरूपता आहे. तुलसीदास म्हणतात "राम-भरत" भेटी सारखी ही भक्त भगवंताची भेट नाही तर भगवंतच भगवंताला भेटला अशी ही भेट किती विलक्षण आहे नां? "**देव पहावया गेलो। तेथे देवची होऊनि ठेलो।।**" अशी स्वरूपस्थिती. "**क्षेमालागी जीव उताविळ माझा, म्हणओनि स्फुरताती बाहो। क्षेम देऊ गेले तव मीच मी एकली, आसावला जीव राहो।**" ही ज्ञानोबारायांची साक्ष.

हे भक्तिप्रेम विशुद्ध आहे. हे भक्तिप्रेमच भगवंत आहे. हे भक्तिप्रेमच भक्त आहे. भगवंत आणि भक्त मिळूनच हे भक्तिप्रेम आहे.

ही ऐक्यभावावस्था सर्वात उंच आहे. रामकृष्णपरमहंस, गौरांग महाप्रभू हे ह्या उंचीतले आदर्श आहेत; मानदंड आहेत. अशी स्थिती आरूढता!!! मग काय? काही करायच-करवायच (म्हणजे क्रियात्मक भक्ती) शिल्लकच राहात नाही. मग त्याच्या शरीराची (अगदी स्थूल) काय अवस्था होते, नाही सांगता येत. आरशात सूर्य नाही येत, तर प्रतिबिंब येते. फक्त प्रतिबिंबाच्या योगानेच आरसा झळाळून उठतो. पण भक्ताच्या सर्वांगात भगवन्ताचे प्रतिबिंब नाही, तर प्रत्यक्ष भगवंतच येतो. तो साक्षात भक्तिप्रेमाचा मूर्तिमंत, चालता-बोलता

पुतळाच. चेतन. सत् आणि आनंद.

गौरांगप्रभू ज्या रस्त्याने जावयाचे तो मार्गच भक्तिप्रेममय होऊन जात असे. मीराबाईची दृष्टी ज्यावर पडत असे तेथे भक्तिप्रेमाची वृष्टी होत असे. त्याचे कारण भक्तिप्रेमाचा प्रत्यक्ष आधारभूत प्रभू ज्याच्या डोळ्यात भरून उरला त्याचा सगळाच व्यवहार भक्तिप्रेमाचा. हा भक्तिप्रेमभाव, ही संतांची, भगवंताची देणगी; किंवा त्याचे प्रेममय नामस्मरण.

* * * *

# चिंतन ७३

शास्त्रांनी निष्काम सेवा आणि निष्काम प्रार्थना हे भगवत्प्राप्तीचे उपाय सांगितले आहेत. जो माणूस नि:स्वार्थ भावनेने सेवा करतो आणि जन्म जन्मांतरी, प्रभो तुझी सेवाच घडावी अशी प्रार्थना करतो, "**हेचि मज घडो जन्मोजन्मांतरी। मागणे श्रीहरि नाही दुजे।।**" यात अजिबातच एवढासुद्धा स्वार्थ नाही, की जितका स्वार्थ भगवद्दर्शन मागण्यात आहे. ही खरी नि:स्वार्थता.

बघा नां!!! मोठी विचार करण्यासारखी गोष्ट आहे. साधूजवळ भगवद्दर्शन मागणाऱ्यामधे दोन दोष. एक तो भगवद्दर्शनाचा स्वार्थ!!! आणि दुसरा काहीच सेवा केल्याशिवाय त्याला चकटफू दर्शन पाहिजे. भगवद्भजनाशिवाय/सेवेशिवाय भगवद्दर्शन नाही. भगवंताच्या सेवेत श्रद्धा आणि रूची म्हणजे आवड नसेल, प्रेम नसेल तर मग कुठले भगवद्दर्शन.

भगवद्सेवा करत असतांना जर परिश्रम-कष्ट वाटत असतील तर निश्चित समजायला हरकत नाही, की त्याच्या भगवद्सेवेत श्रद्धा आणि भक्तिप्रेम अगदीच गौण आहे आणि भगवद्स्मरणाचा तर अजिबात थांग-पत्ताच नाही. त्यांची सेवा हा केवळ लौकिक भाग. कवायतच असते.

ज्याला भगवंताची सेवा प्रिय आहे, आपल्या प्राणापेक्षा प्रिय आहे, तो वैष्णव प्राणावर बेतल तरी सेवा म्हणून सोडत नाही आणि चुकून जर सेवा विसरली तर त्या विसराबद्दल त्याला अत्यंत पश्चात्ताप होतो; तो सेवा चुकल्याच्या दु:खामुळे होरपळून निघतो. अशा महावैष्णव जनास भगवद्सेवा

करत असतांना परमशान्ती आणि परमप्रसन्नता लाभत असते आणि त्याची एकमेव हीच एक इच्छा असते की **"हेचि मज घडो हेचि मज घडो."** सेवा चुकली तर त्याचा जीव तडफडतो, व्याकूळ होतो; कसा तर पाण्यातून बाहेर काढून टाकलेल्या मासोळीसारखा.

भागवतोत्तमोत्तमाच्या लक्षणात एक मोठे लक्षण आहे की, भगवंतापेक्षासुद्धा भगवदूसेवेविषयी प्रेमभाव. ते म्हणतात, भगवान् प्राप्त होवो वा न होवो, पण आम्ही भगवत्सेवा सोडणार नाही. आपली स्थिती याच्या अगदीच उलट नां? आम्हाला आज सेवा की उद्या लगेच मेवा पाहिजे!!! आणि असा तात्काळ मेवा मिळाला नाही; आणि खरच ना, असा लगेच कुठला मेवा मिळायला? इतकच काय पण सेवेशिवाय मेवा हवा असतो; कसा मिळणार नां??? आणि नाही मिळाला की आम्ही सेवा सोडून मोकळे!!! नुसते मोकळेच नाही तर सेवा बिवा सगळ खोट, काही अर्थ नाही त्यात असा प्रचार करावयास एका पायावर तत्पर.

परमवैष्णव प्राण सोडतील पण सेवा सोडणार नाहीत. **"तुका म्हणे करा सेवा। आले जीवावरि तरी।"** त्यांना प्राण त्याग करणे सह्य आहे पण सेवेतील खंडितता, विलंब, विसर थोडासुद्धा सोसत नाही. सेवेमधे विक्षेप, अडथळा, अडचणी म्हणजे वैष्णवाच्या दृष्टीने प्रत्यक्ष मरणच. सेवेशिवाय जीवन म्हणजे अवकळा, साक्षात जीवंतपणीच मृत्यू. जगून मरण आणि सेवा करता करता मरण आले तर मरून सुद्धा जगण!!!

सेवेत जेथे एवढीशी देखील ढिलाई, चालढकल सेवकास सोसत नाही, त्याच क्षणी भगवंताला त्याच्यासाठी लगेचच प्रकट व्हावेच लागते. कारण त्याची आवड, भक्तिप्रेम, श्रद्धा तीव्रतर असते म्हणून त्याच्या तीव्रतेमुळे भगवन्ताला त्याला भेटल्याशिवाय राहवतच नाही. त्या भक्ताला

भेटल्याशिवाय भगवन्तालाच चैन पडत नाही; **"मज वाटे त्यासी अलिंगन द्यावे।"** अशी भगवन्ताचीच परमव्याकुळ दशा होते भक्ताला भेटण्यासाठी.

अशा सेवकाच्या ठिकाणी भगवन्ताच्या विस्मरणातच व्याकुळता नाही, (ती तर आहेच) पण प्रभूच्या भजन, चिंतन, ध्यान-स्मरण पूजा ह्यांच्यात पडलेल्या अंतराविषयी जास्त परमव्याकुळता आहे. या सेवेशिवाय भक्त जगूच शकत नाही. कारण अशा सर्वतोप्रकारच्या भगवद्सेवा हेच त्याचे प्राण आहेत-श्वास आहेत. त्याचे जीवन आहे. जसे श्वास-उच्छ्वास स्वाभाविक चालतात, प्रयास-आयास-कष्ट नाहीत, तर श्वास रोखल्यावर, रोखण्यातच कष्ट होतात. तसच भगवद्सेवेच. सेवेत कष्ट नाहीत. सहजता-आनंद. पण साधी नाहीतर मात्र मरणप्राय वेदना अशा सेवाधारकासाठी भगवान् थांबूच शकत नाही; क्षणमात्रात प्रकट होतो!!!

भगवत्सेवा-स्मरण (नामस्मरण) वेठबिगार म्हणून करावयाची गोष्ट नाही. मोठ्या प्रेमाने, श्रद्धेने, भक्तीभावाने आनंदाने आनंदात करावयाची गोष्ट आहे.

आपल्या शरिरातील सगळ्या नाड्या अगदी स्वाभाविकत: चाललेल्या असतात. त्यांच्या चालण्याबरोबर भगवद्नामस्मरणसेवा जोडावयास हवी. असा सदृषभाव हवा की नाडी-नाडीतून-रोमा-रोमातून त्याचे नामस्मरण चालू आहे आणि आपण त्याचा मानसिक स्तरावर अनुभव घेतोय. मग रंध्र न् रंध्र प्रसन्न होतात. रोमा-रोमांतून त्याचे नामसंकीर्तन होत राहते. खंडितता-व्यत्यय नाहीच.

* * * *

# चिंतन ७४

गोपबालके, वासरे ब्रह्मदेवाने सत्यलोकांत नेली. श्रीहरिची अद्‌भूत लीला पाहण्यासाठी. ज्यांना-ज्यांना ब्रह्मदेव घेऊन गेला, तेवढ्या रूपांनी एक श्रीकृष्णच नटला. अशी श्रीकृष्णस्वरूपातूनच वेगवेगळ्या आकाराला आलेली गोपबालके, वासरे जेव्हा सायंकाळी गोकुळात परतली नां, तेव्हा त्यांच्या त्यांच्या मातांच्या स्तनातून दूधाच्या धारा स्त्रवू लागल्या. का तर त्यांच्या लोकरांच्या आकारात नटनाट्यकुशल कान्हाच प्रकटला ना. तोच मोठा प्रेमस्वरूप.

भक्तिप्रेमाची तऱ्हाच अशी आहे. ''**अंतरीचे धावे स्वभावे बाहेरी। धरिताही परि आवरेना।।**'' कुठलाही बंध-बंधारा या भक्तिप्रेमामृत प्रपाताला आडवू शकत नाही. संतवाङ्‌मय, संतचरित्रे, संतसहवास, संतकृपा या अनेक धारांनी तर हा प्रपात जास्तच संपन्न आणि अफाट झाला आहे.

आपणा भारतीयांना एका अतिपावन, कल्याणकारी आणि उदात्त भावप्रधानसंस्कृतीचा वारसा लाभलेला आहे.

काशीची परमपावन, लोकमंगला, परमकल्याणकारक, गंगा सेतूबंधावरील रामेश्वराला घालावी आणि सेतू गंगेस अर्पण करावा, चारी-धाम, सप्तपुऱ्या, बारा ज्योतिर्लींगे अशा तीर्थ-यात्रा कराव्यात आणि तीर्थांचा देश असणाऱ्या या देशात अनेक तीर्थांत सुस्नात व्हावे ही आपली परंपरा. याच परंपरेने आपण सारे भारतीय एकाच परमपवित्र तेजस्वी सूत्रात, अभिन्नपणे, अभेदत्वाने गुंफले गेलो आहोत.

या एकात्मतेच्या सूत्रात एकरसतेने गुंफणारे दुसरे सुगंधी सूत्र आहे. साधू-संत, त्यांचे चरित्र, जीवितकार्य, वाङ्मय आणि तत्वज्ञान.

समस्त भारतवर्षाच्या सर्वत्र अतिदूर कानाकोपऱ्यातून संतवचनाद्वारे सर्वात्मैक्यत्वाचे पडसाद, देवालयातील घनगंभीर घंटानादाप्रमाणे अव्याहत निनादत राहिलेले आहेत.

संत-साधूजन हेच या अवनीतलावरील चालते-बोलते परमेश्वरच आहेत. आपले श्रीगुरू ज्ञानेश्वरमहाराज त्यांना **'चला कल्पतरूंचे आरव'** अस म्हणतात. वैराग्याचे सागर, ज्ञानाचे आगर असून मोक्षपदाचे दाते आहेत. सदाचार, सद्मतीची प्रत्यक्ष मूर्तीच म्हणजे हे संत. जगतकल्याणाची भव्य-दिव्य-श्रीमंत-ऐश्वर्यसंपन्न पेठ म्हणजे हे संतच. अमोघ आत्मज्ञानाचे गाढे-रोकडे अनुभवाची खाण म्हणजे हे संत. ईश्वरी तत्वाचे वाटाडे ते हे संतच!!!

त्यांचे प्रांत, जात, धर्म, पंथ, भाषा, उपासनापद्धती, संप्रदाय हे जग वेगवेगळे असले तरी त्यांच्या सगळ्या शिकवणूकीचा मूलस्त्रोत अगदी एकच-एक आहे. व्यक्ती-देश-काल-परिस्थितीनुसार बाह्य स्वरूप भिन्न-भिन्न भासत असले तरी, अत:सूत्र एकच आहे आणि ते म्हणजे विश्वात्म्यैक्यभाव म्हणजेच भक्तिप्रेमभाव आणि अस का जर म्हणाल तर त्याच कारण, श्रीसमर्थांनी फार छान शब्दांत सांगितलय. **"संत दिसती वेगळाले। परि ते स्व:रूपी मिळाले।"** सर्वांचे स्वरूप एकच आहे, ते म्हणजे आत्माराम. आत्मारामाच्या ठिकाणी स्वगत-सजातिय-जातीय. भेदच नाही. आमचे ज्ञानोबाराय पण सांगतात, हरिपाठात **"सर्वांघटी राम देहादेही एक। सूर्य प्रकाशक सहस्त्ररश्मी।।"**

वेदोपनिषदे, श्रीमद्‌भगवद्‌गीता प्रणीत आध्यात्मिकता, किंबहुना जीवनाचे तत्वज्ञान स्वत:च्या जीवनात आधी उतरवून मगच ते केवळ वाणीद्वारे नव्हे;

तर प्रत्यक्ष आचरणातून सर्वसामान्यापर्यंत पोचवल्याच, रूजवल्याच अखंड व्रतच घेतलेल असत त्यांनी. तत्वज्ञ असूनही त्यांची दृष्टी नेहमीच समाजाभिमुख असते. लोकल्याणाच्या कळवळ्याने अंतर्बाह्य पाझरती असते.

वैष्णवांचे अंत:करण माऊलीच्या नाही तर प्रसववितेच्या वात्सल्याने नुसते ओथंबलेले असते. जनसामान्यांच्या परमकल्याणाच्या कळवळ्याने तळमळणारे असते. ''**जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति/देह कष्टविती परोपकारे ।।**'' या आमच्या श्रीतुकोबारायांच्या वचनानुसार अवघ्या जीवनाचे प्रयोजनच मुळी ''अवघाची संसार सुखरूप करण्याचे आणि हा ईश्वरी आदेश, ही ईश्वरी प्रेरणा, ते भगवंताचा कृपाप्रसाद समजून, ह्याच भूमिकेतून मोठ्या श्रद्धेने, निष्ठेने आपल्या समग्र जीविताचा कण् न् कण्, क्षण न् क्षण, तन-मन-धन समर्पून व्यतीत करत असतात.

श्रुती-स्मृतीतील परमकल्याणकारण, पण कळण्यास कठिण आणि आचरण्यास तर त्याहून आवघड असे तत्वविचार हे संत जनसामान्यांना, आबाल-वृद्धांना, अडाण्यांनाही सहजी समजेल-उमजेल, पटेल-रूचेल, कळेल-वळेल, अशा रीतीने त्यांच्या बोलीभाषेतून, नित्य परिचित, प्रपंचातील, व्यवहारातील दृष्टांताद्वारे पटवून देतात. माऊलीच्या मायाळूपणाने, वात्सल्य-करूणभावाने, हे तत्वविकार हळूवारपणे, कधी-कधी थोड रागावून सुद्धा (पण आईच्या रागाने) रूजवत असतात.

समाजान ज्यांना आपल म्हटल आहे, त्यांच्या नवजीवनाचे-नव निर्मितीचे कार्य, (अतिशय नाजूक तसेच कठीण) ते मानवसमाजाचे ऋण फेडण्याच्या ऋषींचे ऋण फेडण्याच्या विनम्र, निरहंकार, नि:स्वार्थभावाने आयुष्याच्या अंतापर्यंत अव्याहतपणे करतच असतात. तेही शांत, संवतवृत्ताने, वात्सल्यभावाने आणि विधायक भावातून.

* * * *




सत्‌शिष्याला, श्रीगुरूंच्या देशाकडून आलेला वारा सुद्धा अतिप्रेम अपूर्वाईचा आणि अप्रूप वाटतो. अगदी तशीच अपूर्वाई, श्रीगुरूंनापण आपल्या अत्यंत प्रामाणिक, साधनतत्पर, अनन्य असणाऱ्या आपल्या सत्‌शिष्यांच्या बाबतीत असते; लेकराला तर माय-माऊलीची ओढ असतेच; पण त्या माऊलीस सुद्धा लेकरांसंबंधी अपरंपार प्रेमभाव असतो. लेकरांनी आईकडे दोन पावले टाकली तर??? तर आई झडझडून चार पावल टाकून त्याला आपल्या उरी लावते. कवटाळते. हो ना? लेकराला घ्याव लागत, हट्ट पुरवावा लागतो; लळे पूर्ण करावे लागतात. खर ना? श्रीगुरूमाऊलीच्या अंत:करणातून आपल्या आपल्या आपत्याची मूर्त कधी बाजूला होतच नाही. जस व्रजांगनांच्या हृदयातून नन्दलालची मोहक छबी कधी मावळलीच नाही. मग त्या भल्या एकान्तात असोत, चालत-उठत-बसत-खात-पीत असोत!!! का तर तिथे एक गाढ-प्रगाढ, अनन्य श्रद्धा आहे; अनन्य भक्तिप्रेमभाव आहे, अनन्य ध्यान आहे, अनन्य चिन्तन आणि अनन्य स्मरण आहे.

अशा प्रकारे जीवनाच्या सर्वांगीण स्तरावर अनन्यता बर्हिष्णू झाली की मग भगवंताच्या ध्यानात अशी एक विलक्षण नितान्त सुंदर मुग्धता प्राप्त होते की मग वेगळीक उरतच नाही, होतच नाही. मग भक्ताला/शिष्याला, भगवंताचे/श्रीगुरूंचे (दोन्ही एकच) ध्यान-स्मरण-चिंतन करावे लागत नाही, तर आपोआप होतच राहते.

अशा ध्यानावस्थेमध्ये, स्मरणात मग भक्त मस्त असतो. भगवंताच्या

साक्षात् दर्शनापेक्षासुद्धा जास्त मस्ती तो भक्त या चिंतनकाळी/स्मरणकाळी अनुभवत असतो. तो भक्त म्हणतो, भगवंताला गरज असेल तर आपणहून येईल आणि दर्शन देईल. मला गरज नाही. भक्त आणि भगवंत या दोघांत ज्याच्या ठिकाणी अधिक भक्तिप्रेमभाव असेल, जो या भावकुसुमांची जास्तीत जास्त इज्जत करत असेल, त्यालाच गरज पडेल आणि त्यामुळे त्यालाच (म्हणजे भगवंतालाच) याव लागेल. न येऊन कुणाला सांगतो? आहे ना भक्तिप्रेमाची अफाट शक्ती-मस्ती???

आणि भगवंताला यावेच लागते. अशा मस्त भक्तांसाठी आणि तो येतो सुद्धा. मान-पान न पाहता. आमचे तुकोबाराय म्हणतात, "**आपुले ते थोरपण। नारायण विसरला।।**" नाही नाही, "**झाला, वेडा झाला। लाचांवला भक्तिसी।।**"

भक्ताच्या ठिकाणी पण व्याकुळता असतेच. ही व्याकुळता अत्यंत उच्च-उच्चतम कोटीची असते. गोपी भगवद्दर्शनासाठी इतक्या व्याकुळ व्हावयाच्या, त्यांचे वर्णन भगवान्वेदव्यासांनी, "**कृष्णदर्शनलालसा**", "**कृष्णदर्शनविव्हल**" अशा शब्दांत केलेले आहे. अशी त्यांची व्याकुळता शिगेला पोचायची की आत्ता प्राण जातात की राहतात? मग या व्याकुळतेस नाही काही गोड लागत, नाही झोप, नाही भोजनाची रूची, एका श्रीकृष्णाशिवाय अन्य काहीच गोड लागायच नाही.

आणि अशा व्याकूळअवस्थेप्रत भक्त पोचला मग भगवंत कुठला दूर राहायला? त्वरित तो प्रकट व्हावयाचाच.

त्याच्या वियोगातील व्याकूळता, त्याच्या प्रत्यक्ष भेटीतील मुग्धता आणि भक्तिप्रेमातील अधीरता, किती सुंदर सुंदर रंगछटा आहेत ना!!! पण मूळ रंग एकच एक आहे; भक्तिप्रेमभाव. त्याचाच ह्या वर निर्देशित केलेल्या आणि

वरच्याचसारख्या अनंत-असंख्य भाव-छटा.

भगवत्प्रेमी हा ह्या भक्तिप्रेमानंदात मग्न असतो. या दिव्य मग्नतेत प्राधान्याने आनंद-भाव विलसत असतो. या गुग्धतेत मग तो भक्त म्हणतो, ''मला त्याला बोलवावयाची, प्रार्थना करण्याची, विनंत्या करण्याची काय गरज आहे? मी कधी त्याच्यापाशी जरी पोचू शकत नसलो तरी त्याला तर येता येते की नाही? आणि माझा विश्वास आहे जेथे भक्तिप्रेमभाव आहे तेथे तो आपणहूनच येत असतो.

या सगळ्याबरोबर भगवंताच्या भेटीची तीव्र इच्छा!!! या तीव्र इच्छेत फार मोठे सामर्थ्य आहे. या तीव्र इच्छेने भक्तिप्रेम वृद्धिंगत होते; आणि या भक्तिप्रेमामुळे इच्छा जास्तीत जास्त तीव्र बळकट होते. भक्तिप्रेमभाव-आणि भगवद्मिलनाची तीव्र इच्छा या दोन्ही गोष्टी अन्योन्याधित आहेत. जसे माय-लेकरातील प्रेम. गुरू शिष्यातील प्रेम. या भक्तिप्रेमातून, तीव्र इच्छेतून साधन-नामसाधन सतेज होते आणि त्याचबरोबर नामस्मरणातून भक्तिप्रेमभाव व भगवद्दर्शनाची तीव्र ओढ जास्तीत जास्त प्रबळ होते, कार्यान्वित होते.

अशी तीव्र लगन (हिंदी शब्द) लालसा निर्माण झाल्याशिवाय स्मरण होत नाही आणि एकादा का ध्यास लागला की मग त्याच्या आठवाशिवाय अन्य काही स्मरतच नाही; तहानेलेला जसा पाण्यासाठी; भुकेलेला अन्नासाठी; उन्हात तापलेला सावलीसाठी; व्याधीग्रस्त औषधासाठी; अत्यंत लोभी पैशासाठी हापापलेला असतो तितकी भगवंत दर्शनाची, आनंदकंद सच्चिदानंदघनाच्या अपूर्व भेटीची, भक्तिप्रेमालिंगनाची आस हवी. ह्या जन्माष्टमीनिमित्त हाच भगवंतनंदनंदनाचा निरोप.

* * * *

# चिंतन ७६

जेंव्हा अंत:करण द्रवीभूत होते, त्यावेळी ज्याच्या योगाने, स्मरणाने, चिंतनाने, आठवणीने, ध्यासाने, ओढीने ते विरघळते, त्याच वेळी ते त्याच्याशी एकरूप, एकरस होते; जसे लाख विरघळल्यावर होते. वितळलेल्या लाखेत कोणताही रंग घाला; त्या लाखेला तोच रंग चढत असतो. पण लाख जर वितळलेली नसेल, आणि त्याच्यावर काही जरी घातले तर त्याचा त्या लाखेवर काहीच परिणाम होणार नाही. त्याप्रमाणे जेव्हा भगवत्प्रेमाने, त्या आनंदकंदाच्या आचेने अंत:करण द्रविभूत होते तेव्हा त्यांना भगवंताचा, रंगनाथाचा रंग उत्तमरितीने चढत असतो.

आपल्याला आपले अंत:करणास श्रीरंगाचा रंग द्यावयाच आहे; **"तुका म्हणे मना श्रीरंगाचा रंग!"** भगवंताच्या अमर्याद, कोवळ्या कृपेने, ज्या वेळी माणसाचे हृदय व्याकूळ होते, त्यावेळी त्याच्या समग्र जीवनात अमूलाग्र बदल होतो. प्रश्न हा आहे की आपल हृदय अशा प्रकारे कसे वितळेल?

भक्तिशास्त्रकारांनी त्यासाठी एक अमोघ असा उपाय सांगितला आहे. ज्याच हृदय श्रीहरिच्या वियोगामुळे व्याकूळतेच्या आचेने वितळलेले/द्रवीभूत झालेले आहे, अशा महात्म्यांच्या, महावैष्णवांच्या जीवन चरित्राचा करुण अथवा भक्तिप्रेमभावाने विचार करणे. त्यांचा सहवास, त्यांची संगती; सत्संगती.

राम-भरत भेटीचा प्रसंग आपल्यासमोर उभा राहिल्यास (कथेच्या अथवा वाचन-श्रवणाच्या माध्यमातून) आपोआप डोळ्यातून प्रेमाश्रू पाझरू लागतात.

"मातृ-पितृ" भक्त श्रावणबाळाच्या चरित्रश्रवणाने अंत:करण असच एकदम द्रवीभूत होते. प्रभू श्रीरामाचे वनगमन अगर नंदलालाचे अक्रूराबरोबर मथुरागमन कानी पडताच करुणाभाव जागृत होऊन हृदय द्रवीभूत होते. गोपींचा, महारासाचा प्रसंग, गोपीमानसमनरंजन, चित्तचकोर अंतर्धान पावल्याने झालेला विलाप, तसच श्रीकृष्ण-सुदाम्याची प्रेमभेट हे प्रसंग पण चित्त द्रवीभूत होण्यासाठी अत्यंत उपयुक्त आहेत.

ज्यावेळेला मन अथवा हृदय अशाप्रकारे एकाएकी द्रवीभूत होते, त्यावेळी हृदयात निर्माण झालेले भाव (उत्कटता, उत्कंठा, वियोग, भक्ती, श्रद्धा, प्रेमभावभक्ती) स्थायी स्वरूपात अंत:करणात चांगल्याप्रकारे सुस्थिर होतात. यासाठीच भगवद्भक्तीप्रेमभाव अती अतूट श्रद्धा आपल्या अंत:करणात कायमस्वरूपात स्थिर-स्थित करून रोमा-रोमात पूर्णत्वाने पल्लवीत करून, आपले जीवनच आत-बाहेर समूळ बदलून जाईल या साठी अत्यंत करुण भावाने वेळोवेळी भगवंतासाठी रडल पाहिजे; व्याकुळ झाल पाहिजे. त्यासाठी मोठी तळमळ लागली पाहिजे. पण अशी ओढ प्राय: सहजी लागत नाही; ही मोठी खेदाची बाब आहे. आनंदघनरामाच्या ठिकाणी अशी लगन लागली तर महद्भाग्य.

कबीर महाराज म्हणाले **"नारायण की लगनमे तन मन दीखे खोय।"** भक्तिप्रेमात निमग्न होऊन भगवंताचे भजन मोठ्या तळमळीने झाल आणि त्याच्या समोर अत्यंत करुणामयभावांनी रडता आले, त्याला हाका मारता आल्या, प्रार्थना करता आली की "हे नाथ! हे रमानाथ! हे गोविन्दा! हे वासुदेवा! हे नारायणा! करुणाकरा!!! मला तर फक्त तुझाच आधार आहे, आश्रय आहे. तुझ्याशिवाय मी कोणाच्या तोंडाकडे पहाणार रे!! प्रभो, ना माझ्या ठायी ज्ञान, नाही भक्ती, नाही वैराग्य आणि नाही प्रेमभाव. मी फक्त

तुला शरण आलो आहे, तो पण केवळ वचनमात्रे!!! हृदयपूर्वक अनन्यभावांनी तुला शरण येऊ इच्छितो; पण हे मन कसल ना? ऐकतच नाही बघ. पण हे दयाघना, तू करूणेचा, दयेचा, अमर्याद सागर आहेस, तूच या अपात्र जीवावर पूर्ण कृपा कर आणि मला तूच आपणहून पदरात घे रे!! माझी योग्यता नसताना!!! अशा मनोभावे प्रार्थना करणे यापरता श्रेष्ठ अन्य भाव नाही.

भगवद्भजनात भगवत्नामाचेच संकीर्तन, एकस्वर, एकसूर, एक लय, एक तालात झाले ना तर मुळी ते भजनच इतके प्रिय वाटते, गोड लागते की मन कुठे दुसरीकडे धावतच नाही; **''आता कोठे धावे मन?''** अशा नामसंकीर्तनात सात्विक आणि अत्यंत अलौकिक असा भक्तिप्रेमरस निर्माण होतो; वाहू लागतो. त्या अद्भूत रसाला महापूर येतो आणि त्या महाप्रवाहात, मनातील सगळी जाळ्या-जळमटे पार कोठल्याकोठे वाहून जातात. परमात्मप्राप्तिच्या बाबतीत हा रस अत्यंत सहाय्यक आहे. यामुळे भगवंताविषयी भक्तिप्रेमभाव क्षणाक्षणाला वाढतो. चढतो. कळसाला पोचतो. अंत:करण परमपवित्र भक्तिप्रेमभावाने जणू नवनीतासारखे मृदू होते. तो लाला ''नवनीतभोजी'' आहे, ''नवनीतप्रिय'' आहे. आपण वेळोवेळा नामसंकीर्तन करावयास हवे.

या नामसंकीर्तनाच्या वेळी आपला भाव असा हवा, दूरतर हवा, की संकीर्तनप्रियपरमात्मा तेथे उभाच आहे. **''तेथे असे देव उभा''** तो खेळतोय, हसतोय, नाचतोय, उड्या मारतोय, **''कृष्णा हाल कां रे, कृष्णा डोल का रे।।''** त्याच्या बरोबर आपण नाचतो, गातो, डोलतो आहोत. मग अशा नामसंकीर्तनातून तो कोठे अन्यत्र जातच नाही. ''कीर्तनरंगी देवा संगे सुखेचि डोलावे।'' असा हा उद्भूत रस आहे संकीर्तनाचा.

* * * *




लोखंडाला जसा परिसाचा स्पर्श झाला की त्या परिसाच्या सामर्थ्याने, स्पर्शमात्रेकरून त्या लोखंडाचे सहजपणे सोने बनते. तसेच श्रीगुरूंच्या अंत:करणात जी स्वरूपानुभूती असते, तीच सहजगत्या शिष्याच्या अंत:करणात उदय पावते. पण हा दृष्टान्त कमीच आहे; गुरूकृपेच्या बाबतीत. परिस त्या लोखंडाचे सोने करतो; पण परिस नाही. सद्गुरूस्पर्शाने/सामर्थ्याने शिष्याला नुसते सुवर्णत्वच नाही तर परिसत्व प्राप्त होते.

लौकिक गुरूशिष्यसंबंध आणि अध्यात्मिक गुरूशिष्यसंबंध यांच्यामध्ये हा वरील फरक आहे. लौकिकामध्ये शिष्य चिकाटीने शिकला, अभ्यास केला तर गुरूंची सारी विद्या आत्मसात करतो; इतकेच नाही तर काही वेळा "**शिष्याद् इच्छेत पराजयम्।**" या न्यायाने शिष्याजवळ गुरूहून अधिक विद्या असू शकते. शिवाय गुरू आणि शिष्य दोघेही एकमेकांशी संपूर्ण एकरस कधीच होत नाहीत आणि होऊ शकतही नाहीत. याच्या अगदी उलट अध्यात्मविद्येतील प्रकार आहे. अध्यात्मविद्या सूक्ष्म आहे. भक्तिप्रेम त्याहून सूक्ष्मतम आहे. तेथे दृष्याचा संबंधच नसतो. ती विद्या, भक्ती, भेदातून अभेदात नेत असते. तद्रूप, तदाकार होण्यामध्ये तिचे पर्यवसान होत असते. आत्मानुभूतीपर्यन्त पोचतांना श्रीगुरू ज्या-ज्या अनुभव प्रक्रियेतून गेले त्या-त्या अनुभव-अवस्था शिष्यालाही येतात. अनुभवांची सूक्ष्मता व व्यापकता जसजशी वाढत जाते तसतसा शिष्य श्रीगुरूंशी अधिकाधिक समरस, तदाकार होत जातो. अखेर सर्वान्तर्यामी असणाऱ्या आत्मस्वरूपाशी शिष्य भिडला की, त्याबरोबरच तो आपल्या श्रीगुरूंशी पूर्णत्वाने एकरूप होतो. शिष्याला

आत्मसाक्षात्कार होणे हे लोखंडाचे सोने होण्यासारखे आहे. पण, त्या साक्षात्काराच्या द्वारा शिष्य ज्या वेळी श्रीगुरूंशी एकरस होतो त्यावेळी त्याच्याच अंगी श्रगुरूत्व प्रकटते. याप्रमाणे होणे हे परिसत्व प्राप्त होण्यासारखे आहे. नाही का???

यासाठी श्रीगुरूंचे ठायी भक्तिप्रेम, श्रद्धा, विश्वास, अनन्यता, निश्चल मती पाहिजे!!! ज्यांचेविषयी भक्तिप्रेम असते त्याच्याच विचाराने, ओढीने, प्रतिमेने, स्मृतीने आणि कल्पनेने माणसाचे मन भरून जाते. मनाच्या सर्व हालचाली भक्तिप्रेमवस्तूला अनुलक्षून घडतात. याच मनाच्या हालचालींना वृत्ती असे म्हणतात.

श्रीगुरूं हे सत्‌शिष्याचे स्वामी म्हणजे मालक. समर्थ म्हणतात, त्यांना मी वंदन करतो. ते स्वस्वरूपी राहतात. शिष्य म्हणतो, (अभ्यासाने) भलेही तात्विक स्वरूप तेच आहे (म्हणजे सच्चिदानंदघन आहे).

जिज्ञासू शिष्य ज्यावेळी अशा अनन्यभावाने श्रीगुरूला शरण जातो, तेव्हा त्यालाच (त्या शिष्याला) सच्चिदानंदघनता प्राप्त होते/अनुभवास येते. या स्वरूपसाक्षात्काराचा/स्वानंदानुभवाचा प्रदेश अज्ञात असतो. या प्रदेशामध्ये श्रीसद्‌गुरू ज्या मार्गाने नेतील, त्याच मार्गाने, पूर्ण श्रद्धोने जाणे याचेच नांव आहे शरणागती. अशा शरणागत शिष्याला आपला श्रीगुरू हाच एकमेव आपला स्वामी; तारणहार; माता-पिता-भगवंत एवढेच नाही तर सर्वतोपरी एक श्रीगुरूच वाटतो.

शरणागतीने शिष्याला आनंदस्वरूपाचा साक्षात्कार घडतो. श्रीगुरू ज्या भावानंदामध्ये असतात त्याच अवस्थेला शिष्य पोचतो. इतकेच नव्हे तर श्रीगुरूंच्या सामर्थ्याने शिष्य त्या अवस्थेत कायमचा स्थिरावतो; श्रीगुरू आणि शिष्य एकाच परमानंदामध्ये विलीन होतात. याच अर्थाने शिष्य सद्‌गुरूस्वरूप होतो.

शरणागत शिष्याची भावना काय असावी???

तर माझ्या अंतर्यामी माझ्या श्रीगुरूंच्या कृपेचे सामर्थ्य तुडूंब भरलेले आहे; त्याच कृपेच्या सामर्थ्याने परमानंदास अगदी उधाण आले आहे; तो आनंदच नुसता उचंबळत आहे. तसेच श्रीगुरूंच्या कृपारूपी पाण्याचा लोंढाच्या लोंढा माझ्या अंत:करणात लोटला आहे. त्यायोगे माझे अंत:करणरूपी सरोवर ओसंडून वाहू लागले आहे. त्यात आनंदाची कमळे दाटली आहेत.

अशा भावनेचा उद्रेक झाला, भाववेग झाला की चित्त शुद्धावस्थेमध्ये स्वानंदाकडे/आत्मारामाकडे धाव घेते. अशा चित्ताचा आत्मस्वरूपाशी संबंध आला की मुळी, ते त्या आत्मरूपाशीच तद्रूप, तल्लीन, तदाकार होऊन जाते.

श्रीगुरूंच्या मार्गदर्शनाखाली साधना केल्यावर (नामस्मरण झाल्यावर) मन शुद्ध बनते. अशुद्ध मन जड प्रपंचाच्या, दृष्याच्या आवडीने भरलेले असते, अगदी आतून ती आवड नाहीशी होणे, हेच मन शुद्ध झाल्याचे चिन्ह आहे. या जडाच्या आवडीचे अंमलातून सुटलेले असे मन सूक्ष्म, हळूवार होते आणि मगच ते सामर्थ्यशील शुद्ध मन, स्व-स्वरूपाशी/आत्मारामाशी/आनंदस्वरूपी सहजच एकरस, एकाकार होते.

श्रीगुरू सत्‌शिष्याला स्वानंदस्वरूपी निरांजनांनी, आनंदज्योतींनी ओवाळतच असतात. भाली स्वानंदसाम्राज्याच्या अभिषेकाचा मंगल कुंकुमतिलक लावतात आणि मस्तकी भक्तिप्रेमाच्या मंगल अक्षता टाकतात.

* * * *

# चिंतन ७८

काल श्रीमद्भागवत या महापुराणाची आलोचना झाली आणि आज श्रीग्रंथराज ज्ञानेश्वरीच्या जयंती निमित्ताने, या अमृतरसरसाळ ग्रंथाचे चिंतनाला सुरवात झाली; केवढा सुंदर योग ना? सोन्याला, सुगंध, चव, गोडी, मृदूता, रूप लाभावे ना तसाच अगदी.

भागवतात प्राधान्येकरून भक्तिप्रेमाच्या विविध अंगांचा नितान्त सुंदर विचार आहे; काय एक-एक भावछटा आहेत. त्यांतील नामे, प्रसंग, लीला यांना मोठा नितळ, निखळ भक्तिप्रेमाचाच स्पर्श आहे, ओलावा आहे.

एक साधी बाब. ''यशोदा'' या नामाचा अभिप्राय जरा बघा ना!!! आपल्या विशुद्ध वात्सल्यप्रेमाच्या द्वारा षड्गुणैश्वर्य अशा भगवंतालाही ही भक्तिप्रेमाधीनता, भक्तवश असा असलेल्या भगवंताला या स्थूल शरीराच्या, स्थूल अवयवांपैकी दोन हातांनी बांधून घालण्यात यश देते. गोपराज, गोपश्रेष्ठ नंदराजाच्या वात्सल्यप्रेमाच्या आकर्षणाने साक्षात् सच्चिदानंदघन, परमानंदस्वरूप परब्रह्म, नन्दनन्दनरूपाने या जगदाकारात अवतीर्ण होऊन अवघ्यांना आनंद प्रदान करते. अवघ्या विश्वाला या अप्राकृत परमानन्दाचा रसास्वाद चाखण्यास नन्दच कारण आहे.

त्यामुळे यशोदेला नन्दगेहिनी अशा शब्दांनी, व्यासांनी भूषित केले आहे आणि अशी नन्दगेहिनी यशोदा ''स्वयं''दधिमंथनास उभी आहे.

स्वयं या पदाने व्यासांना सांगायचय की, नन्दराणी आहे; दधिमंथनासारखे काम हे तर नंदाच्या घरातील अनेक सेविकांपैकी कुणा

एकीचे. पण वात्सल्यभावाचा अत्यंत उन्नत अविष्कार व्यासांना यांतून दिग्दर्षित करावयाचाय तो असा.

की माझ्या लालाला, मी मंथन करून काढलेले लोणीच जास्तीत जास्त आवडते, म्हणून बाकी कामे सेविकांच्यावर सोपवून नन्दगेहिनी यशोदा स्वत: ताकाला (म्हणजे ताक घुसळण्यास) उभी राहिली आहे. वात्सल्यभावाची ही परमोत्कटता आहे!!!

याच प्रसंगातून भक्ताच्या स्वरूपाचे वर्णन पण आहे. स्थूल पंचभौतिक शरीराच्या माध्यमातून दधिमन्थनाचे सेवाकर्म होत आहे; तर हृदयात श्रीकृष्णलीला स्मरणाची सतत धारा प्रवाहित होत आहे, अखंड वाहत आहे. वाणीने यशोदा, आतापर्यंत अनुभवलेल्या त्या नंदकिशोराच्या बाललीलांचे मोठ्या प्रेमाने, आनंदाने गायन करत आहे. भक्ताचे तन, मन, वचन, सगळीचजण आपल्या परमप्रिय, परमप्रेमास्पद भगवंताच्या सेवेत संलग्न आहेत. भक्तिप्रेमस्नेहभाव हा अमूर्त पदार्थ आहे. तो असा सेवेच्या रूपांनींच व्यक्त होत असतो. भक्तिप्रेमरसाचा विलासविशेष आहे नृत्य आणि संगीत.

यशोदेच्या हातातील सुवर्णरत्नखचित कंकणे आणि कर्णकुंडले नाचत आहेत, डोलत आहेत. ती कंकणे जणू यशोदेला मन:पूर्वक आशीर्वादच देत आहेत, त्यांच्या किणकिणाटातून, ती किणकिण म्हणते आहे, ‘‘आज आम्ही यशोदेच्या हातात असल्याने धन्य-धन्य झालो. का? तर हे यशोदामैयाचे हात भगवंताच्या सेवेत रत आहेत आणि यशोदेच्या कानातील भोकरे!!! यशोदेच्या मुखातून ‘‘कृष्णचरितगान’’ ऐकून परमानंदाने डोलत आहेत आणि आम्ही यशादेच्या कानात राहिल्याने, आम्हाला या गुण-लीला संकीर्तनाचे अहोभाग्य प्राप्त झाल्याचे आणि त्याचबरोबर कानाच्या सफलतेचा आनंदच प्रकट करत आहेत.

हात ते धन्य, कान ते धन्य की जे भगवंताच्या सेवेत मग्न आहेत, नुसते मग्न नाहीत तर भगवंतासाठी झिजत आहेत. त्या मंथनाच्या श्रमाने मातेच्या मुखकमलावर घामाचे बिंदू उभे राहिले आहेत आणि यशोदेने जी सुंदर अशा केशरचनेत अतिसुंदर सुगंधित अशी मालती पुष्पांची रचना केली होती, ती मालतीपुष्पे मस्तकावरून, यशोदेच्या पायाशी लोळण घेत आहेत. का तर ती म्हणताहेत अशा वात्सल्यभावाच्या आदर्श मातेच्या मस्तकावर विराजमान् होण्यापेक्षा, यशोदेच्या चरणाजवळ राहण्याचाच/राहण्यातच जास्त सौभाग्य आहे.

रेशमी भरजरी वस्त्र यशोदा कसून ल्याली आहे. पदर कमरेला बांधला आहे. याचा अर्थ, जीवनात आलभ्य, प्रमाद, असावधानता नाही. सेवाकर्मात पूर्ण तत्परता आहे. यशोदेच्या हृदयातील रसस्नेह म्हणजे दूध/अमृत स्तनांतून स्त्रवत आहे, त्यामुळे कंचुकी भिजली आहे. यशोदेला वाटतय श्यामसुंदर यावा, त्याने प्रथम मला पहावं आणि नवनीत न खाता त्याने माझ स्तनपान/अमृतपान करावे. ही वात्सल्यभक्तीतून अंकुरीत झालेली वत्सललालसा आहे.

काय हा वत्सलभाव; नारद नवविधाभक्तिचे व्याख्यान करताना या भक्तिरंगछटेला वात्सल्यासक्ती अस म्हणतात. किती छान शब्द आहे ना? आसक्ती पण वत्सलभावभक्तिची, सख्यभक्तिची, दास्यभक्तिची. मग आसक्ती आसक्ती राहत नाही भक्ती होते.

* * * *




प्रत्यक्ष अनुभूती हा आत्मसाक्षात्काराचा पाया आहे. शब्दज्ञानाने, अथवा नुसत्या शब्दपांडित्याने आत्मसाक्षात्काराच्या गाभाऱ्यात प्रवेश करता येणार नाही. फार झाले तर त्यायोगे परमार्थाच्या प्रांगणात प्रवेश मिळेल. आत्मज्ञानास शब्दाची आवश्यकताच आहे असे नाही. आत्मारामाच शाब्दिक गुणवर्णन करून, त्याच्या आधारे आत्मज्ञानाचा निष्कर्ष काढणाऱ्या शब्दपंडितांना फार फार तर आत्मारामाच्या मंदिराच्या सभामंडपात प्रवेश मिळेल; पण गाभाऱ्यात जाता येणार नाही. देवाचे अस्तित्व बुद्धिजीवी लोकांना पटवून देण्यापुरता शब्दज्ञानाचा उपयोग होईल, नाही असे नाही. फक्त भक्तियुक्त अंत:करणाने नामस्मरण करणारे नामधारक मात्र जरी यदाकदाचित् अक्षरशत्रू असले तरी परमात्म्याच्या गाभाऱ्यात नव्हे नव्हे तर स्वरूपसाक्षात्काराला प्राप्त होतील. मात्र हे स्वरूपगाभाऱ्याचे दार उघडण्यासाठी श्रीसद्गुरूंच्या कृपाप्रसादाची फार-फार आवश्यकता आहे.

केवळ धर्माने, विश्वाच्या अंतीम सत्याचे, म्हणजेच भगवंताचे प्रत्यक्ष दर्शन (म्हणजेच अनुभूती) घडणार नाही. श्रीगुरूंच्याकडून प्रसादपूर्वक नाम मिळवून, प्राणापलीकडे नेमाने नामसाधन केल्यानेच तो नामधारक भगवंतापर्यन्त पोहोचू शकतो. गाभाऱ्यात जाऊन देवाचे दर्शन घेण्यास श्रीगुरूंकडून मिळालेल्या नामाचीच कास धरावी लागते.

साक्षात्कार हे एकमेव श्रेष्ठतम जीवनमूल्य आहे. ते एक प्रकारचे परमपवित्र जीवन आहे. नामाचा आणि नामसाधनाचा निकटचा अतूट असा संबंध आहे. श्रद्धा हा नामसाधनेचा पाया आहे. नामसाधनेने होणारा

साक्षात्कार हा श्रद्धेचा कळसच आहे असे म्हटले तरी वावगे होणार नाही. साक्षात्काराखेरीज, नुसत्या श्रद्धेला अंगची पूर्णता नाही. पाया व कळस यांच्यामधला मंदीराचा भाग म्हणजे कष्टाने केलेला नेम; नेमाने केलेले नामस्मरण; जसे एकेक दगड रचून मंदीराची इमारत बनवावी लागते, तसे अध्यात्माचे मंदीर कणाकणाने व क्षणाक्षणाला नामसाधन करूनच बांधून काढून आत्मसाक्षात्काराच्या कळसापर्यंत उंच न्यावे लागते.

सततच्या जडाच्या व तद्निर्माण वस्तूच्या/आकाराच्या/दृष्याच्या चिंतनाने शुद्ध आत्माच प्रबळ झाला. म्हणजे तो जीव बनला. मागील अनंत जन्मातील सवयीने व सध्याच्या जन्मातील संस्कारामुळे मग जीवाचे मन, रजतमादी तीन गुणांच्या संकल्प-विकल्पांनी मलीन झाले. मग त्याचाच परिणाम देहालाच सत्य मानून इंद्रियांच्या माध्यमातून दृष्यापासून येणाऱ्या अनुभवांना सुख अथवा दुःख मानणारी चित्तवृत्ती म्हणजेच जीवभाव.

पण दृष्य विश्वाला असत्य मानून, त्याची बंधने, मर्यादा, स्थळ-काळ जाणून इंद्रियांना; मनाला, अंतर्मुख करून, आत्मारामाच्या अनुभवाच्या अखंड सुखात राहणाऱ्या चित्तवृत्तीला शिवभाव म्हणतात. मन, बुद्धी, देहाची ओढ जीवभावाकडे असली तर हा जीव आपल्या मूळच्या शुद्ध सच्चिदानंद स्वरूपापासून दूर-दूर जातो. आणि आत्मारामापासून दूर नेणाऱ्या गुणांनाच दुर्गुण म्हणतात. अशा विकारांना दुर्विकार असे म्हणतात. अशा विचारांनाच दुर्विचार असे म्हणतात.

तेच मन, बुद्धी, क्रियाशक्ती व त्यांना चिकटलेले गुण, विकार व विचार यांना आत्मारामाकडे लावल्यास त्यांनाच सद्गुण म्हणतात. आत्मारामापासून दूर नेणारे सर्व सोडावे लागते, त्याला अभावात्मक साधन म्हणतात आणि आत्मारामाकडे घेऊन जाण्यासाठी जे धरावे लागते/करावे लागते त्याला भावात्मक साधन म्हणतात.

सद्गुणांची वृद्धी होण्यासाठी सद्गुरूकडून मिळालेल्या दिव्य नामाचीच कास धरावी लागते.

जीवभावातच राहून, देवापासून आपणास हवे असलेले सुख, आनंद मिळत नाही, असे ज्यावेळी कळते, त्यावेळी जीवाच्या मनात सुखप्राप्तीसाठी काळजी सुरू होते. आहे त्या परिस्थितीत ते सुख व तो आनंद मिळत नाही; मिळाला तर पटत नाही; पटला तर पुरत नाही; पुरला तर पुन: पुन: मिळेल का ही चिंता!!! मग जेव्हा परिस्थितीवर मात करून आपल्याला हवे ते सुख, हवा तो आनंद मिळवणे आपल्या हातात नाही असे ज्यावेळी कळते, तेव्हा मात्र मग खऱ्या सुखाच्या आनंदाच्या मार्गाला तो लागतो. मग त्याच्या अंत:करणात तळमळ सुरू होते. असे झाले की मग अध्यात्मप्रवृत्तीच्या बीजाला अंकुर फुटले असे म्हणावे.

अशा प्रवृत्तीची कारणे जरी निरनिराळी असली तरी मूळ मात्र एकच आहे. या विश्वाची रचना कोणी? कधी? कशी? कुठे? व का? केली असेल अशा प्रश्नाने त्रस्त झालेल्या वैज्ञानिक प्रवृत्तीचे मूळ एकच. आगतिकता, अज्ञानाची जाणीव आणि आपली सर्वतोपरिची असहायता. यातूनच देहहंकाराचा नाश. आपल्यापेक्षा एक मोठी अकुंरीत शक्ती आहे याची स्पष्ट जाणीव; या जाणीवेतून शरणागतीचा भाव आणि अशा भावातूनच माणसाची प्रवृत्ती जीवभावातून शिवभावाकडे वळते.

आपल्या आकांक्षा व अपेक्षा पुऱ्या होण्यास, विश्वातील गोष्टी अपुऱ्या पडतात असे कळल्यावर मनुष्य मागे सरतो, त्यांच्या मागे लागणे व्यर्थ आहे. त्याला वाटते असे मागे हटणे (जाणीवपूर्वक) म्हणजेच वैराग्य. असत्याचा त्याग व सत्य तत्वावर म्हणजे एका भगवंतावर भक्तिप्रेमपूर्वक अनुराग हाच कट्टाच्या नामसाधनेचा आधार आहे.

* * * *



# चिंतन ८०

अध्यात्मप्रवृत्तीच्या संवर्धनास श्रद्धेचा आधार व प्रगाढ श्रद्धेला, अध्यात्मप्रवृत्तीचा आधार असे एक हे एकमेकांस आधारभूत चक्र आहे. अध्यात्मप्रवृत्ती वाढेल तशी श्रद्धा वाढते; खरी गोष्ट, परंतु केवळ श्रद्धेने अध्यात्मप्रवृत्तीची, अंतीम एकमेवाद्वितीय सत्य (म्हणजे भगवंतच) जाणण्याची भूक भागत नाही. विश्वाधाराची अकुंठित, अमर्याद, अपरिच्छिन्न शक्ती पूर्णांशाने कळत नाही; पटत नाही; जाणीव होत नाही. त्यासाठी श्रीगुरूच पाहिजे. आत्मसाक्षात्काराचे ध्येय गाठण्यासाठी, ते ध्येय ज्यांनी गाठले आणि जे ध्येयाकार झाले अशा श्रीगुरूंसारख्या मार्गदर्शकाचेच मार्गदर्शन पाहिजे. वाळवंटातून जाणारा लमाणांचा तांडा जसा एखाद्या ओयासिसच्या शोधात असतो, तसेच अध्यात्माच्या भूकेने व्याकूळ झालेला मुमुक्षू श्रीगुरूंच्या शोधात असतो आणि बहुत सुकृताच्या जोडीनेच अशा पुण्यपुरूषाची भेट होते. खर ना? पण त्यांना ओळखले मात्र पाहिजे.

‘‘**गुप्त-रूप तोच गुरू**’’ असे श्रीगुरूदेव रानडे म्हणत असत. स्व-स्वरूपाची जाणीव, ओळख करून देतो तोच सद्‌गुरू, ‘‘**शिष्याते मेळवी सद्‌वस्तुते। सद्‌गुरू त्याते श्रीकृष्ण मानी।।**’’ अशी श्रीमद्‌भागवतातील ११ व्या स्कंधात, भगवंतांनीच व्याख्या केली आहे. देहात असतानाच ब्रह्मत्वास प्राप्त झालेले श्रीगुरू परब्रह्मस्वरूपच असतात. जरी त्यांना आपल्यासारखे हात, पाय, कान, डोळे, नाक असले; ते जेवत-खात-पीत-बोलत-चालत असले तरी सुद्धा!!! म्हणून सद्‌गुरूंच्या स्थूल देहाची सेवा म्हणजे प्रत्यक्ष देवाचीच सेवा होय असा निर्वाळा दस्तूरखुद्द श्रीगुरूज्ञानेश्वर महाराजांनीच दिला आहे. का म्हणाल तर त्यांना देह पडण्याची भीती नसते. आपल्या देहापासून

आपण वेगळे असण्याचा (म्हणजे मी देह, इंद्रिये, मन, बुद्धी नसून, नित्य, शुद्ध, बुद्ध, स्वगत-स्वजातीय-विजातीय भेदशून्य, सच्चिदानंदघन परब्रह्मच आहे) अनुभव त्यांना आलेला असतो. या अवस्थेत ते सहजी जातात आणि राहतातही.

पूर्वपुण्य असल्याशिवाय अशा पुरूषाची/महात्म्याची गाठ पडत नाही, आणि एकदा गाठ पडल्यावर आपणास पाहिजे असलेला साधनमार्ग त्यांच्याकडूनच न मागता मिळतो. खऱ्या मुमुक्षूच्या ठिकाणी असलेली तळमळ, अशा जीवाची तगमग, आत्मज्ञानी सत्पुरूषालाच कळते. अशा जीवाला शांत करण्यासाठी, त्याला परमपदावर (साक्षात्काराच्या) आरूढ करण्यासाठी श्रीसद्गुरू अशा जीवाला आपणहून भेटतात, त्यांची गाठ पडते, आणि ते एकरूप/स्वस्वरूप होतात.

परब्रह्मच असलेल्या श्रीसद्गुरूंचे सगुणशब्दात वर्णन करणे कसे शक्य आहे? तर नाहीच नाही. श्रीगुरू सतत स्वरूपाच्या ठिकाणी (आत) जागेच असतात. जागृती, स्वप्न, सुषुप्ती व तुर्या या चारी अवस्थेत आत्मारामाशी ते सतत संलग्न असतात; आत्मस्थित/असतात. चारी अवस्थेत त्यांना दर्शन, स्पर्शन व संभाषणाचा अनुभव असतो. अक्षरब्रह्म म्हणजेच ''नाम'' देऊन ते आपल्या शिष्यांना मार्ग दाखवतात. ते श्रीगुरूंकडून मिळालेले नाम म्हणजेच आत्मारामाचा अविष्कार होय.

आधी काठी ठोसून सद्गुरू शिष्याच्या मातीचा पोत पाहतात. शिष्याच्या अंत:करणात थोडातरी भाव असला, मऊपणा असला, कस असला, की मग तेथेच ते नामाचे बीज पेरतात. एवढेच करून थांबत नाहीत तर त्या शिष्यावर आपल्या कृपेचा पाऊस पाडतात. नामाच्या अक्षररूपाने श्रीसद्गुरूंची शक्त शिष्याच्या आत्म्यात उतरते. श्रीगुरू व शिष्य यांच्या ठिकाणी असणारा एकच आत्माराम नामाच्या अक्षराने स्वरूपीच एकाकार होतो. श्रीगुरूंची आत्मशक्ती

हाच ज्ञानाग्नी शिष्याच्या जीवभावाला दग्ध करतो. साक्षात्कार मार्गावरील महत्वाचे आचार पाळून कट्टाने नामसाधन करण्यास श्रीगुरू वारंवार सांगतात. ही गुर्वाज्ञा पाळून साक्षात्काराच्या एव्हरेस्टवर पोहोचू पाहणाऱ्या शिष्याचा योगक्षेम (म्हणजे प्राप्त झालेला शिवभाव सांभाळणे) मग श्रीगुरू स्वत: डोळ्यात तेल घालून पाहतात. आपल्या शिष्याच्या वाटेवर काटे पडले असतील तर ते स्वत: दूर करून, श्रीगुरू त्याची साधन-वाट स्वच्छ करतात; सरळ करतात, सोपी करतात. एकदा शिष्याचा हात पकडल्यावर ते तो कधीच सोडत नाहीत; अगदी शिष्याने झिडकारला तरी सुद्धा. वाट सोडून/(परमार्थाची) चुकून आपला शिष्य मार्गापासून बाजूला जातो असे जरा जरी वाटले, की लगेचच त्याचा हात धरून, श्रीगुरू त्याला पुन: पुन: वाटेवर आणून सोडतात.

श्रद्धा, सेवा, साधना व शरणागती ही चतु:सूत्री फार महत्वाची. श्रीगुरूवचनावर अढळ विश्वास असा विश्वास म्हणजे साक्षात्कार मार्गावरचा अर्धाटप्पाच. ते सांगतील तोच वेद, तेच शास्त्र. आपले श्रीगुरू हे प्रत्यक्ष देवच ही श्रद्धा. श्रीगुरू सांगतील ते व तसे करणे ही सेवा, श्रद्धा व साधना. या त्रिवेणीत सुस्नात झाल्याने आत्मारामाचा अनुभव. अनुभवाने भक्तिप्रेम वाढते. अशा भक्तिप्रेमातून मिळालेले नाम स्वत:सिद्ध असते. पूर्ण असते. असे नाम ब्रह्मस्वरूपच. तसेच नाम परमात्मस्वरूपही आहे. अशा नामात* भगवंताचे सर्व गुण असतात. श्रीगुरू नाम देतात म्हणजे आपली आत्मशक्ती 'नामअक्षररूपात' शिष्याच्या शुद्ध जाणीवेत ठेवतात. अशा आपल्याला मिळालेल्या नामाच्या पाठी-पोटी प्रत्यक्ष श्रीगुरूच असतात अशा श्रद्धेने नामस्मरण करावे.

असे नाम मिळणे म्हणजे पारमार्थिक भाग्याची दैवभूमी/खाणच.

* * * *

# चिंतन ८१

श्रीसद्गुरूंच्या स्थूलदेहातून, वैखरीवाणीच्या द्वारा सद्शिष्याच्या स्थूल देहाला नाम सांगण्यात येते अशी खूपशा सामान्यजनांची भ्रामक कल्पना आहे. नाम हे चैतन्यस्वरूप आहे. भगवंताइतकेच ते सच्चिदानंदघन आहे. नाम तर केवळ श्रीसद्गुरूंचे आत्मस्वरूपच आहे. जड देहाशी त्याचा संबंध नाही. जडाला नाम अजिबात, यत्किंचित चिकटलेले नाही. म्हणून जड असलेला हा देह असे सच्चिदानंदस्वरूप नाम देऊच शकत नाही. आत्मस्वरूप असलेले नाम आत्मारामच देऊ शकतो आणि तेही शिष्याच्या देहाला नाही तर आत्मस्वरूपाला, आत्मा, आत्म्याला आत्म्याच्याद्वाराच जोडून देणे; म्हणजे नाम देणे होय. सगुण स्वरूपात असलेल्या सद्गुरूंकडून नाम देण्यात येण्याची ही अंतरंग, सूक्ष्म, चैतन्य, आनंदमय प्रक्रिया आहे.

भाग्यवान आहेत ते ज्यांना नाम मिळालय. त्यांना दिलय आणि त्यांनीपण घेतल आहे. असे नाम मिळणे आधी कठीण. मिळाल्यावर त्याचे स्मरण करणे तर त्याहून कठीण आणि स्मरण केले/झाले तरी नेम साधणे त्याहीपेक्षा जरा कठीणच. नेम साधला तर आत्मारामाचे दर्शन होण्यास सद्गुरूंची कृपाच लागते.

नाम घेतल्यावर, नामस्मरण किती काळपर्यंत करावे असा प्रश्न सर्वसामान्य साधकांना पडतो. पण हा प्रश्नच चुकीचा आहे. आपण श्वासोश्वास मोजून करतो का? काही वेळापुरता करतो का? नाही ना? दिवसातून शक्य तितके जास्तीत जास्त वेळ नाम घ्यावे. मरेपर्यंत जसा श्वास घेतो तसे देह

पडेपर्यंत नाम घ्यावे. नामाशिवाय जगणे मरण वाटावे. नाम कितीही घेतले तरी अतृप्ती वाटावी. श्रीज्ञानराज म्हणतात, **''तृप्ती भूकेली काय करू गे माये?। जीवनी जीवन तान्हेजत आहे।।''** जीवन्मुक्तीनंतरही (म्हणजे आत्मसाक्षात्कार, आत्मदर्शनानंतर) नाम घ्यावेच. श्रीतुकोबाराय तर सांगतात, **''मुक्तीवरील भक्ती जाण। अखंड मुखी नारायण।।''** नाम घेता घेता मी नाम घेतो याचा विसर पडला पाहिजे. **''तृष्यन्ति च रमन्ति च नाही तर विरमन्ति च''** अस गीता सांगते. हेच खरे नामात रंगणे होय. हाच खरा एकांत. ह्या अनुभवात वितळणे ही खरी नामस्मरणस्वरूप प्रेमलक्षणा भक्ती. हे होण्यास नामावर प्राणापलीकडे भक्तिप्रेम पाहिजे.

नामाचे हे प्रेम येण्यास कळकळ पाहिजे. अपत्य झाले की मातेला त्याचे प्रेम येतेच. अपत्य केव्हा होते हा महत्वाचा भाग. तसे घेतलेले नाम मुखी कसे राहील हा खरा महत्वाचा भाग. नाम घेत राहण्याची मुळात इच्छा पाहिजे. त्यानुसार नाम घेण्याची सुरूवात ही पहिली पायरी आहे आणि ते सातत्याने. तेथेच आपल घोड अडत. नाम घेऊ लागल्यावर भक्तिप्रेम आलेच अशी दृढ धारणा करावी. नाम व भक्तीप्रेम ही एकमेकाला सोडूच शकत नाहीत. नाम सातत्याने घेणे, म्हणजेच कट्टाचा नेम साधणे म्हणजेच आपले चित्त नामाकार करणे होय. जिव्हाळ्याच्या भक्तीप्रेमाशिवाय चित्त नामाकार होत नाही; यांत्रिकीकरणात काय तऱ्हा होते बघा!!! नामाचा केवळ उच्चार मात्र होतो; पण त्याच वेळी चित्त मात्र दुसऱ्या कशात तरी गुंतलेले असते. म्हणून संख्येकडे लक्ष नसावे. मुखी नाम आणि भक्तीप्रेम मात्र इतरत्र. मग असल्या नामस्मरणातून, नामावर प्रेम-भक्ती कशी जडणार ना???

**''श्रीगुरूचरणी अत्यंत विश्वास। येणे प्रपंचाचा सुटला पाश।।''** हा निश्चित परमार्थ मार्ग होय. प्रपंच सोडा म्हणत नाहीत तर त्याचा पाश सुटतो

अस सांगतात. मुलाला बरे नाहीसे झाले की माता अस्वस्थ होते; तस आपल्या साधनेत व्यत्यय आला तर झाले पाहिजे. खर ना!!! पण आम्ही म्हणणार "आमच्या प्रारब्धात असेल तर आणि तेवढीच साधना होणार." याच्या इतके फसवे वाक्य नाही आणि फसवणूक कोणाची तर आपली स्वत:चीच. "आज नशिबात असेल तर जेवेन" अस म्हणतो का??? नाही-नाही. भूक लागताच जेवावयास बसतो. तशी नामाची भूक लागावयास हवी. नाम हाच धर्म; नाम हाच सदाचार, नाम हीच नीती; नाम हेच आद्य कर्तव्य; नाम हेच हितकारक; नामासाठीच जन्म ही जीवन निष्ठा. नाम नाही तो काळ, जीवन म्हणजे मरणच ही भावना.

ह्या भावना दृढ होण्यासाठी; निष्ठा बळकट होण्यासाठी एकच एक उपाय तो म्हणजे मिळालेले नाम घेता येईल तसे, घेता येईल तितके नाम घेत राहणे. यातूनच नामाविषयी भक्तीप्रेम वाढेल. महाराज म्हणत "आपली परिस्थिती सुधारल्यावर नाम घेईन असे म्हटले तर ते कधीच शक्य नाही."

* * * *




अत्यंत विश्वासपूर्वक, मोठ्या आत्मीयतेने, आपल्याला जे साधन, श्रीगुरूंकडून सर्व शक्तीनीशी मिळाले, ज्याच्यासाठी आपला जन्म, जीवनाचे साध्य, श्रीहरि-गुरूकृपेने कळल्यावर त्या जीवनध्येयाकडे जरा जरी दुर्लक्ष झाले; साधन मंदावले; तर श्रीगुरूंना अतिशय दु:ख होते, **"बुडती हे जन न देखवे डोळां।"** म्हणून कळवळून, अंत:करण पिळवटून, पुन: पुन: अनुग्रहीतास ते जागं करत असतात. सांगत असतात; समजावत असतात; ते संत!!! लोक म्हणतात, "अध्यात्मातून वेळ मिळणार का?" वेळ मिळाला तर नां? लोक म्हणतच असतात. आप्त बोलतात, स्वकीय बोलतात, स्वजन बोलतात, गणगोत्रज बोलतात, सर्वचजण बोलतात.

माणसांचे काय कावळे-चिमण्यांचे बघा. एखादा कावळा किंवा चिमणी यांना जर चुकून माणसाचा स्पर्श झाला तर कावळे-चिमण्या त्याला आपल्यात परत घेत नाहीत; तर टोचून टोचून मारतात. मग संसारग्रस्त जीव; परमार्थी जीवाला कुठल आणि कस बर म्हणणार? ही समस्त जगाची वस्तुस्थिती आहे.

साधकांनी एक विचार करावयाचा आहे; आपल्याला काय हवे? लौकिक का भगवंत? आवश्यक तेवढा संसार जरूर करावाच; पण जास्तीत जास्त काळ साधन, सत्संगती, श्रवण, वाचन, मनन, चिंतन यांत (म्हणजेच स्वाध्यायात) व्यतीत करावा.

"लोक बर म्हणतील तर परमार्थ करीन" म्हटल तर मग काही प्रश्नच

नाही. प्रल्हादाने पिता, बिभीषणाने बंधू; भरताने माता तर मीरेने पती ह्यांचा विरोध पत्करला, एका श्रीहरिपायी.

(सुलभ परमार्थनाम, सद्ग्रंथांचे पारायण, मनन-भजन) नाम आतून व बाहेरूनही घेता येते. वैखरीने उच्चार करीत नाम घेण्याची एक पद्धत आहे. परंतु त्यापेक्षा नाम आतूनच घ्यावे. नामांत मन राहावे. त्यायोगेच चित्त नामाकार होणे शक्य होईल. दह्यात (साईच्या) जसे लोणी असते, तसे नामातच नामाचे प्रेम असते.

नाम घेऊ लागल्यावर हे भगवंताचे/नामाचे प्रेम आपोआप वर येते. सर्व रिकामा (???) वेळ नामातच घालवावा. नामाला/स्मरणाला पोषक म्हणून पारायणादी सामुदायिक उपासनेचा फार-फार उपयोग आहे. ग्रंथाच्या शब्द-अर्थ-परिचयाने हा भक्तिप्रेमा पोसतो, बळकट होतो. या सगळ्या वातावरणाने, साधकजनांच्या संगतीने, संघटनाने, सहवासाने भक्तिप्रेम वाढते; म्हणून, तीर्थ, मंदिरे, आश्रम, मठ यांची गरज. साध्या प्रापंचिक पोकळ शब्दांचा वृत्तीवर परिणाम होतो; मग नामाचा झाल्याशिवाय कसा राहील?

नाम घेताना कल्पना येतात; अशी सर्व साधकांची एक तक्रार असते. नाम घेताना विकल्प येणे व त्याची जाणीव होणे यात नामाचेच सामर्थ्य लक्षात घ्यावयास हवे. नामस्मरणात विकल्पांचा मृत्यू आहे. नामाची मात्रा सुरू झाल्यावर ते विकल्प जगण्यासाठी धडपड करू लागतात. विकल्प सूक्ष्म असतात खरे; पण नाम त्याहूनही अत्यंत सूक्ष्म आहे. या विकल्पाच्या संस्पर्शानेच आत्मभावाला हा खोटा, अनित्य, भ्रांत जीवभाव प्राप्त झाला. आता या जीवभावाचा जर शिवभाव व्हावयाचा असेल तर विकल्पाला अगदी मूळापासूनच उखडून काढला पाहिजे नाही का? केवळ नामसाधन/भगवत्चिंतनच हे काम करू शकते; व त्यामुळेच संकल्प-विकल्पाचा नाशही

करू शकते. साधन जेवढे अधिकाअधिक करावे तेवढा-तेवढा संकल्प-विकल्पाचा नाश आहे. यातून भगवंताविषयक संकल्प जागे होतात; जोम धरतात. बळकट होतात. "**संकल्प तो नाही दुजा। महाराजाविण तो।**" एकच संकल्प भगवंत. त्याच्यासाठीच सर्व जीवन.

रस्त्याने जाताना आपल्याला नको असलेली माणसेही भेटतात. पण आपण त्यांना टाळून, प्रसंगी नमस्कार करून चालतच राहतो. त्यांना जरूर नमस्कार करावा; गप्पा मारू नयेत. तसे साधन करत असतांना विकल्प हे येणारच. तसे विकल्प आले तरी साधन सोडू नये. परमार्थाची टाळाटाळ करू नये. तर विकल्प टाळावेत.

साधन हे भगवतप्राप्तीसाठी आहे. देह-गृह भावाच्या विस्मरणासाठी आहे. स्थूलातून-सूक्ष्माकडे जाण्यासाठी आहे. प्रपंच हाच सर्वतोपरी सर्व बाजूंनी सुखाचा वाटत असला तरी काळजी, हळहळ-तळमळ सुटत नाही, संपत नाही. त्यातून शाश्वत समाधानाचा, आनंदाचा लाभ होण्यासाठी एकच मार्ग, अध्यात्मसाधन; की ज्या मार्गाचे येर जनांना काहीच सोयर सुतक नसते.

* * * *

# चिंतन ८३

नामस्मरणाचा, नामसाधनेचा कळस, नामीच्या प्राप्तीत आहे. स्वत:च्या देहभावाच्या विस्मरणात आहे. नामसाधनेच्या द्वारा स्थूलातून आपल्याला/नामधारकाला, सूक्ष्माच्या पलीकडे जावयाचे असते. नामसाधनाने भगवत्प्राप्ती नुसती सोपीच नव्हे तर निश्चित प्राप्य आहे. विकल्पाने भरलेल्या घरातून, नामस्मरण करत करत एकेक विकल्प बाहेर टाकीत जावयाचे आहे; एकेक घर रिकामे करावयाचे आणि मग अखेर स्वरूपसाक्षात्काराच्या घरी मुक्काम. अगदी कायमस्वरूपी निवास करावयाचा!!! नेमाने, कट्टाच्या नेमाने हे अगदी सहज शक्य होते. साध्यप्राप्ती अगदी निश्चितच आहे. मात्र शंका न घेता, विकल्पाला यत्किंचितही थारा न देता नामाचे स्मरण करावयास हवे ह.

नामानेच भगवंताची प्राप्ती होते. नामाशिवाय नाही. ही खात्री असावी. अशा विश्वासाने नाम घेण्याला निष्ठेचा नेम अस म्हणतात. हा नामस्मरणाचा नियम, निष्ठा हेच मंगलातील महन्मंगल. आपले श्रीगुरूज्ञानोबाराय म्हणतात, "**सकल मंगल निधी। श्रीविठ्ठलाचे नाम आधी।।**" नामा इतक दुसर काहीच मंगल नाही पहा. मग नामापेक्षा आणखी श्रेष्ठ दुसर मंगल काय असाणार ना??? तर नाहीच नाही, '**नाम मंगलाचे मंगल**' आणि भवसिंधू पार उतरण्याचे सोपे साधन पण.

प्रपंचाचे स्वरूप बदलण्यासाठी व भगवंताच्या सगुण आणि निर्गुण साक्षात्कारासाठी नामस्मरणाची नितांत गरज आहे. प्रपंचच सर्वतोपरी सुस्वरूप वाटत असला तरी माणसाची काळजी व तळमळ काही सुटत नाही, कारण

वारंवार भोगाव्या लागणाऱ्या दु:खाचे मूळ कारण काय तेच कळत नाही ना!!! ते एका नामानेच कळते, नाही तर नाही कळत अगदी शेवटपर्यंत.

भगवंताशिवाय/श्रीगुरूंशिवाय जीवाला अन्य शाश्वत भक्कम दुसरा आधार नाही हे कळण्यासही नामाचीच गरज आहे. नाम कष्टाने/निग्रहाने घेत राहिल्यावर मग मात्र नाम आपोआप येते, मग प्रयत्न करावे लागत नाहीत.

एकूण या नामसाधनेत आरंभापासून शेवटपर्यंत एक नामच उरते. असे नाम आणि त्याबरोबर नामीचे अनुसंधान यानेच भगवंताविषयीची जिज्ञासा उत्तरोत्तर, अधिकाधिक वाढीस लागते. "**वर्षाकाळी सरिता। जैसी चढो लागें पंडुसूता। तैसी निचनवी भजता। श्रद्धा दिसे।।**" भगवंताकरता नाम, नामाकरता नाम घ्यावयाचे. मग त्या नामातच भगवंत आहे हे कळते, पटते, पचते, नाही नाही तर प्रत्यक्ष अनुभवास येते. आपले जीवन देवाच्या/श्रीसद्‌गुरूंच्या हाती आहे आणि भगवंत नामाच्या स्वाधीन आहे. हाच भाव नामधारकाने हृदयी घट्ट धरावयास पाहिजे.

नाम सत्कर्माचा पाया आहे. नाम हाच सत्कर्माचा कळस आहे. भगवंताच्या स्मरणात झालेले तेच सत्कर्म. त्याच्या विस्मरणात झालेले सत्कर्मसुद्धा पोकळ शेंगेसारखे. नुसते टरफल, शेंगच. आत दाणाच नाही. नामाच स्वत: अंगाने सत्कर्म आहे. जेथे नाम आहे तेथे नामी म्हणजे पुरूषोत्तम आहेच. याचाच अर्थ नाम व भगवंत असे दोन एकमेकापेक्षा निराळे दोन वेगळे पदार्थ नाहीत; असू शकतच नाहीत. नाम सदाच पूर्ण सत्कर्म. अशा नामसत्कर्माची परिणती नामाचे म्हणजेच नामीचे प्रेम उत्पन्न होण्यात, वाढण्यात आहे हीच ह्या भगवंताच्या नामची सफलता आहे.

दृढ निश्चयाने नाम घेण्याचा निश्चय केल्यावर व अशा निश्चयाने नाम घ्यावयास लागल्यावर मग नामाच्या/परमार्थाच्या आड काही येतच नाही;

येऊच शकत नाही. नाम त्या सगळ्या अडचणी/अडथळे दूर करते. आपण मात्र शंकाकुशंका, अडीअडचणींचा बाऊ न करता नामच घेत रहावे म्हणजे झाले.

नाम म्हणजेच अखंड जागृती. नाम हेच भगवत्प्राप्तीचे न गंजणारे, सर्वास प्राप्य, सहज वापरता येणारे असे एकमेव यंत्र आहे. नाम असते तेथे सत् (म्हणजे भगवंत) आहेच. आपण नाम घेत राहिले की संत/साधू/महात्मे/ परमवैष्णव धुंडत-धुंडत आपल्यापाशी येतात. नामाने देव धावतच येतो ''**नामासाठी देव घालीतसे उडी।**'' तो येतोच. संत तोच भगवंत, भगवंत तेची संत.

सकाम नामसाधन करू नये. ''**मुक्तीवरील भक्ती जाण। अखंड मुखी नारायण।**'' त्यासाठी अखंड नामस्मरण आणि आपला रक्षणकर्ता आपला श्रीगुरु आहे याची सतत जाणीव असावी. मनापासून निष्कामपणे नाम घेत रहा.

* * * *

# चिंतन ८४

ईश्वरप्राप्तीसाठी एका शरणागतीशिवाय अन्य मार्ग नाही !!! शरणागती म्हणजे तरी काय ? तर एक भगवंतच कर्ता-करविता आहे ही भावना उराशी अगदी घट्ट बाळगणे. या शरणागतीला नामाइतके दुसरे काहीच पोषक नाही. इतर साधनात (नामाशिवाय) "मी कर्ता" असा अहंकार अत्यंत सूक्ष्म व न कळण्याइतका, न लक्षात येण्याइतका असतोच असतो. स्मरण होणे हे महत्त्वाचे. करणे हा दुय्यम भाग आणि स्मरण होणे, होत राहणे हा श्रेष्ठतम भाग. मी स्मरण करतो, नाम घेतो, नेम करतो हे म्हणणे चुकीचे; तर "**वासुदेवच वासुदेवाचे गायन करतो**" हा भाव असावा. संत सांगतात "**गाय वासुदेव वासुदेवा**"। (जिज्ञासा असल्यास भजनी मालिकेत वासुदेव प्रकरणातला अभंग पहा) "**भिन्न नाही आणिका भावा**"। म्हणजे स्मरण करवणारा, स्मरण करणारा आणि स्मरणिय एक सचिच्दानंद अनंदकंद पांडूरंगच हा भाग स्मरणकाळात अनुभवावा.

देहबुद्धी क्षीण झाल्याशिवाय, भगवंताला शरणागती शक्यच नाही. आपण शरणागती करणे पण देहबद्धिच्या खुंट्याला शरणागतीची दोरी बांधून. ही कसली शरणागती? शरणागतीचे हे सोंग झाले. शरणागती ही काही शारिरीक क्रिया नव्हे तर नामस्मरण होत असताना अनुभवास येणारी एक अवस्था, प्रक्रिया आहे. त्यात त्रिपुटी नसते. म्हणजे शरणागत, शरण्य आणि शरणागती नाही. **सुवर्णमणी सोनया। ये कल्लोळ जैसा पाणिया। तैसा मज धनंजया। शरण ये तूं।।** (ज्ञानेश्वरी अ. १८-१४००) अशी शरणागती हीच भक्ती. तोच आत्मसाक्षात्कार. तीच "सतरावी जीवनकला (अ. १५ वा) आनंदचंद्राची १७ वी जीवकळी. सगळं एकचं !!! अध्याय आणि ओवी यांचे

क्रमांकाचे आकडे फक्त निराळे नाही का? जगताच्या दृष्टीने ''जगाकडे पाठ फिरविल्याशिवाय'' भगवंताचा साक्षात्कार होत नाही. खरं तर देवाशी ओळख झाली तरच जगाशी सन्मुखता पण सामान्यांस, अशा जीवांना वाटते की याने जगाकडे पाठ केली. अज्ञान. दुसरे काय ?

नामस्मरणाने काय साधायचे असते व काय साधले जाते ? तर १) भगवंताची प्रत्यक्षानुभूती व २) आचरणात बदल. या दोन गोष्टी, नामस्मरणाने आपल्या जीवनात याचिदेही, याचिडोळा घडून येतात. नामस्मरणाने व नेमाने म्हणजे कट्टाच्या नामस्मरणाने आत्मशक्ती/आत्मबळ जागृत होते. भय संपते. प्रत्येक ज्ञान/कर्मेंद्रियाच्या तन्मात्रांना दिव्यता लाभते. सर्वव्यापी भगवंताचा अनुभव येतो.

ज्या प्रमाणात आत्मशक्ती जागृत होते त्या प्रमाणात आत्मारामाचा साक्षात्कार होतो. पूर्ण शरणागती, देहभावाचे पूर्ण विस्मरण (माझ्या प्रपंचाचे काय ? तर, देहभावाच्या पूर्ण विस्मरणानंतरही प्रारब्धवशात प्रपंचातील कर्तव्य प्रतिक्षिप्त क्रियापणे होतच राहतात) नामात पूर्ण समरसता, नामाशी पूर्णत्वानी ऐक्य आणि अशा अवस्थेच्या जोडीला श्रीगुरुंची कृपा. मग फलपूर्ण आनंदस्वरूपता. ''**लिखा पढीकी बात नही, बेटा आखों देखी बात बन जाती है।।**

नामस्मरणाने देव होता येते. नामाने वासना, मन, बुद्धी, इंद्रिय, कर्म सर्व काही नामीला चिकटतात. जीवस्वरूप असलेला आत्माच आपल्या मुलभूत शिवस्वरूपास येतो/बनतो. हीच जीवनमुक्ती आणि अशा मुक्तीनंतर सुद्धा ''नाम'' ही भक्ती.

* * * *



# चिंतन ८५

नवरात्र उठले, दसरा झाला, आता कोजागिरी येईल. नवविधा भक्तीचे नवरात्र, जगदमातेजवळ काय मागावयाचे? "मागेन ज्ञानपुत्रा।"' शक्तिमाता-शिवापेक्षा जरापण वेगळी नाही. शिव-शक्तिच्या अद्वैतानुभावऐक्यातच ज्ञानपुत्र प्रकट होत असतो. आत्मबोधाची परडी, मनोविकारांची कुर्वंडी आणि अद्‌भूत भक्तिप्रेमभावाची दुरडी भरावयाची. द्वैत सारून माळ घालावयाची. आत्मज्योतीचा सतत, तेवणारा नंदादीप, मोहमहिषासुराचा वध करण्यास प्रगटली. ही अनादी निर्गुण भवानी. ह्या आणि अशा अभेदबोधमार्गाने मग साडेतीन शक्तिपीठाची वारी करावयाची. भाव-भक्तिचा फुलोरा बांधावयाचा. विवेक वस्त्र-नम्रतेचं श्रीफळ, सात्विक गुणाचे तांदूळ यांनी ओटी भरून माथा नम्र करावयाचा व सर्वसौभाग्य मांगल्याची पिंजर अक्षता मस्तकी वाहवयाच्या.

अशाप्रकारे नवरात्रउत्सव झाला की मग येतो दसरा. साडेतीन शुभमूर्तातील एक पूर्ण मुहूर्त. साडेतीनचा अर्थ काय? तर कोणाचाही मानव देह असो. त्याच्या त्याच्या हातांनी मोजला तर फक्त साडेतीन हात. असा मानवदेह लाभण हाच एक मोठा मुहूर्त नां ?!!! मग सीमोल्लंघन!!! साधनेच्याद्वारा देहबुद्धीचे उल्लंघन करून आत्मबुद्धीच्या प्रदेशात पाऊल रोवायचे बघ. मग सोने लुटावयाचे !!! "कैवल्य-कनक" मोक्षलक्ष्मी.

कोणाबरोबर लुटावयाचे ? तर एक श्रीगुरुंच्याबरोबर **"कैवल्य कनकाचिया दाना। जो न कडसी थोरा-लहाना। द्रष्ट्याचिया दर्शना। पाटाऊ जो।।"**

असं श्रीगुरुज्ञानेश्वर महाराजांनी अमृतानुभवांत श्रीगुरुंचे सामर्थ्य वर्णन करताना म्हटले आहे.

ज्ञानाने कैवल्य नाही तर ज्ञानच कैवल्यात. हे ज्ञान अतिशय प्रशंसनीय आहे. गीतेत-ज्ञानेश्वरीत त्यांचे जागोजाग गुणगान, माहात्म्य, सामर्थ्य, प्रयोजन सांगितलेच आहे.

श्रीगुरुंच्या/आचार्यांच्या समीप जाऊन, साष्टांगे, सद्भावे, त्यांना वंदन करून, बंध काय ? मोक्ष काय ? विद्या काय ? अविद्या काय ? असे प्रश्न करून गुरुपरिचर्येने/सेवेने त्यांना संतुष्ट करून विवेक-वैराग्य-शमदमादिक उपायांच्याद्वारा श्रीगुरुंच्या कृपाप्रसादाने प्राप्त करून घ्यावयाचे. असे हे आत्मज्ञान की जे आपले मूलभूत स्वयंभू स्वरूप आहे, पण ते श्रीगुरुमुखातूनच सेवन करावयाचे असते.

अशा प्रकारच्या प्रश्नयाने म्हणजे अत्यंत श्रद्धापूर्वक, मोठ्या विनयाने, श्रीगुरुप्रसन्न झाले (करून घ्यावे लागते) की मग ते तत्त्वदर्शनशील ज्ञानी आचार्य आपल्या लाडक्या शिष्योत्तमाला ज्ञान देतात. सम्यग्दर्शी, आत्मसाक्षात्कार संपन्न आत्मवान असतात त्यांनीच उपदेशिलेले ज्ञान कार्यक्षम असते बरं !

ग्रंथ विकत घेऊन वाचल्याने ज्ञान होते असे मुळीच नाही. तर ते ज्ञान महावाक्य तत्त्वदर्शी अशा आचार्यांच्या/श्रीसद्गुरुंच्या मुखातून यावयास हवे. गायीने चारा, अंबोण, गवत, पेंड, सरकी खाल्यावर त्यातून रक्ताबरोबर दूध निर्माण होते, ते जसे गाईच्या आंचळातून काढावयाचे तसेच ह्या ब्रह्मज्ञानाचे.

ब्रह्म काय ? जीव काय ? जगत् काय ? ह्यांचा एकमेकांशी संबंध काय ? अशा तऱ्हेचे प्रश्न शिष्यांनी श्रीगुरुंना विचारावयास हवेत !!! केव्हा ? तर

साष्टांग नमस्कार/चरणावर मस्तक टेकवून, अनन्यभावाने शरणागती पत्करून, सेवेच्या (म्हणजे फक्त शारीरिक नव्हे तर श्रीगुरुंनी सांगितलेल्या साधनाचे अनुष्ठान करून) द्वारा प्रसन्न झाल्यावर. मग का विचारावयाचे ? तर शिष्य जिज्ञासू आहे का नाही हे जरी श्रीगुरुंनी ओळखले असले तरी शिष्याच्या प्रत्यक्ष मुखातून त्याची जिज्ञासा, अभ्यासाची तत्परता पाहून श्रोत्रीय, ब्रह्मनिष्ठ, तत्त्वदर्शी व कृपावंत, दयाघन श्रीगुरु आपल्या लाडक्या शिष्याला बरवे असे ज्ञान सांगतात.

या ज्ञानालाच ब्रह्मविद्या, आत्मविद्या, पराविद्या, राजविद्या, अध्यात्मविद्या अशी वेगवेगळी नावे शास्त्रकारांनी दिली आहेत.

बाकीच्या विद्यांचा अंतर्भाव अपरा विद्येत. अपराविद्या कितिही आत्मसात केली तरी अपूर्णच. समर्थ त्या विद्येला पोट भरावयाची विद्या असे म्हणतात. आता पराविद्या तीच की जिच्या योगाने अक्षर अशा परब्रह्माची प्राप्ती होते. हे सामर्थ्य एका पराविद्येतच आहे.

भगवंत हेच सुखनिधान (म्हणजे मोठा ठेवा). तो प्राप्त होण्यासाठी ज्ञान हेच अंजन. ज्ञान कर्माची लाणी, नैष्कर्म्य बोधाची खाण, भुकेल्या साधनांची धणी/तृप्ती, आहे. ज्या ज्ञानात प्रवृत्ती पांगळी होते. तर्काची दृष्टी जाते. मनाचे मनपण नाहीसे होते, बोलाचा बोलकेपणा थांबतो.

या ज्ञानात, पूर्णतेची पूर्णता आहे. समाधिचे रम्य समाधान आहे. भक्तिप्रेमाचा बरवा रस आहे. ज्ञान + भक्ती = भक्तिप्रेम आणि ज्ञान - भक्ती = अहं. भगवतीला अहंचा बळी द्यावयाचा की भक्तिप्रेमाचा प्रसाद मिळतो.

* * * *



# चिंतन ८६

“कोजागिरी” झाली. “**ऋतू बरवा शारदू। शारदी बरवा चांदू। चांदी बरवा चंद्रू। पौर्णिमेचा।।**” आता दिवाळी सुरूच झाली आजपासून. आज गुरुद्वादशी!!! श्रीहरी कैवारी, त्यामुळे “**सदा सण सात आम्हा नित्य दिवाळी !!**” वारकऱ्याला तर दिवाळी फारच आनंदाची ! का म्हणाल तर “**दिवाळीच्या मुळा लेक असावली। पाहतसे वाटूली पंढरीची।**” त्याच्या भेटीची जीवाला लागलेली आस, दिवाळी येते तीच त्या मायबापाचा सांगावा, प्रेमाचा सांगावा घेऊन.

भगवान् श्रीविष्णूच विठूरायाच्या रुपाने चंद्रभागेच्या तीरावर अवतरला आहे. बाळकृष्णाच्या रुपात तो भक्तांना खुणावत असतो. पालवत/बोलावत असतो. भक्त कधी येतात माझे, माझ्याकडे, याची वाट पाहात असतो. बसून नाही तर “**उभा कटी कर ठेवूनिया!!**”

विठ्ठल हे प्रेमस्वरुप, भक्तिप्रेमस्वरूप दैवत आहे. एक पांडूरंगस्वरूपच अपवाद आहे, की ज्याच्या हातात कोणतेही शस्त्र/अस्त्र नाही. आहे ते कमळ, भक्तांच्या, प्राणप्रिय भक्तांच्या पूजेसाठी.

“**विठ्ठला ऽऽऽ पांडुरंगाऽऽऽ**” अशी त्याला फक्त भक्तिप्रेमभावाने हाक मारायची. इतकच बस्. भक्ताच्या हाकेच्या आधीच त्या विठाईचे अंत:करण दरदरून भरून आलेले असते. आपल्या लेकरांना आपणच सांभाळायचे असते, त्यांची सर्वस्वी निगा आपणच राखावयाची, त्यांचे लळे, कोड, कौतुक आपणच करावयाचे/पुरवावयाचे. हे त्याला कधी सांगावे लागतच

नाही. लेकराची तहान-भूक आईला समजते ना ??? का लेकराला सांगाव लागत थोडेच ? नाही नां !!! **"जे आपत्य थानीहूनि निघे। तयाचि भूक ते मायेसीचि लागे।"**

लेकराची भारी माया, मोठेच कौतुक या विठाईला. लेकराने आळी (हट्ट) करावी आणि या माय-माऊलीने ती आवडीने पुरवावी; असा सर्वच महावैष्णवांचा अनुभव. या विठ्ठलाईचे चित्त तर माय-माऊलीहून मवाळ, त्यामुळे सदा सर्वकाळ चित्त आपल्या बालकांवर. मातेला आणि हां, नुसती माताच नाही तर बापही आहे ना ??? **"विठ्ठल माय-बाप, चुलता"** लेकराचे केवढे कोड कौतुक ???!!! **"ते जो जो खेळ दावी। तो तो सोनियाचा करुनी ठेवी."** ही विठाई कुरवाळोनी स्तनी लावते, सतरावियेचे स्तन्य/अमृतपान देंते, अनाहताचा हल्लरू गाते (म्हणजे अंगाई गीत, ते पण अनाहत नादाचे) आणि स्वानंद-समाधी बोधात आपल्या लेकराला झोपविते.

अशा या स्नेहाळ विठोबामायेचे प्रेम भक्तांच्या/तिच्या लेकरांच्याही रोमारोमात भिनलेले असते. होय नां ??? भक्तिप्रेमाने या लेकराचे जीवन रंगून गेलेले असते. अगदी अंतर्बाह्य. भक्तिप्रेम द्यावे-घ्यावे, भक्तिप्रेम अनुभवावे, भक्तिप्रेम पांघरावे, भक्तिप्रेमच अंथरावे, भक्तिप्रेमच खावे-प्यावे, अशी एक भक्तिप्रेममय वृत्तीच बहराला येते. "फुले वेचिता अतिबहर कळियासी आला/ येतो. हा विठ्ठलच, प्रेमाचा पुतळा, कृपेचा कोवळा आणि जीवीचा जिव्हाळा आहे. त्यामुळेच त्याच लेकरूपण भक्तिप्रेमातच मुसावलेल असत.

खर तर देवी लक्ष्मीचा, माता रुक्मीणीचा हा देव. तिला त्याची जवळीक नित्याची नाही का ? "परि तीही या प्रेमाचे न देखेचि सुख" अशी प्रौढी, मोठ्या आत्मविश्वासाने महावैष्णव सांगतात !!! या भक्तीप्रेमात अनेकदा रागाच्या-रुसण्या-फुगण्याच्या छटा असतात. **"रोषे प्रेम दुणवटे।**

**पढियंतयाचेनि।**'' हाच संतांचा अनुभव आहे. ''वेडे वाकुडे बालकाचे बोल'' परंतु ''करिती नवल मायबाप'' अशीच खात्री ग या महाभागवंताची.

या भक्तिप्रेमाचा कळवळा, जिव्हाळाच वेगळा. यात कोणताच हेतू नाही/नसतो. जन हे दिल्याचे/घेतल्याचे असेल, पण विठाईचा/श्रीगुरुज्ञानाईचा कळवळा कसा ? तर, करी लाभावीण प्रीती.

त्याला प्रेमाने आळवावयाचा. अशी आळवणीच ''प्रेम अमृताची धार'' असाच अनुभव येतो. या नामामृताने/प्रेमामृताने रसना ओलावली की सर्वत्र आनंदाचीच वृष्टी होते. सकल अवयव, सकल इंद्रियेच पांडूरंगस्वरूप-आनंदस्वरूप होऊन जातात. हीच आनंदामृताची दिवाळी या भक्तिपिसे असणाऱ्या प्रेमवेड्या आनंदकंदाच्या हातात, लेकरांसाठी गोड-गोड भक्तीप्रेमाचे भातुके (म्हणजे खाऊ) सदैव तयारच असतो.

* * * *

# चिंतन ८७

भगवंताचा साक्षात्कार अथवा अपरोक्षानुभूती ही जादू नाही तर एक श्रेष्ठ तत्त्वज्ञान आहे. शास्त्र आहे, बहुविध, विनाशी, विकारी आशा दृश्य विश्वाच्या मुळाशी असलेले एकच एक अविनाशी, अविकारी तत्त्व हे प्रत्यक्ष अनुभवाने जाणता येते. स्वानुभवाशिवाय त्याला जाणण्याचा अन्य दुसरा मार्ग नाही आणि ह्या अनुभवासाठी एका विशिष्ट मार्गानेच जावे लागते. ह्याच मार्गाला अध्यात्ममार्ग/देवयानपंथ असे म्हणतात. हे शास्त्र साहजिकच आत्मदर्शी संतांच्या वचनावर आधारलेले आहे, शास्त्र प्रामाण्यापेक्षा सुद्धा कांकणभर जास्त संतांचा अनुभव श्रेष्ठतम आहे.

साक्षात्कारी पुरुष/स्त्री, मनाने अत्यंत शुद्ध व थोर असतात, त्यांची बुद्धिमत्ताही खोल व उच्चतम दर्जाची असते. सामान्य मनुष्याला जे समजत नाही ते मोठ्या श्रमाने, स्वानुभवाने जाणून घेऊन मग आपल्या भगवंताचा अनुभव/ज्ञान ते मनुष्यमात्राच्या हितासाठी जगाला सांगत असतात बरं. त्याचा प्रत्येकाने फायदा करून घेतला पाहिजे !!! पण कोण घेतो ? नां ?

शास्त्रीय पद्धतीने या साक्षात्कार मार्गाचे परीक्षण केले असता, हा मार्ग मानसशास्त्राला व तर्कशास्त्राला धरून आहे असेच ठरते; संतांच्या वचनाचा जितका जास्त जास्तीत जास्त अभ्यास होईल तितका अभ्यासकाचा पाया दृढ होईल व त्यातील सत्य मनाला अधिकाधिक पटू लागेल बरं.

साक्षात्कार मार्गातही मानसिक अवस्थातून मनुष्य जात असतो. प्रपंच सत्य आहे, आपल्या भोवतालची जड सृष्टी, आपले आप्त/स्वकीय,

नातलग, यातच सगळे विश्व सामावलेले आहे. अशी माणसाची प्रथम कल्पना असते. अशा जीवांना शास्त्रकारांनी बद्ध जीव म्हटल आहे. यापैकी काही तीव्र संवेदनायुक्त जीवांचे जीवनविषयक विचार, दु:ख, निराशा, वंचना इत्यादी कारणांनी आमूलाग्र बदलतात. ह्या सर्वांमुळे असमाधान हा एक मोठा विकार उत्पन्न होतो व जगातील सामान्य उपायांनी हे असमाधान जाऊन मग परमशांती मिळत नाही हे त्यांच्या ध्यानात येते. नंतर ती शांती आपणास कशी मिळेल याचा शोध तो मनुष्य करू लागतो. यालाच ''मुमुक्षू'' अवस्था म्हणतात. या अवस्थेत पूर्वी वाचनात व ऐकण्यात आलेली संतवचने अशा मुमुक्षूंना आशेचे किरण दाखवतात.

मुमुक्षू प्रज्ञाघन असला तर देहात्मभाव (मी देह आहे असे मानणे) हाच जीवनातील सर्व दोषांचे मूळ आहे आणि ईश्वरप्राप्तीने हा देहभाव नाहीसा होऊन आपल्याला आपल्या मूळ आनंदस्वरूपाची प्राप्ती होते. **'अहंब्रह्मास्मि' 'मी वासुदेव तत्त्वता'** या वेदान्ताच्या तात्त्विक भूमिकेचा अभ्यास होतो. त्या (मुमुक्षूकडून) तसेच आपल्याच सारख्या तळमळीतून या आत्मसाक्षात्कारी संतांनी मार्ग काढला व शेवटी भगवत्प्राप्ती करून घेतली, अक्षय्य आनंद व परमशांती यांचा लाभ करून घेतला हे त्याच्या लक्षात येते; नुसते लक्षातच नाही तर पटते. आपणही त्याच मार्गाने गेले असता, आपल्यालाही तीच स्थिती प्राप्त होईल अशी श्रद्धा वाढते.

मग संतांची वचने वाचून, त्यांच्या तोंडून ऐकून, भगवंताचे स्वरूप काय ? त्याला जाणण्याचा मार्ग कोणता ? असा प्रश्न आला असता, एकच उत्तर त्याचे त्यालाच मिळते की, ''एका सद्‌गुरुकृपेशिवाय संतांचा हा मार्ग समजत नाही व आक्रमिता येत नाही.'' संतांचा मार्ग म्हणजे समर्थांच्या भाषेत ''राघवाचा मार्ग'' म्हणजेच भक्तिमार्ग.

श्रीसद्गुरु हे भगवंताचे दास असतात. भगवंताच्या दास्याने ते ईश्वरस्वरूप झालेले असतात. त्यांच्या कृपेने समजलेल्या भक्तिमार्गाचे स्वरूप आपल्या हृदयांत बिंबवून त्याप्रमाणे साधना करणे यालाच प्रवृत्त साधकावस्था म्हणतात. इतर सर्व विचार सोडून (संसार सोडून नव्हे) भगवंताची कीर्ती, गुण, नाम, लीला, चरित्रे गावयाची, त्याची सेवा करावयाची, अंत:करणात भगवंताबद्दल, प्रेमभाव वाढवावयाचा, श्रीगुरुंच्या ठिकाणी **"तेचि माझे हित करिती सकळ"** असा दृढ विश्वास ठेवावयाचा आणि भगवंताचाच ध्यास धरावयाचा.

हे सर्व होण्याला आपल्या सद्गुरुंनी दिलेल्या नामाचा अखंड ध्यास, त्याच नामाचे स्मरण हेच मुख्य साधन आहे नाही का ? !!! सद्गुरु वैद्य नाम-मात्रा देतात. ती घेताना सद्गुणाचे पथ्य व भक्तीप्रेमाचे अनुपान आवश्यक आहे. नामामध्ये भगवंताच्या सगुण व निर्गुण या दोन्ही स्वरूपाचा अंतर्भाव असतो. अशा स्मरणाने भक्ती वाढते.

परंतु या मार्गात विघ्ने आहेत. त्यांना न भिता आपल्या श्रीसद्गुरुवरील निष्ठा ढळू न देता, मोठ्या निश्चयाने, धैर्याने, साधन म्हणजे (श्रवण, मनन, स्मरण) करीत राहिले म्हणजे विघ्नांचा नाश होतो व साध्याची प्राप्ती होते. असे साधन करत असताना अनेक अनुभव येतात. थोडीशी प्रगती झाल्याबरोबर "आम्ही पूर्ण झालो" असा भ्रम होऊ नये, म्हणून श्रीगुरु साक्षात्काराची उच्च सीमा कोणती याची खूण साधकाला सांगत असतातच.

साधनाचे कष्ट न जुमानता, संतांचे संगतीत श्रीगुरुंच्या मार्गदर्शनानुसार दीर्घ साधन केल्यानंतर भगवंताचे समाधान, शांती, भाग्य, आनंद व कृतार्थता साधकाला लाभतेच लाभते हे अगदी खरं-खरं हं !

* * * *




दिवाळी झाली. दिव्यांचा-प्रकाशाचा सण. आनंदाचा सण, वसुबारसेला सुरु होऊन गोपाष्टमीला पूर्ण होणारा असा वर्षाकाठचा १२ दिवसाचा आनंदसोहळा. लक्ष्मीचे पूजन, भावा-बहिणींचे कोमल नाजूक पण भक्तीप्रेमाचे पक्के धागे अधिक दृढ करणारा सण. त्यातच नूतन संवत्सराचा प्रारंभ. वही-सरस्वती पूजन, वर्षभराचा आढावा, मागोवा आणि नूतन संवत्सरी करावयाचे शुभ संकल्प असा व्यवहार.

पण खरा-नित्य-नूतन-चिरंतन जेवणारा आत्मप्रकाशाचा आकाशदीप. हृदयाच्या आकाशात लावावयाचा, नाही-नाही, तो तर स्वयंभू. स्वयंप्रकाशच आहे, त्याच्या प्रकाशात आपण सतत-सातत्याने नांदायच. मग सगळ्याच्या सगळ्या कायिक-वाचिक-मानसिक क्रियातून आनंदाचाच प्रकाश, स्वानंदाचेच प्रकाशकिरण मंदपणे पसरतात. समग्र जीवनच आनंदाच्या लक्ष-लक्ष प्रकाश-पुंजांनी उजळून निघते गं!!!

भक्ती म्हणजे भगवंतावर त्या आनंदघन, सच्चिदानंदकंद मुकूंदावर प्रेम. निर्व्याज, निष्काम, निरलस, निरामय, निरंतर, निर्निमित्य प्रेमभाव. या प्रेमभक्तीमुळे, प्रभुप्रेमात रमल की सद्‌गुरुकृपेच्या सावलीत सहजच प्रवेश होतो व पुढे-पुढे जसजशी ही पवित्र-धर्म्य आणि नितांत रम्य अशी भक्तीप्रेमाची अवस्था वाढत जाईल ("प्रतिक्षण वर्धमानं") सूक्ष्म-सूक्ष्मतम होईल आणि अगदी शेवटी अनुभवाचा प्रत्यक्ष विषय होईल, तसतसे भगवंताचे, आनंदघन मेघश्यामाचे/श्रीगुरुंचे सामिप्य निरंतर प्रत्ययास येते

आणि यातूनच प्रभूदर्शन-भेट, आलिंगन, सुखाच्या त्याच्याशी होणाऱ्या गुजगोष्टी या घडल्याशिवाय राहातच नाहीत.

हा भगवद्दर्शनाचा सोहळा अतिंद्रिय अवाद्-मनसगोचर असतो. सूक्ष्म ज्ञानेंद्रियालाच (त्यालाच ऋतंभरा प्रज्ञा अस म्हणतात) त्याचा अनुभव **''जो इंद्रियाते चोरुनि जेवी। तयासीच फावे।।''** यालाच काही जाणकार चेतनसमाधी अस म्हणतात. यातूनच मग पुढे सहजसमाधी साधते. ह्या अवस्थेत मन एवढ निश्चल, निर्भय, निष्कंप झालेले असते की, कोणतीच दृष्य-जड-शक्ती ह्या भक्ताला यत्किंचितसुद्धा विचलित करू शकत नाही. हीच भक्ताची खरी समाधी.

भगवंत आपला कसा आहे ? तर तो सत्+चित्+आनंद = सच्चिदानंदघन आहे. सत् प्रगट स्वरूपात सर्वत्रच आहे. चित् म्हणजे तो जड नसून ज्ञानघन (ज्ञानप्रकाश) आहे. जो सत् आहे तोच चित् आहे आणि तोच आनंदही आहे. तोच राम-कृष्ण-हरि आहे पण आनंदस्वरूप मात्र अप्रगट आहे. जडामध्ये सत म्हणजे अस्तित्व आहे, पण ज्ञान आणि आनंद नाही. जीवामध्ये सत् आणि चित् प्रगट आहे पण आनंद अप्रगट आहे, अव्यक्त आहे, गुप्त आहे; म्हणजेच काय तर, या मानव देहात आनंदाचे वास्तव्य आहे, पण आपण तो आत न बघता, शोधता, न अनुभवता बाहेर शोधतो. परिणामी दु:खी, कष्टी, अशांत होतो.

या अंतर्यामी असणाऱ्या आत्मारामास ओळखून, अनन्यभावाने शरण जाऊन, प्रेमलक्षणाभक्तीने त्याला आपलासा करून, भक्तीप्रेमाच्या नाजूक पण घट्ट दोऱ्यांनी त्याला बांधून त्या चित्तचोराला हृदयकमळी बंदीवान केला की तोच एकमेव सच्चिदानंद-आनंदकंद भगवंतच, सर्वसुखाचा आरामच आपणातच खेळत आहेत, याचा सातत्याने अनुभव येतो आणि मग आपला

हा हाडामासाचा देहच त्या चिदानंदाचे प्रसन्न भव्य मंदिर बनतो.

जीव-शिवस्वरूप होतो "**जीवा-शिवाची जडली समाधी।**" ती हीच. नराचाच नारायण होतो. "**नर करणी** (म्हणजे प्रेमलक्षणाभक्ती) **करे तो नर का नारायण बन जाय**" अशी संतांची साक्षा. गोपींचंच उदाहरण पहा ना!!! एक गोपी सांगत आहे, त्या नंदलालाची "**लाली देखन मै गई**" मग पुढे काय झाले तर "**मै भी हो गई लाल।**" काय विलक्षण एकात्मतेचा हा श्रेष्ठ गोपीभाव आहे नां ??? धन्य-धन्य त्या गोपी.

अर्थात हा अनुभव देहभावाचा जसजसा विसर पडेल तसतसा वाढत्या-चढत्या प्रमाणात घडत राहतो. ज्यावेळी संपूर्ण शिवभाव उदयास येईल, संपूर्ण भगवन्मयता, तद्रूपता-तल्लीनता, तन्मयता-तदाकारता होईल त्याक्षणी भगवंताची स्वरूपताच हाताशी येते बरं कां ? "**देव पहावया गेलो। तेथे देवचि होऊन ठेलो।।**" त्यासाठी त्यालाच/भगवंताला/श्रीगुरुला निरखून-निरसून पुन:पुन्हा पाहात राहिले पाहिजे. त्या स्व-स्वरूपतेलाच "अपरोक्ष अनुभूती" असं श्रीमद्आद्य शंकराचार्यांनी म्हटले आहे.

"**निमिष न लगे मन वेधिता। एवढी तुझी स्वरूपता।।१।। विठोबा नेणो कैचि भेटी। उरणे नाही जीवेसाठी।।२।। उरले उपाधि कारणे। ते त्वा नेमिले दर्शने।।३।। तुकानंद म्हणे अळी। जीवी नुरेचि वेगळी।।४।।**" अशी ही रम्य समाधी-रम्य समाधान.

हे सर्व आपल्या जीवनात घडते, प्रत्ययाला येते, जीवनच होते. त्याला साधन भगवंताची प्रेमरसयुक्त, परमप्रेमलक्षणाभक्ती.

* * * *



# चिंतन ८९

आध्यात्मिक जीवनाची विशेष ओढ, अंत:करणात बहुत-बहुत जन्म-जन्मांतराच्या पुण्याईने लागते, अशी ओढ लागण्यावर समर्थ श्रीगुरुंची भेट होण्यास मोठेच भाग्य लागते आणि भेट झाल्यावर सुद्धा सद्‌गुरुंनी आपणहून अनुग्रह देणे आणि सत्‌शिष्याला, भाग्यवंताला तो न मागता मिळण हे तर महाभाग्य! असे पाडाला लागलेले, तयारीचे साधक-सत्‌शिष्य फारच थोडे, अगदी विरळच.

अशा मोजक्यांपैकी ज्यांच्या ठिकाणी मानसिक जागरुकता, श्रीगुरुचरणी दृढ विश्वास असून मोठ्या अढळ श्रद्धेने, भक्तीने आणि प्रेमभावाने साधन करणारे तर बोटावर मोजण्या एवढेच.

त्यातही परत, हातपाय न गाळता, आपले नामसाधन नेटाने, उत्साहाने चालू ठेवतात व ज्यांच्या साधन प्रयत्नांना, पारमार्थिक आत्मानुभवाचे थोडेसे फळ लाभते व जे भगवंताच्या महाद्वारात जाऊन पोचतात असे साधक तर त्याहीपेक्षा मोठे.

ज्या नामधारकांनी, अशा क्रमाने किंवा कुणी एकदमसुद्धा आत्मारामाच्या गाभाऱ्यात प्रवेश केला आणि स्व-स्वरूपज्ञानाच्या विटेवर उभ्या असलेल्या आनंदकंद श्रीपांडुरंगास अगदी समोरासमोर पाहून त्याच्याशी एकरूप होऊन त्या ऐक्यानुभूतीचा आनंद अनुभवला असे तर अगदीच विरळा.

अचानकपणे आलेल्या आपल्या अनुभवांचे, दैदीप्यमान, आनंदघन,

विस्मयकारक स्वरूप पाहून काही साधकांना फार मोठे आश्चर्य, गूढ वाटते. हा क्षणार्धात झालेला, आनंदातिशयाने मुसमुसलेला स्वानुभव भगवंताची अधिकच ओढ, व्याकुळता, मनात निर्माण करून जातो. काही वेळा, काही-जणांना, आपल्या देव-दर्शनाच्या (देवाच्या अनुभवाच्या, समरसतेच्या) आड येणारे हे काळे ढग आहेत अशी त्यांना भीती वाटते आणि आपल्या आध्यात्मिक प्रगतीमधील हा विलंब जाणवून त्यांच्या ठिकाणी जास्तच अधिरता निर्माण होते, वाढत राहते, भगवददर्शनाविषयी.

अशा अनुभवाचे थोडे अधिक सूक्ष्मपणे व तितकेच शांतपणे, निरीक्षण करावे, मग आपल्यालाच असे आढळून येते की ज्या निराशेच्या भावनेतून, खंडीततेतून आपणास पुढील वाटचाल करावयाची आहे त्या वाटेवर स्वच्छ प्रकाशकिरण चमकून जात आहेत आणि हा अंध:कार म्हणजे अंध:कार नसून तो तर लवकरच होणारा उष:कालच आहे. मग सहजच लक्षात येते की ज्या ढगांखाली आपण वावरत आहोत त्या ढगांच्या कडा प्रकाशमान (रुपेरी) झाल्या असून लवकरात लवकर ते ढगसुद्धा नाहीसे होणार आहेत, मग यातूनच एक सुंदर असा अनुभव येतो की आपल्या अंत:करणातील या आर्ततेलाही एक आगळा वेगळा (स्थूल, भौतिक, इंद्रियगोचर नव्हे) आनंदाचा हळुवार स्पर्श झाला आहे, होत आहे.

या अनुभवाचे स्वरूप असते, अनाहत नाद (टाळ, मृदंग, वीणा यांचा स्वर) (प्रत्यक्ष न वाजवता ऐकू येणारा नाद-स्वर) कधी अमृत रस, आपले तुकोबाराय म्हणतात, ‘‘**दिव्य रसे रसना ओलवली।**’’ दिव्य तेज:पूंज मुक्तामाला, कमलदले, हंस अशी दर्शने/अनुभव येतात, अशा अत्यंत प्रबळ आर्ततेतूनच अशा प्रकारचे प्रातिभ अनुभव प्रत्यक्ष मूर्त स्वरूप धारण करतात.

आपल्याला येणारे आध्यात्मिक अनुभव हे खरे आहेत की खोटे आहेत

हे नामधारकाला/साधकाला स्वत: पारखून पाहता येते. आजपर्यंत निरनिराळ्या काळात, देशात होऊन गेलेल्या थोर साक्षात्कारी संतांनी आपले अनुभव सांगून/लिहून ठेवले आहेत. त्यांच्याशी आपले अनुभव कितपत जुळणारे आहेत हे ताडून पाहता येते.

असे अनुभव आनंददायक, उत्तेजनकारक असतात हे या अनुभवाचे मुख्य लक्षण आहे. हे अनुभव म्हणजे देवाच्या खुणा अगर निशाणीच आहेत. परमार्थपथावर उभे असलेले दीपस्तंभ अगर या मार्गावरील अंतर दाखविण्याकरिता उभे केलेले किलोमीटरचे दगड यादृष्टीने तर त्यांचा फारच मोठा उपयोग आहे.

असा/असे अनुभव म्हणजे परमार्थातील अखेरच्या मुक्कामाचे ठिकाण नसून एक टप्पा आहे हे लक्षात ठेवावयास हवे ह! आत्मसाक्षात्काराचा अरुणोदय आता लवकरच होणार हे सांगणारा हा तांबड फुटण्याचा काळ आहे किंवा आत्मराजाची स्वारी आता लवकरच पदार्पण करत आहे अशी वार्ता देणाऱ्या भालदाराची ही मोठी ललकारीच आहे.

या सगळ्याची परिणती भगवंताच्या आनंदमय ऐक्यानुभूतीत, आत्म्याने आत्म्याला पाहण्यात, स्वरूपदर्शनात, गाय वासुदेव वासुदेवा यात झाली पाहिजे.

* * * *

# चिंतन १०

आज कार्तिक वद्य आळंदीवारी, श्रीगुरुज्ञानराजांचा संजीवन समाधी सोहळ्यासाठी येथे आलो. खूपच लांबचा प्रवास झाला पण विज्ञानाच्या सहाय्याने फारच सोपा आणि थोडक्या केवळ एक-एक तासाच्या अवधीत. कांची कार्यक्रम छान झाला. वास्तवात अण्णा काय ? ज्ञानोबारायांच्या चरणीचा एक धूलीकण ना !!!??? बाळाला अलंकृत करण्यात माऊलीला आनंद. बालक तर केवळ नेणतच !

सगळे भागवत, महाभागवत, महावैष्णव, साधू-संत महात्मे, सतत नामसंकीर्तन करतात, भजन करतात पण या भजन कीर्तनाच्या नटनाचाचा जगाला काय उपयोग ? श्रीमद् भगवद्गीतेच्या ९ व्या अध्यायांत **''सततं कीर्तयन्तो मां''** या श्लोकांत जीवन-मुक्त महात्म्यांच्या भजन कीर्तनाचे वर्णन केले आहे, पण त्याचा जगाला/समष्टीला काय उपयोग हे नाही सांगितले; पण आपल्या ज्ञानेश्वरमहाराजांनी याच श्लोकावरील आपल्या भाष्यात सांगितले -

**''ऐसे माझेनि नामघोषे। नाहीशी करिती विश्वाची दुःखे। अवघें जगचि महासुखे। दुमदुमित भरले।।''** गुह्य प्रगट करून सांगणे हे तर ज्ञानराजांचे अवतार कार्य.

नामघोष करतात हे संतमहात्मे आणि उपयोग कुणाला होतो तर त्यांनाच केवळ असं नाही; तर अवघ्या विश्वाला. विश्वासाठीच ज्याच जीवन तोच संत. नामघोषांनी साऱ्या विश्वाची त्रिवीध दुःखे (अध्यात्मिक, अधिदैविक आणि

आदिभौतिक) नाहीशी करतात. मोठी मौज आहे नाही कां ? भजन-कीर्तन-नामघोष करावयाचा या संतांनी आणि उपयोग होतो सर्व जगाला !!! संसारी माणसाच, याच्या उलट बघा. कोणतीही गोष्ट करावयाची जगाने, राबायचं इतरांनी आणि उपयोग मात्र याला. विश्वाकडून आपण सुखी व्हाव हा संसार आणि आपणाकडून अवघ विश्व सुखी व्हाव हा परमार्थ. केवढा आवाका या संतमहात्म्यांचा. "**अवघाचि संसार सुखाचा करीन।**" ही अपाल्या ज्ञानराजांची प्रतिज्ञा.

अर्थात संत-महात्मे एवढी क्रांती करतात की ज्यायोगे सर्व विश्व दु:खाच्या कचाट्यातून सुटते आणि सुखाच्या राशीवर बसते. यासाठी त्यांनी काय उपाय ? कोणत साधन स्वीकारल ? तर नामघोष. यांनी फक्त अखंड भगवंताच्या नामाचा घोष केला. नामजपापेक्षा समष्टीच्या कल्याणाचा विचार करताना नामघोषाला फार महत्त्व आहे, अनन्य साधारण मूल्य आहे आणि अफाट सामर्थ्य आहे.

आपले तुकोबाराय काय म्हणतात बघा, "**सदा नाम घोष करू हरिकथा।। लावूनि मृदंग श्रुति टाळ घोष**" या महात्म्यांनी संपूर्ण जगाच दु:ख नाहीसं करणारं आणि त्याला महासुखाने दुमदुमून टाकणार अस कोणत साधन स्विकारले असेल तर भगवत्‌नाम. हे साधनच अस आहे की जे आपल्या पुढे दु:खाला राहूच देत नाही. नामातील कृती, कार्य, परिणाम आहे दु:ख समूळ/सकारण नाहीस करण. जस सूर्यापुढे अंधार येऊच शकत नाही तस नामाच्या पुढे दु:ख येऊच शकत नाही.

नामस्मरणाने ही गोष्ट कशी घडते याचा विचार करता करता तत्त्वज्ञानामध्ये प्रवेश होतो. ज्ञानेश्वरी ग्रंथ हा तर अवघ्या तत्त्वज्ञानाचा परिपाकच.

मृत्यूलोकाचा स्वभावच दु:खदायक ''जो ज्याचा स्वभाव असतो तो काही केल्या बदलत नाही'' आणि जर बदलला तर मग त्याला स्वभाव कोणी म्हटल असत ???

मग नामघोषांनी या मृत्यूलोकाचा दु:खमय स्वभाव कसा बदलतो ? याचं उत्तर तत्त्वज्ञानाने अस दिलेल आहे की, दु:ख हे अज्ञान कार्य, अज्ञानाचा परिणाम आहे. दु:ख हे विश्वाच स्वरूप, विश्वाचा परिणाम अस नव्हे तर तो अज्ञानाचा परिणाम आहे. विश्व तर भगवंताचच स्वरूप आहे. ज्ञानोबारायांच कार्य तर ''**विश्व ब्रह्मचि केले।**''

संत महात्म्यांनी सर्व विश्व ब्रह्ममय केले याचा अर्थ नसलेल केल असा नाही. नसतेच तर कसे करणार ना? तर पहिल्यापासूनच विश्व हे ब्रह्मच आहे ''**सर्वं खलु इदं ब्रह्म**'' पण दु:खरुप का भासू लागल तर ''**लोपले ज्ञानजगी।**'' आपल्या सुखरुप आनंदस्वरूप आत्मारामाचा विसर हेच अज्ञान.

म्हणून सुखरूप-आनंदरुप जग; पण अज्ञानाने धुमाकूळ घातला दु:खाचा. तत्त्वज्ञानाच्यादृष्टीने दु:ख हे काल्पनिक आहे, आगमापायी आहे, दु:ख आगंतुक आहे, म्हणून स्वरूपज्ञानाने ते नष्ट होणारे आहे आणि ही स्वरूपज्ञानाची नजर नामस्मरण हे प्रत्येकाच्या हृदयात आणून देत.

तेव्हा अशारीतीने नामस्मरण हे आत्मज्ञानाची बैठक आणून देते. या ज्ञानदृष्टीतून पाहिल्यानंतर खरोखर दु:खाचा लेशच नाही, इतकच नाही तर नुसत सुखच नाही तर सर्वत्र एक महासुखच ओतंचप्रोतंच भरलेल आहे.

ही ज्ञानाची नजर संतमहात्म्यांच्या नामघोषातून प्राप्त होते आणि अशा तऱ्हेने विश्वातल काल्पनिक दु:खच नाहीसे होते आणि जगताला आनंदाचे आवार लाभते.

ज्ञानोबाराय तर काय ? समाधीमध्ये बसूनही कीर्तन चालूच आहे "**समाधि बैसला निर्वाण।**" पण "**कथा कीर्तन करीतू।।**" श्री ज्ञानेश्वरमहाराजांसारखे वैष्णव भूतलावर अवतीर्ण झाले आणि नामघोषाच्याद्वारा त्यांनी या मृत्यूलोकाचा स्वभाव बदलून टाकला आणि खऱ्या अर्थाने ज्याला सुख म्हणतात अशा अविनाशी शाश्वत सुखाने सारं विश्व कोंदून भरून टाकलं. साधन काय तर रामकृष्णहरी.

* * * *




मानवी जीवनाची सार्थकता, कृतार्थता, धन्यता, पूर्णता ही ईश्वराचा साक्षात्कार, ब्रह्मानुभव, आत्मानंदाची प्राप्ती यात आहे. ब्रह्म किंवा आनंद हे वस्तुत: जीवाचे स्वरूपच आहे परंतु ह्या आपल्या मूलभूत अशा सच्चिदानंद स्वरूपाचे विस्मरण झाल्याने त्याला नसलेले (नको असलेल) जीवपण प्राप्त झाले. देहतादात्म्य आणि त्यातून आकाराला येणाऱ्या अनंत वृत्ती हे आपल्या प्रत्ययाला येणारे जीवपणाचे प्रत्यक्ष स्वरूप आहे. ही अवस्था म्हणजे आपल्या मूळ आनंदघन स्वरूपाच्या ब्रह्मत्वाच्या विस्मरणाचेही स्वरूप आहे बर का ! अर्थातच आपल्या मूलभूत आनंदाभिरामस्वरूपाचे पुन्हा स्मरण करून घेणे म्हणजे एक अवस्था (जीवन) टाकून पहिल्या अवस्थेला येणेच आहे. म्हणजेच काय तर विस्मरणातून स्मरणाच्या अवस्थेपर्यंत साधकाला प्रवास करावयाचा आहे (आणि या प्रवासात साधन म्हणजे फक्त नामस्मरण हेच आहे)

हे देहतादात्म्य व वृत्ती घन, मध्यम किंवा विरळ असतात. म्हणून तर सत्त्व, रज आणि तम या त्रिगुणात्मक प्रतीकाने त्याचे विवेचन श्रीमद्भगवद्गीतेत केलेले आहे.

देहतादात्म्य व वृत्ती यातूनच राग-द्वेष, कर्म (काम्य कर्म), कामक्रोधादी विकार व सुखदु:ख ही जन्माला येत असतात. या सगळ्याच गोष्टींना एक सुटसुटीत नाव दिलेले आहे ते म्हणजे जीवभाव.

या जीवभावातून दूर होताहोता त्यातून पूर्णांशाने मोकळे होऊन

शिवभावाची अनुभूती घेणे हेच साधकाचे एकमेव ध्येय आहे. नुसता जीवभाव टाकून शिवभाव लाभत नाही हं ! शिवभाव जोडण्याचा स्वतंत्र प्रयत्न करावा लागतो. हाच साधनेतील मुख्य प्रयत्न. हेच मुख्य साधन. या साधनाने (म्हणजे भक्तीपूर्वक नामस्मरणाने) भक्तीभावानेच शिवभाव मिळतो आणि तेव्हाच जीवभावाचा पूर्णत: लोप होतो. तोपर्यंत मात्र एकाबाजूने जीवभाव कमी कमी होणे व त्याचबरोबर दुसऱ्या बाजूने शिवभाव वाढत जाणे या प्रक्रिया परम्परोपकारितेच्या (Reciprocal Causation) अत्यंत नियमाने सुरू असतात. हा जीवभाव कमी करण्याचे काम आत्मानात्म विवेक आणि वैराग्यातून सुरू होते. परंतु, भक्तिप्रेम मात्र विशेषत: नामस्मरणातूनच वाढू लागते आणि यातूनच खऱ्या अर्थाने जीवभाव कमी होऊन खऱ्या अर्थाने शिवभाव वाढीस लागतो; नुसता वाढत नाही तर पूर्णत्त्वाला पोहोचतो.

जीवभावाची आटणी करणे म्हणजेच तप आणि तप म्हणजे मुख्यत: भगवंताचे सप्रेम नामस्मरण व भगवंताचेच ध्यान, स्वरूपानुसंधान व नादानुसंधान यातून जीवभाव कमी-कमी होण्याच्याच प्रक्रिया घडत असतात.

भक्तिविचारात, आचरणात, प्रत्यक्ष भगवंत जोडण्याच्या प्रक्रिया घडत असतात.

भक्तीने साक्षात्कार, साक्षात्काराने आत्मानंद आणि या आत्मानंदाने चित्ताचा स्व-स्वरूपात (म्हणजेच आनंदात) लय व देहाचा विसर असा हा क्रम आहे. देहाचा विसर पडला की आपोआपच त्रिगुण, कर्मे, द्वंद्वे या सर्वांतूनच मुक्तता होतेच. कारण ही सर्व देहालाच लागलेली आहेत ना ?!! आत्माराम मात्र केवळ अलिप्त, आनंदघन आहे. त्याचा या पाठीशी काहीही संबंधच नाही.

भक्तिप्रेमाव्यतिरिक्त विवेक, वैराग्य, यमनियम, निष्काम कर्माचरण

इत्यादी साधनांनी फक्त सत्त्वगुणाचा सुंदर परिपोष होतो व व्हावयासच हवा परंतु ही सर्व साधने प्रकृतीतील असल्याने ती आपल्याला थेट देवापर्यंत पोहोचवून त्रिगुणातीत करू शकत नाहीत. त्याला म्हणजे भगवत्प्राप्तीला भक्तिच आवश्यक आहे. सत्व सुद्धा एक गुणच ना शेवटी !!! त्याचा नाश आत्मानंदानेच करावा लागतो.

भक्तिसाधनात भक्तीच्या अतीत व्हावयाचे नाही. भक्तीचा नाश अभिप्रेत नाही तर भक्तिच्या शिखराला पोहोचावयाचे आहे आणि हे शिखर म्हणजे भक्त आणि भगवंताचे मूलभूत ऐक्य अनुभवून पुन: ''**मी भक्त, तू देव**'' अशा कल्पीत द्वैतभावातून त्याची परमप्रेमस्वरूप सेवा म्हणजेच ''**गाय वासुदेव, वासुदेवा।**'' अशा बोधावर आरुढ होऊन होत राहणार नामस्मरण.

* * * *

# चिंतन १२

मानवी जीवनाची सार्थकता ईश्वराच्या साक्षात्कारात आहे. भगवंताची अनुभूती म्हणजे साक्षात्कार. नामचिंतनाच्या जोडीला (श्रीगुरूंकडून मिळालेल्या सबीज नामाचे चिंतन/स्मरण) श्रीगुरूंच्या कृपेची जोड लाभली की श्रीहरिगुरूकृपेने आत्मसाक्षात्काराची पहाट निश्चित उजाडते; व त्यातून आत्मानंदाचा लाभ-महालाभ होतो. आत्मसाक्षात्कार म्हणजेच ईश्वराचा इंद्रियातीत प्रत्यक्ष अनुभव; पण 'साक्षात्कार' या शब्दाचा उच्च अर्थ आहे शांत व भक्तिपूर्ण अंत:करणाने केलेले भगवंताचे (सगुण अगर निर्गुण) ध्यान/नामस्मरण आणि तद्द्वारा प्राप्त झालेली मनाची श्रेष्ठ अवस्था; किंवा स्तब्धपणे भगवंतात रममाण व तल्लीन होणे. "स्तब्धपणे" हा शब्द फार महत्वाचा आहे. स्तब्धता आहे तेथे वाचा खुंटणारच!!! साहजिकच मनाची ही अवस्था "अनिर्वचनीय" असते. पारमार्थिक अनुभवाचे हे पहिले ठळक लक्षण आहे. या अनिर्वचनीय अवस्थेचे वर्णन **"वाचे बोलता नये, शब्दा आली नि:शब्दता"** अशा प्रकारे केले आहे.

ही अनुभूती इंद्रियांपासून मिळणाऱ्या ज्ञानाच्या पलीकडील आहे. अशा अनुभूतीला चक्षू, कर्ण अशा बाह्य इंद्रियांची गरज नाही. नामसाधन चांगले वाढल्यावर डोळ्यांवर दगड बांधला तरीही उत्तम दिसते. इतकेच काय, पण दुसऱ्याच्या मनातील विचारही कळतात.

या अनुभवाचे दुसरे ठळक लक्षण म्हणजे हे अनुभव अंत:स्फूर्तीमुळे (Central Initiation) येतात. आत्मारामापासून एक आंतरिक प्रवृत्ती निर्माण

होते. या प्रवृत्तीच्या कार्याला, मुळी आतूनच प्रारंभ झालेला असतो, म्हणून तिला अंतरस्फूर्ती म्हणावयाचे. नामधारकाला/साधकाला अध्यात्मिक आत्मानंदाचे, रूपाचे जे दर्शन हेते, जे नाद (अनाहत नाद) एकू येतात, ज्या अमृतरसाचा व सुगंधाचा आस्वाद घेता येतो ते सर्व अनुभव बाह्य व दृश्य जगातून येत नाहीत, तर ते आतूनच येत असतात.

उदाहरणार्थ रसाचा अनुभव. नासिकाग्री दृष्टी ठेवून, भगवद्वस्तू पाहताना आपल्या घशात अमृतस्नान/अमृतस्त्राव होतो. आपल्या टाळूजवळ एक कुंड आहे. नामस्मरणाने ते कुंड अमृताने/रसाने भरते, मग लवंडते आणि मग ते अमृत घशावाटे पाझरते. हा अमृतरसस्त्राव फक्त मेंदूमधील पोकळीत (लॅटरल व्हेंट्रिकल्स) घशाच्या आत होतो अस नाही तर तो शरीराच्या प्रत्येक पेशीमधून (सेल) मधून होतो. मग रोमा-रोमात ज्योती, नाद, रंग, अनंद, महानंद (आत्मानंद, स्वानंद, ब्रह्मानंद) दुमदुमून उठतात.

आत्मानंदाची म्हणजेच आध्यात्मिक अनुभवाची वर जी लक्षणे सांगितली ना त्यासाठी जसा शक्तीचा/उर्जेचा उपयोग होतो, त्या शक्तीसच प्रतिभा, प्रज्ञा, अगर अंतरदृष्टी म्हणतात. ही शक्ती इंद्रियातीत असते. प्रत्येक मनुष्याच्या मनामध्ये भगवंताचा अंश असतोच. साधक या शक्तीचा उपयोग आपल्या नामसाधनेच्या द्वारा करत असतो. ही प्रतिभाशक्ती बुद्धी,-भावना-क्रिया यांच्या वरची, पलीकडची आहे. पण तिचा या तीन शक्तींशी विरोध नाही. उदाहरणार्थ भावनेला परमार्थात स्थान आहे, मोठेच स्थान आहे. आपल्या अंत:करणातील भावनाच शुद्ध व पवित्र झाल्यावर व त्या भावनेचा देवाच्या/श्रीगुरूंच्या सेवेसाठी उपयोग केल्यावरच मग प्रतिभेने भगवंताला समोरासमोर प्रत्यक्ष पाहणे घडते. म्हणून या अनुभवास प्रतिभा अनुभव म्हणतात.

श्रीगुरूंकडून सबीज नाम प्राप्त झाल्यावर, नामोपदेश घेऊन नामस्मरणाचा/चिंतनाचा/ध्यानाचा सुदीर्घ अभ्यास झाला की जो पारमार्थिक भाव उत्पन्न होतो, वाढीस लागतो, त्यामुळे ही प्रतिभाशक्ती जागृत होते. नामस्मरणाचा अभ्यास फार-फार महत्वाचा. या नामस्मरणाच्या अभ्यासामुळे वृत्ती नाहीशा होऊ लागतात; आणि प्रतिभा वाढीस लागते.

अशी जागृत झालेली प्रतिभाशक्ती पाठीच्या कण्यातील मज्जारज्जूंच्या (सुषुम्ना) मार्गाने मेंदूतील ज्ञानकेंद्रांना पोहोचते व तेथे आत्मानुभव (आनंदाची अनुभूती) येतात. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध असे, पण अतिंद्रिय असणारे असे हे अनुभव असतात. आत्मारामच सर्व विश्वाचे आद्यकारण आहे व तोच आत्माराम निसर्गात, मानवी देहात आणि चराचरात आंतरबाह्य व्यापून राहिलेला आहे.

त्यामुळे एक भगवंतच नामधारकाचे पाहणे न पाहणे, ऐकणे न ऐकणे, स्पर्श करणे न करणे, चाखणे न चाखणे, गंध घेणे न घेणे यास व्यापून आपणच सर्व होतो. याला उपनिषद्वाक्य प्रमाण आहे. उपनिषद्कार म्हणतात, डोळे पाहात नाहीत, कान ऐकत नाहीत, तर आत्माच पाहातो, (आत्म्यास) आत्माच ऐकतो (आत्म्यास) हे अद्वैत. हा अद्वैतानंद. एकरूपआनंद.

* * * *

# चिंतन १३

कोणत्याही धर्म, पंथ, संप्रदाय, जात, वर्णाच्या, कोणत्याही कालातील, प्रत्येक मनुष्यमात्रास, परमात्मप्राप्तीचा लाभ निश्चितपणे मिळवून देणारा आणि अवघ्याजणांना लोकांना मुक्तद्वार असलेला भक्तिप्रेममार्ग हा अनादी कालापासून चालत आला आहे; तसाच तो वेदानुमोदित आणि शास्त्रप्रतिपादित आहे. तसाच तो अवघ्यांना अत्यंत लोकप्रिय आहे.

या मार्गात घरादाराचा, कुटुंबीयांचा, उद्योग-धंदा-व्यापाराचा त्याग करून, रानावनात जाण्याची, तसेच कठोर देहदंड सोसण्याची आवश्यकता नाही. असाल तेथेच व असाल त्याच स्थितीत या मंगल-महन्मंगल भक्तियोगास शुभारंभ करता येतो.

भगवंत हाच अंत:करणाचा एकमेव भक्तिप्रेमविषय करून आपले मन, बुद्धि, विचार, ममत्त्व, विकार हे आणि असेच सर्व भाव त्या आनंदघन प्रेमस्वरूपाच्या ठिकाणी/चरणी अर्पण करावयाचे आणि सतत त्याच्या गोड स्वरूपाशी अनुसंधान ठेवून त्याच्या अखंड स्मरणात/नामस्मरणात राहावयाचे.

मग अशा मार्गाने, या राजमार्गावर सातत्याने प्रगती होतच राहते. आणि अशाप्रकारे त्या आनंदचिद्घन भगवंताचे अनन्यभावाने चिंतन करणारा भक्त हा शेवटी भगवत्स्वरूपात लीन होतो! आणि याच्या पुढचा थोर नवलाव म्हणजे असा परमात्म्याशी एकरूप होऊन पुन: ‘‘मी भक्त-तू देव’’ अशा कल्पित दैतभावातून, त्या भगवंताची सेवा करून अखंड भक्तिप्रेमसुख

अनुभवत असतो!!! काय हा भक्तिप्रेमसुखाचा नवलाव ना ? आणि हे भक्तिप्रेमसुखाचे अमृत-दिव्य अमृत आपणच एकटा सेवन न करता सर्वांना मुक्तहस्ताने वाटतो!!!

भक्ती हा गडबडगुंडा नाही तर भक्ती हे एक शास्त्रच आहे. या शास्त्राचे स्वरूप तरी काय आहे ? तर व्यवहारात आपल्याला ज्याची आवड असते, त्याचे जाणीवपूर्वक, नंतर सवयीने मग स्वभावत:च त्याच आवडीने चिंतन होऊ लागते. ती आवड सातत्याने पूर्ण व्हावी असे वाटते. असे आवडीचे प्रसंग, सुखद-आनंददायक प्रसंग, आपल्या आयुष्यात पुन:पुन: यावेत असे मनापासून वाटू लागते, वाटत राहते. त्या आनंदमय प्रसंगाबद्दल आपण सुखद चित्रे सातत्याने मन:पटलावर, आपल्या अंत:करणात रंगवत असतो. त्यात आपण रंगूनच जातो. थोडा जरी अवधी मिळाला तरी आपण या आनंददायक, आनंदस्वरूप, आनंदाकार आवडीचे चिंतन करीत असतो. होय की नाही ?

आपले भारतीय मानसशास्त्र सांगते की, सतत कसले ना कसले तरी चिंतन करणे, करत राहाणे हा तर मानवी स्वभावच आहे पहा. एक क्षणार्ध सुद्धा मनुष्याला चिंतनावाचून राहता येत नाही आणि याच ईश्वरदत्त (अगर नैसर्गिक म्हणा हव तर) भावाचाच मुख्यत्त्वेकरून उपयोग या श्रेष्ठ अशा भक्तियोगात साकार झाला आहे, उपयोगी आला आहे.

कसा उपयोगास आला आहे ? पहा ना !!!

आपल्याला कसलेतरी, कशाचे तरी, चिंतन केल्यावाचून राहताच येत नाही; अस जरी असल तरी चिंतनाचा विषय तर बदलता येतो की नाही ? मग झाल तर !!!

परमानंदाचा पुतळा परमेश्वर/श्रीगुरु हाच जर आपल्या चिंतनाचा विषय करता आला नां तर, त्या चिंतनस्वरूप मनाच्या वृत्तिप्रवाहासच भक्तिशास्त्रकार भक्ती असे म्हणतात.

आता कुणी विचारील की ''भक्तिमध्ये चिंतनाचा विषय भगवंतच का असावा ? तर त्याच उत्तर अगदीच सोपे आहे !!!

भगवंतच एकमात्र अजर, अव्यय, अविनाशी, नित्यचैतन्य आणि निरतिशय, निरामय, सुख-आनंदस्वरूप आहे. त्यामुळे अशा आनंदघनराम भगवंताचे चिंतन घडल्यावर आपण अगदी सहजच आनंदस्वरूप होऊन राहू. खर की नाही.

आणि या आनंदकंदाचे चिंतन पण आनंददायकच.

* * * *

# चिंतन १४

भक्ती म्हणजे भगवंताविषयी **परमप्रेमभाव**. ही भक्तिप्रेमभावना मोठी उत्कट हवी. ती एक केवळ क्षणिक उर्मी असून चालणारच नाही; तर सतत धावणारी, अखंड आणि क्षण-प्रतिक्षण वर्धमान होत जाणारी अशी **भक्तिप्रेमभावधारा** असली पाहिजे. थोडासा भाव, थोडेसेच पूजन, भजन, वाचन, श्रवण एवढ्याने भागत नाही !!! तर मग किती हवा तो भाव ? तर सर्वच्या सर्व अंत:करणच या भक्तिप्रेमभावाने अंतर्बाह्य व्यापून गेले पाहिजे !!, आणि त्याचबरोबर आपले मन-बुद्धी त्या एका भगवंताच्याच विचारात आत्मीयतेने रस घेणारी झाली पाहिजे. असे होण्यासाठी त्या सावळ्या सुकुमार, आनंदचिद्घन भगवंताबद्दल परम आदर तसाच नि:स्वार्थी-निष्काम **भक्तिप्रेमअनुराग** असणे अत्यंत आवश्यक आहे. नाहीतर काय होईल ? तर सुरवातीच्या चार दिवसानंतर उत्साह, ओढ, अधिरता, तळमळ, उत्कटता पार सर्वच मावळून जाईल. श्रीज्ञानोबाराया म्हणतात, "**वर्षाकाळी सरिता। जैसी चढो लागे पंडुसूता। तैसी निच नवी भजता। श्रद्धा दिसे।।**" नारद म्हणतात, "**प्रतिक्षण वर्धमानम्**". भगवद्भक्ती प्रेमयुक्त झाल्यावाचून उत्कट, एकाग्र, अव्यभिचारी आणि चिरस्थायी होऊच शकत नाही आणि अशी भक्ती झाल्यावर ती अत्यंत उत्कट प्रेमभक्ती ही एक त्या भगवंताची/ परमेश्वराची **शक्तिरुपा** होते. मग अशा भाग्यवान थोर महाभागवताच्या निकट, कृपाकटाक्षात, छायेत, आश्रयाला जे जे येतील ते ते सुद्धा, मोठेच भगवद्भक्त होतात !!!!

भक्ती ही दिव्य, भव्य आणि उदात्त आहे. कोणताही लाभ हेतू अथवा

लौकिक आशा-अपेक्षा न ठेवता श्रीहरीची निष्काम, उत्कट, मधुरभक्ती सातत्याने चढत्या-वाढत्या प्रमाणात करणे हेच निष्कलंक, निरागस, निरामय, भक्तीचे द्योतक आहे.

ही अत्यंत विशुद्ध निष्काम भक्ती सदा सर्वदा अहैतुकीच असते बघ. जरासा पण लाभ हेतू न ठेवता, अंत:करणापासून उसळणाऱ्या अकृत्रिम भक्तिप्रेमापोटीच ती प्रकटते, आकाराला येते आणि क्रियारुप होते.

अशा भक्ताला भगवंताच्या दर्शनानंदावाचून अन्य काहीच कामना नसते. **''एकच कामना तो मज व्हावा, तो मज व्हावा। वेळोवेळा व्हावा पांडूरंग।''** नृसिंह भगवंताने जेव्हा प्रसन्न होऊन भक्त प्रल्हादास कोणताही वर मागण्यास सांगितले, तेव्हा त्याने तात्काळ चोख उत्तर दिले, **''स्वामिन् कृतार्थोऽस्मि, वरं न याचे।।''** तो म्हणाला, ''हे प्रभो, आपल्या (इतरांना अलभ्य अशा) दर्शनानेच मी कृतार्थ व पूर्णतृप्त झालो आहे!!! आता आपल्या पुण्यस्मरणावाचून, आनंदस्मरणावाचून अन्य कोणतेही वरदान मला नको हो!!! आपले श्रीतुकोबाराया हेच सांगतात, **''हेचि दान देगा देवा। तुझा विसर न व्हावा।।''**

अशा निरपेक्ष, निर्मम, निर्मळ भक्तिनेच तो जगदीश्वर परमात्मा प्रसन्न होऊ शकतो. अशा भक्तिप्रेमयोगात एक केवळ एक त्या **आनंदघनरामाचेच** चिंतन उरते. अखंड एकमेव, भगवद्चिंतनासाठी मन एकाग्र व्हावयास हवे ना? आणि भगवद्स्वरूपावर मन एकाग्र करणे, त्या केवळ **आनंदस्वरूपाचेच** चिंतन करणे किती कठीण आहे याची कल्पना **नाम-चिंतन** करावयास सुरवात केली म्हणजेच कळते, की ते किती भरकटते ? कोठे-कोठे जाते ? कशा-कशाचे चिंतन करते ?

मग यावर उपाय काय ? मन स्थिर करण्यासाठी योग व ज्ञान या मार्गात

अनेक उपाय कथन केले आहेत, पण ते सर्वच्या सर्व अती **रुक्ष** आहेत. भक्तिमार्गात एकच उपाय आहे व तो मोठा रम्य आणि अमोघ आहे. भगवंताची दृढ उपासना म्हणजे त्याचे **नामस्मरण**.

भक्तिमार्गात तत्त्वचर्चा व शास्त्राभ्यास यापेक्षा आचारावर व भावनाप्रवाहावर अधिकाधिक भर दिला आहे. उपासकाने/भक्ताने आपल्या सर्वच्या सर्व भाव-भावना भगवद्केंद्रित/श्रीगुरुकेंद्रित व संबंधित करावयाच्या. मग सगळाच्या सगळा आचार श्रीहरिप्रित्यर्थ त्या आनंदकंदासाठीच करावयाचा. अशा सर्व भावभावना व सर्व आचार भगवद्केंद्रित होणे हीच भक्ती होय.

अशा प्रकारे चित्त-भाव-भावना-आचार अतूटपणे वासुदेवाच्याच ठिकाणी जोडले जाणे, आसक्त होणे, हाच श्रेष्ठ असा भक्तियोग आहे. हा साध्य झाला की मग पूर्ण वैराग्य, भगवंताचे समग्रज्ञान, त्याचे दर्शन व अचल अशी वासुदेवस्वरूपता या सर्व गोष्टी सहजच प्राप्त होतात आणि भक्त हा भगवंताशी मूळच्या तन्मयतेला, तदाकारतेला, तद्रूपतेला, तल्लीनतेला प्राप्त होतो.

* * * *

# चिंतन १५

मकर संक्रमण म्हणजे स्थित्यंतर, स्थानांतर, अवस्थांतर. तीळ-शर्करा, वाण-वसा हा अधिभौतिक भाग. जीवदशा ओलांडून शिवदशा अनुभवणे हे अवस्थांतर. त्यासाठी उपासना म्हणजे भगवंताची प्रेमलक्षणा परमप्रेमस्वरूप भक्ती. भक्तिरसायनाचा सुमधुर पाक. भगवद्‌दर्शनाच्या उत्कट आचेवर, जीवरुप तीळावर हळूवारपणे चढवता-चढवता, अष्टसात्विकभावाचा छान काटा येतो. ढळतो, येतो-ढळतो आणि होता-होता जीवाचे रुपांतर दाणेदार, शुभ्र, स्निग्ध, मधूर हलव्याच्या रुपाने शोभू लागते. या मकर संक्रमणानिमित्त अण्णांनी दिलेल्या या वाङ्‌मयीन तीळ-शर्करा मोठ्या भावपूर्ण अंत:करणाने, एका विश्वासाने, आत्मीयतेने दिलेल्या शब्दस्वरूप तीळ-शर्करा म्हणाव्या इतक्या शुभ्र, दाणेदार, गोल, सुंदर-सुबक नसतील पण आहे ती केवळ परमशुद्ध स्वच्छ आत्मीयता. भक्तिभावाचीच हळद, ईश्वर/श्री गुरुनिष्ठेची पिंजर, नामानुसंधानाची किणकिणणारी कांकणे/अक्षय चुडा आणि भगवद्‌प्रेमाच्या धाग्यांनी विणलेला खण. गोड माना.

भक्तिसाधक हा किंवा ही कोणीही असो ९९% **संसारीच** असतो. तो लोकांमध्येच राहातो, वावरतो आणि जीवन व्यवहार करत असतो. त्यामुळे त्याच्या जीवनक्रमावर अगदी सहजच, स्वाभाविकपणे, अनेक लौकिक बंधने पडत असतात. तथापि, **भगवत्‌प्राप्ती** हेच ध्येय निश्चित करून, निरलसपणे, निष्ठेने, एकविधभावाने, काही काळ (कित्येक वर्षेसुद्धा) साधना केल्यानंतर मात्र त्याच्या (साधकाच्या) स्थितीत असा फरक पडावयास हवा की

इतरेजनांच्या आवडी-निवडीपेक्षा आपली आवड वेगळ्या **स्वरूपाची** आहे. हळू-हळू हा फरक लक्षात येतो. नंतर तर एक अशी स्थिती येते की लौकिकाचा संसर्गही सहन होईनासा होतो. एक प्रकारचा भिन्न-भिन्न मनोवृत्तींचा सरळ विरोध (Temperamental Conflict) उद्‌भवतो. अशा वेळी तळमळीच्या साधकाने काय करावे ? आपले भगवत्प्राप्तीचे ध्येय सोडून इतरेजनांप्रमाणेच वर्तावे काय ?

तर काही झाले तरी भगवत्प्राप्ती साधावयाचीच, असा प्रथम दृढ संकल्प करावा; मग काया-वाचा-मनाने एकच एक हरिभक्ती करावी. आपले सर्व अवधान एकमात्र हरिभक्तिकडेच केंद्रित करावे. हाच **स्वधर्म**. भगवंताच्या भक्तिप्रेमाच्या तुलनेत लौकिक, व्यावहारिक गोष्टी या दुय्यमच. म्हणून एक एकान्तिक परमप्रेमलक्षणाभक्तिचीच कास धरावी. काही लौकिक सोडावा लागला तरी चालेल. प्रसंगी निंदा-चेष्टा-कुचेष्टासुद्धा होईल. पण ते सर्व मनोधैर्याने सहन केले पाहिजे. ‘‘**हे करू का ते करू**’’ असा धर-सोडपणा सोडला पाहिजे. भगवान् सांगतात, ‘‘**अर्जुना, सर्वधर्मान् परित्यज्य मां एकं शरणं व्रज ।।**’’

मात्र लौकिक टाकायचा तो काहीतरी लोकविलक्षण, सनसनाटी प्रसिद्धी यासाठी नाही. समाजधारणेसाठी कर्तव्यविचार-आचार, अत्यावश्यकच आहे; पण ते पाळत असताना एक **श्रीहरि** हाच विचार, उच्चार व व्यवहार करावा. ‘‘**बोलावा विठ्ठल, पहावा विठ्ठल, करावा विठ्ठल जीवभाव ।**’’

साधकावस्थेत, सर्वभावाने श्रीहरी/श्रीगुरुला समर्पित होऊन स्वत:ला सर्वतोपरि हरिभक्तित झोकून द्यावे, काय होईल ? मग कस होईल ? मग कस होईल ? याची चिंता करू नये. सर्व काही श्रीहरी/श्रीगुरुवर सोपवून आजन्म, अव्याकृत केवळ हरिस्मरणात रहावे.

राग म्हणजे प्रेम. अनुराग म्हणजे उत्कट भक्तिप्रेम. सर्वकाळ श्रीहरीशी संपर्क साधणारी अशी तैलधारावत् अखंड एकाच दिशेने वाहणारी भक्ती. मग नसानसातून, मनबुद्धीतून, पंचप्राणांतून **हरिभक्ती** हाच एकमात्र भावओघ प्रगटतो.

असा भक्तिप्रेमभाव सतत उसळणे म्हणजेच रागानुराग भक्ती. मग भक्ताला अनुपम आनंदाचा, ईशचैतन्याच्या रोमहर्षक झोताचा अमृतप्रवाह जाणवू लागतो. आम्रवृक्षाला मोहोर यावा, त्याचा सौरभ आसंमतात पसरावा तसे घडते. तुकोबाराया म्हणतात, ''**भाग्यवंत हरिभक्त। मुक्त लज्जा विरहित झाले वोसंडत। नाम किर्ति पवाडे।।**''

देवाधिदेवाचे स्मरण करता करता त्याचा कृपानुग्रह भक्तावर होतो. श्रौत, लौकिक, रुढ, आचार, व्यवहार यांची बंधने गळून पडतात आणि अजोड भक्तिप्रेमामुळे भक्त-भगवंत, श्रीगुरु-सत्‌शिष्य यांच्यात भावनिक तादात्म्यता निर्माण होते आणि मग भगवंत/श्रीगुरु भक्तांचा सर्वतोपरी योगक्षेम सांभाळतात म्हणजे (त्याचा लौकिक, व्यवहार, आचार) पण भक्ताची भगवंतावर, शिष्याची श्रीगुरुवर अत्यंतिक दृढनिष्ठा हवी.

* * * *

# चिंतन १६

आपल्या हृदयातील भक्तिप्रेमभावनेचा परमोच्च भाव म्हणजेच एकांत-भक्ती होय. हिलाच कोणी अद्वैतभक्ती अथवा पराभक्ती असेही म्हणतात. अशी भक्ती करता करता मग भक्ताला सर्व लौकिक सुखे, सुखकल्पना व जीवनव्यवहार नीरस वाटू लागतात. एका भगवंतावाचून दुसरे काहीही आवडेनासे होते. भक्त मग आपला सर्वजीव, प्राण एकवटून हरिप्राप्तीसाठी झटतो, तळमळतो. जरा एक क्षणभरसुद्धा श्रीहरीचे विस्मरण झाले तर तो कासावीस होतो. अगदी व्याकूळ होतो.

''**ना अरत्र ना परत्र**'' म्हणजे लौकिक व्यवहाराविषयी उदासता आणि श्रीहरिप्राप्ती तर अद्याप झालेली नाही अशा ''**ना हा काठ ना तो**'' अशा अवस्थेत दिवस कष्टाने कंठीत असताही, जो हरिस्मरण एक क्षणभरसुद्धा सोडीत नाही अशा भक्तास अचानकपणे, आवडत्या देवाच्या स्वरूपात सगुण साक्षात्कार होतो.

ते ईश्वरीयस्वरूप भक्ताला तृप्त करून, त्याच्यावर आनंदघनाचा अमृतवर्षाव करून अल्पकालात अंतर्धान पावते आणि नंतर त्या सच्चिदानंद **आनंदकंद** परमात्म्याचा प्रत्यय चराचर स्वरूपात सृष्टीत-अणूरेणूत अव्यक्तपणे येऊ लागतो !!! ज्ञानदृष्टीने ही ब्राह्मिस्थिती तर भक्तियोगाच्या दृष्टीने हीच एकान्तभक्ती; पराभक्ती, अद्वैतभक्ती होय. या अनुभवाच्या स्थितीत भक्त व देव यातील अंतरच लोपते. त्यांचे मूलभूत ऐक्य प्रकटते, विलयू लागते. ही परमोच्च भक्ती प्रत्येक भक्ताने आत्मसात करावी असा नारदासारख्या

भक्ताचार्यांचा प्रेमळ आग्रह आहे.

भक्तीचा अपार महिमा येवढ्याने संपत नाही. ही परमप्रेमस्वरूपाभक्ती, कर्म, योग व ज्ञान या अध्यात्ममार्गापेक्षा **अधिकतरा** आहे. आता ही अधिकतरा कोणत्या बाबतीत आहे ? तर परमविरहावस्था आणि विरोधी भक्ती.

पराभक्तीच्या प्रकर्षाने प्रकट होणाऱ्या आणि अखिल जीवन व्यापणाऱ्या एका स्थिर प्रत्ययी महाभावाला, **आनंदभावाला** भक्तिशास्त्रकारांनी एक वेगळेच विशेषण जाणीवपूर्वक योजले आहे, ते म्हणजे **आसक्ती**. सक्त म्हणजे जोडले जाणे; वज्रलेप होणे; या व्युत्पत्तीनुसार आसक्ति म्हणजे ''आपल्या आवडत्या विषयाबद्दल मनास वाटणारी अनिवार्य ओढ आणि या ओढीमुळे मनुष्य त्या विषयाशी, विचारांनी व भावनांनी आसक्त होणे.'' प्रत्येक मनुष्यमात्राचा आवडता विषय वेगळा-वेगळा असतो. अनन्यभक्ताचा एक **आनंदकंद भगवंतच** आवडता विषय असतो. म्हणजे आसक्ती ही भगवंताशी जोडली गेल्यावर तीचेसुद्धा **उन्नयन** होते. तो श्रीहरीशी अतूटपणे जोडला जातो.

नाहीतर एरवी साधारणपणे वाईट गोष्टींची सवय दर्शवण्यासाठीच ''आसक्ती'' हा शब्द योजला जातो. जसा, व्यसनासक्ती, द्यूतासक्ती, धनासक्ती, सत्तासक्ती इत्यादी. अशा माणसाला आपल्या आवडीच्या गोष्टीबद्दल आत्यंतिक ओढा असतो. तत्पूर्ततेसाठी तो वाटेल तेवढे कष्ट व साहस सोसतो; परंतु **भगवंत** हाच एक मात्र आवडीचा (आनंदाचा) विषय होतो व त्याचबरोबर परमभक्तिप्रेमाने ओथंबलेली **अत्युत्कट** भावधारा हृदयात सतत उचंबळते, तेव्हा त्याच आसक्तिस **मान्यप्रद (अत्यंतमान्यप्रद)** भक्ती असे म्हणतात ना !!!???

भगवंताच्या ठिकाणी चित्त आसक्त होणे ही गोष्ट भक्तिशास्त्राने अत्यंत प्रशंसनीय म्हणून वर्णिलेली आहे. ती भक्तिप्रेमाची एक अत्युच्च कोटी आहे. सामान्य आसक्त मनुष्याच्या ठिकाणी स्व-आवडीबद्दल/व्यसनाबद्दल जी एकनिष्ठता, क्रियाशीलता, तडफ, उत्साह इतकच काय जशी निर्लज्जता असते, अगदी तशीच एकाग्रता, प्रयत्नशीलता, भगवत्प्राप्तिसाठी भक्ताच्या ठिकाणी असावी हेच ''आसक्ती'' या शब्दामागील प्रयोजन भक्तिशास्त्रकारांना अभिप्रेत आहे.

असे झाल्यावर भक्ताची काय अवस्था होते पहा. ''**आता मज एक विठ्ठलाचा छंद। लौकिक संबंध दूर ठेला।। विठ्ठलावाचून न बोले वचन। न देखे नयन दुजे काही।। मज रात्रंदिन विठ्ठलाचे ध्यान। वाटे जीवप्राण विठ्ठलचि।।**''

ब्राह्मभाव प्राप्त झाल्यावर, ज्या सर्वात्मभावांत ज्ञानी/योगीपुरुष असतो, त्याच शिखरोच्च अवस्थेत भक्त **भक्तियोगाने/प्रेमाने** अवस्थित असतो. पण त्यानंतरसुद्धा ''आई, मला निर्विकल्प समाधीचा निश्चेष्टपणा नको, तर मला तुझ्या सृष्टीत युक्तपणे नाचू दे, गाऊ दे, भजन-पूजन करू दे' असेच श्रीरामकृष्णपरमहंस विनवित असत. अशा देवभक्त सापेक्ष द्वैतभावाला बाळगून तो भक्त काही विशिष्ट **स्नेहसंबंध, विविध नातेसंबंध** स्वीकारून त्या आनंदघनाशी आमरण अतूट नाते जोडतो.

* * * *

# चिंतन १७

श्रीगुरुजवळ काय मागावे? तर "**अवीट पदपद्माची अमला भक्ती दे मला।**" हे सद्गुरुराया, तुझ्या पदकमली रमून जाणारी अवीट गोडी असलेली, अशी ती अमला भक्ती तेवढी मला द्या. अमला भक्ती शुद्धभक्ती, परमश्रेष्ठ भक्ती आहे. ज्याचे मन, बुद्धी, काया आणि वाचा पूर्ण शुद्ध झालेली असते, जो आनंद, समाधान, प्रसन्नता यांचाच जणू प्रत्यक्ष मूर्तिमंत आकार असतो, स्वत: भगवंताचा/श्रीसद्गुरुंचा दास म्हणवून घेण्यातच ज्याला कृतार्थता वाटत असते, असा भक्त जी भक्ती करतो तीच अमला भक्ती.

"**मुखी अमृताची वाणी। देह देवाचे कारणी।। सर्वांग निर्मळ। चित्त जैसे गंगाजळ।**" असा असून जो भक्तीच करतो ती अमला भक्ती !!! अशा भक्ताच्या ठायी मग विवेक, वैराग्य, ज्ञान अगदी सहजपणाने प्रकट होतात. त्याशिवाय त्याच्या ठिकाणी रसमयता, आनंद हा त्या भक्ताचा उल्लेखनीय विशेष असतो. श्रद्धा, निखळ भक्तिप्रेमभाव त्याच्या ठिकाणी ओसंडून वाहात असतो. तो सदासर्वदा समर्पितच होऊन गेलेला असतो. (देण हेच त्याला ठाऊक असत !!! मग थोडा खाऊ आपल्या लेक, जावई, नातवंडांना दिला तर त्याच काय विशेष ?) ही सर्व लक्षण तर श्रेष्ठ भागवताची सामान्य लक्षण आहेत.

असा भक्तभागवत मग देवाजवळ, श्रीगुरुजवळ अशा अमला भक्तीशिवाय दुसर काय मागणार ना ? नामदेवरायासारखे श्रेष्ठ भक्तराज काय मागतात बघा - "**देई भक्तिरस प्रेमा। देवा घाली आम्हा जन्मा।।**"

असा लडिवाळ हट्ट भक्तच फक्त आपल्या देवाकडे, श्रीसद्गुरुंकडे करू शकतात. भगवंताशी/श्रीगुरुमाऊलीशी अशा भक्ताचे एक अतूट, अत्यंत सुंदर, नितांत रमणीय, परमविशुद्ध आणि ऋजू असेच **नाते** जमून गेलेले असते. भक्तिप्रेम-प्रेमभक्ती यापलिकडे त्याला काही कळत नाही, तो काही पाहात नाही आणि अनुभवीतसुद्धा नाही. याला **'संयोगदीक्षा'** असं भक्तिशास्त्रकार म्हणतात. "**मिळोनी मिळतचि असे। समुद्री गंगाजळ जैसे। मी होवोनी मज तैसे। सर्वस्वे भजती।।**" अशी त्या भक्ताची अवस्था होऊन गेलेली असते. भक्त भगवंताला सर्वार्थाने, सर्वांगाने समर्पित होतो आणि भगवंत तर त्याचा स्वत:हून अंकित होऊन राहातो. अशा त्या भगवंतालाही प्रिय असणाऱ्या **अमलाभक्तीची** प्राप्ती होऊन, तद्द्वारा अमलानंद (म्हणजे परमपवित्र, परमश्रेष्ठ आनंद) आपल्याला प्राप्त व्हावा अशीच मागणी भक्त भगवंताजवळ/श्रीसद्गुरुरायांजवळ करत असतो. समुद्रावर समुद्राची लाट आनंदाने/अत्यानंदाने क्रीडा करते, आकाशात वारा अगदी मुक्तपणे सर्वत्र वाहात असतो, तसेच या भक्ताचे असणे म्हणजे **भगवद् सत्तेतील आनंदक्रीडाच** असते !!!!

परमरसाने, अमृतरसाने रसना ओलावली; मनाची वृत्ती आनंदकंदाच्या चरणी राहिली; या विश्वातील सगळी मांगल्ये एकत्र येतात, आनंदजळाचीच वृष्टी होते, मग अशाने सगळीच्या सगळी, अगदी सगळी-सगळी इंद्रिये ब्रह्मरूप होतात, त्यांना सर्व क्रियाकर्मामध्ये एका स्व-स्वरूपाची (आत्मस्वरूपाचीच) प्रचिती येते; त्याच्याजवळ, प्रत्यक्ष देवच नांदत असतो.

अशी अमलाभक्ती लाभलेला भक्त सहजच स्वरूपज्ञानी असतोच. ज्ञान, कर्मयोग त्याच्या ठिकाणी सहजच नांदू लागतात. तो तत्त्वज्ञ, भक्त आणि जीवनमुक्तही असतो. थोडक्यात सांगायचे तर, तो परमार्थाचे **भूषणच** होऊन

गेलेला असतो. भगवंतानी स्वमुखाने अशा भक्ताचे वर्णन केले आहे. झाडाच्या फांद्या जरी लहानमोठ्या असल्या तरी त्या जशा एकाच झाडाच्या असतात; सूर्यकिरणे अनंत असली तरी ती जशी एकाच सूर्याची असतात तसेच प्राणीमात्र भिन्न भिन्न असले तरी त्यांच्या अंतर्यामी एकच एक परमात्मा भरून राहिलेला असतो.

भक्त हा स्वरूप-ज्ञानी असतोच. रामकृष्ण म्हणत, ‘‘मूल वृद्ध होण्याचे नाकारीत असले तर ती विकृतीच मानावी लागेल ! बीजाचा अंकुर, अंकुराचे रोपटे, रोपट्याचा वृक्ष असा विकासच झाला पाहिजे. तसाच भक्तहृदयाचापण विकास झाला पाहिजे आणि भक्तीने तो **होतोच होतो**. सर्वत्र भरून राहिलेले, विलसत असलेले चैतन्य हे आपल्या उपास्य दैवताचे/श्रीपांडूरंगाचे खरे व्यापक स्वरूप आहे हे त्याला ओळखता येते. सर्व रूपांनी सर्वत्र एक आपला पांडूरंगच नटला आहे असा व्यापक अनुभव त्याचा असतो. ‘‘**जेथे तेथे देखे तुझीच पाऊले। विश्व अवघे कोंदाटले।।**’’

अशा व्यापक अनुभवावर आरुढ झाल्यावर पुन्हा ‘‘**राम कृष्ण हरि**’’ या नामाचा उच्चार, स्मरण, चिंतन नित्य व्हावं हेही मागणे त्याचे भगवंताजवळ असतेच.

* * * *




परमार्थात श्रीसद्‌गुरुची आवश्यकता किती आहे ते उपनिषद्‌कारांपासून ज्ञानेश्वरमहाराज तुकोबारायापर्यंत सर्वांनी एकमुखाने सांगितले आहे. आत्मज्ञान हे अत्यंत गहन असल्यामुळे (राजविद्या राजगुह्य) ते केवळ स्वत:च्या बुद्धी बळावर प्राप्त होणे शक्य नाही. त्यासाठी ज्याने ते करून घेतले आहे अशा आत्मज्ञानी श्रीगुरुची मोठी अत्यावश्यकता आहे. कठोपनिषदात असे अगदी सुस्पष्ट व ठामपणे म्हटले आहे. पारमार्थिक अज्ञानाची काळोखी रात्र श्रीगुरुकृपेच्या सूर्योदयावाचून उजळत नाही.

श्रीगुरु हा सत्‌शिष्याने, साधकाने परिश्रमपूर्वक केलेली साधनबाग फुलवणारा उपायनवसंत आहे. एका मूळसिंचनाने लता-वेली वृक्षांच्या शाखापल्लवांना टवटवी यावी त्याप्रमाणेच एक गुरुभक्तीने-गुरुसेवेने (म्हणजे गुरुपदिष्टीत साधनाने) साधक 'पूर्णकाम', कृतकार्य होतो; असा खुद्द श्रीगुरुज्ञानेश्वर माऊलीचा निर्वाळा आहे. गुरुकृपा ही आत्मानंदाच्या भांडारगृहाची एक किल्लीच आहे. प्लेटोसारख्या पाश्चात्य तत्त्वज्ञानेही "गुरुमुखातून लाभणारे जिवंत ज्ञान व पुस्तकातील निर्जीव ज्ञान यांची तुलनाच होऊ शकत नाही" असे म्हणून श्रीगुरुची आवश्यकता प्रतिपादिली आहे.

सद्‌गुरु शिष्यासाठी काय करतात ? दूरध्वनीच्या उपमेने हे छान स्पष्ट करून सांगता येईल. आपल्याला दूरवर कोणाशी बोलावयाचे असेल तर आपण क्रमांक फिरवतो आणि एक्सचेंजच्याद्वारा तो क्रमांक जोडला जातो. हेच कार्य श्रीसद्‌गुरु करतात. ते देव व भक्त यांची गाठ घालून देतात.

विजेच्या पॉवर हाऊसची उपमा देऊन असे म्हणता येईल की, श्रीसद्गुरु म्हणजेच साक्षात्कारी संत. हे विजेच्या मुख्य तारांप्रमाणे असून आपण सर्वजण त्या तारांच्या उपशाखांना लावलेल्या विजेच्या दिव्यांप्रमाणे आहोत. मुख्य तारांतून विद्युतप्रवाह आला की सर्व दिवे एकदम प्रकाशतात. त्याचप्रमाणे साक्षात्कारी संतांच्या-श्रीगुरुंच्या अंत:करणात भरून राहिलेला भगवंताच्या चित्प्रकाशाचा झोत त्यांच्याशी संबंद्ध झालेल्या त्या साधकाच्या-शिष्याच्या अंत:करणात चित्प्रकाश उत्पन्न करतो.

जेथे देव जागा झाला आहे, त्याच्याशी संलग्नता साधली की देव अगदी हमखास सापडतोच. यासाठी, नादाच्या निनादाचा (Resonance) दृष्टांतही चांगलाच लागू पडतो. सतारीची (सूरांत लावलेली) एक तार छेडली तर दुसऱ्या बाकीच्या तारा न छेडता आपोआप वाजू लागतात...... त्याचप्रमाणे आत्मानंदाचा दिव्य झणत्कार ज्यांच्या ठिकाणी झणाणत असतो, त्यांच्या संगतीने तो त्याच्या सत्‌शिष्यालाही प्राप्त होतो.

''**अंतरी गेलिया अमृत। अवघी काया लखलखित।**'' या नात्याने ज्याच्या अंतरी स्वरूपस्थिती बाणली असा साक्षात्कारी सहजच गुरुत्वाला पोहोचतो. अगदी सोप सांगतो, ज्याच्याकडे पाहिले असता भगवंताकडे पाहिल्याचे समाधान मिळते तो संत/श्रीगुरु. हे श्रीगुरु आपल्या शिष्याला त्याच्या ठिकाणीच गुप्तरूपात असलेल्या **स्वात्मानंदाची स्वानुभवाच्या** पातळीवर ओळख करून देतात.

श्रीगुरु स्वत: भगवंतनामाचा प्याला भरभरून आपण तर पितातच व आपल्या सत्‌शिष्यालाही पाजतात. ''**सेवितो हा रस वाटतो आणिका।**'' अस तुकोबाराय पण म्हणतात. नामस्मरणांत भाव फार महत्त्वाचा. भगवंताला पण हा अंत:करणातील भाव फार-फार प्रिय आणि हा भाव निर्माण होण्याचे

साधन म्हणजे नामस्मरण. "**सार, सार, सार नाम। विठोबा नाम तुझे सार**"

असे नाम श्रेष्ठ का ? तर हे नाम भगवंताच्या रूपाचा **आनंदाचा** अनुभव आणून देते. नाम हे तेल असून त्यात मनाची वात चांगली भिजवली असता भगवंताच्या रूपाची ज्योत श्रीगुरुकृपारूपी काडीने पेटते. नाम हे सगुण व निर्गुण या भगवंताच्या दोही स्वरूपाचे साक्षी असून **स्वानंदाचा** प्रकाश नामधारकाच्या जीवनात पसरवणारी दिव्य स्वयंभू ज्योतच आहे. अशा नामालाच (म्हणजेच) श्रीगुरुंकडून मिळालेल्या नामाला दिव्यनाम अगर सबीजनाम असे म्हणतात. अशा सबीज नामाचे रुपांतर पारमार्थिक अनुभवाच्या वृक्षात होते.

श्रीगुरु नाम-बीज देतात. पोती भरून खाण्यासाठी फुकट दाणे देत नाहीत. ते बीज नाम साधनेच्या शेतात पेरून, राबून, मशागत निगराणी करून स्वतःच पिकवावे लागते. असे दिव्य नाम पूर्वजन्मीचे सुकृत असल्याशिवाय थोडेच मिळते ?

* * * *




भक्ति ही परमप्रेमस्वरूप आहे. आपल्या इष्ट देवतेच्या (अत्यंत आवडणारे भगवंताचे स्वरूप) ठिकाणी नितांत प्रेमभाव असणे अशा स्वरूप लक्षणाची ही/ती शुद्ध भक्ती आहे.

निराकार तत्त्वापेक्षा सगुणभक्ती कमी कष्टाची आहे आणि राम किंवा कृष्ण या विभूतीरूपांची उपासना संसिद्ध करणे हे तर सर्वाधिक सुलभ आहे. आपल्या गूढ मायेचा अगिकार करून मानवरूपातील नानाविध अवस्था/रूपांनी नटलेला श्रीकृष्ण हा खरोखरी, अखिल जीवमात्रात **आत्मतत्त्व** या संज्ञेने वास करणारा सर्वांतर्यामी परमात्माच आहे.

हा श्रीकृष्ण आपल्या अगदी जवळचा आहे. एखादी विभूती जवळची असेल तर ही/हा आणि दूरची असेल तर ती/तो या शब्दांनी आपण संबोधत असतो.

भक्तिसूत्रकार नारद भगवंताचं आणि आपलं सामीप्य बोटाने दाखवीत आहेत. श्रीकृष्णाच स्थान अगदी जवळ-जवळ आहे. ते स्थान म्हणजे आपल हृदयच. भगवंत जरी अणूरेणूत सर्वत्र भरलेला असला तरी त्यास आळविता व ओळखता, पाहाता येईल असे स्थान म्हणजे स्वहृदयच आणि म्हणूनच हृदयस्थ भगवंताचे/श्रीगुरुंचे सतत स्मरण, ध्यान करावे, त्यावर परमप्रेम करावे, आपल्या समग्र जीवनाचा प्रवाह तेथेच केंद्रित करावा.

परम म्हणजे मोठा, श्रेष्ठ, वरिष्ठ. जो दिशा, काल यांच्या मर्यादांपेक्षा, अखिल विश्वापेक्षा मोठा आहे, तोच सर्वश्रेष्ठ होय. असा सर्वश्रेष्ठ, अनंत,

अविनाशी, स्वयंभू **उत्तम-परम-पुरुष** म्हणजे एक मात्र भगवंतच/श्रीगुरु. त्याची परमप्रेमलक्षणा भक्ती करावी व त्या शुद्ध, परमपवित्र भक्तीप्रेमाने त्या प्रभूला आपलासा करावा. "**भाव धरारे। आपुलासा देव करारे।।**"

ही भक्ती परमप्रेमस्वरूपा आहे. **भगवंताबद्दल/श्रीगुरुबद्दल** वाटणारी अनिवार्य, अतूट ओढ म्हणजेच भक्तीप्रेम. या तीव्र ओढीमुळे भक्त एका भगवंताचेच चिंतन करीत असते. या भक्तिप्रेमांत लाभ, हेतू काही-काहीच नसते. असते ते फक्त आणि फक्त भक्तिप्रेम. त्यास (भक्तिप्रेमास) कसली मर्यादा नाही, ते कितीही केले तरी अत्यल्पच वाटते व आणखी-आणखी करावेसेच वाटते. धनाच्या लोभाने कृपण जसा अधिकाधिक द्रव्य कसे मिळेल यासाठी तत्पर असतो तसा भगवत्प्रेमाचा लोभी भक्त जास्तीत जास्त प्रेमभक्तीच करत असतो. "**लाभाचिया सोसे पुढें धावे मन। धनाचा कृपण लोभी जैसा।।**" तृप्तीलाच भूक लागावी, पाण्यालाच तहान लागावी, तसा भक्ताला भक्तीप्रेमाचा सोस असतो !!! या अहैतुक, निरपेक्ष भगवत्प्रेमासच परमप्रेमभक्ती अस म्हणतात.

रूप म्हणताच रूप, आकार, गंध, घनता असे त्या त्या वस्तूचे गुणधर्म डोळ्यापुढे तरळतात. पण भक्तीची व्याख्या करताना रूप शब्द अगदी वेगळ्या अर्थाने योजला आहे. रूप म्हणजे **स्वरूप** म्हणजेच वस्तूच्या ठिकाणी असणारा, मूलत: असणारा **स्वभावधर्म**. भगवंताबद्दल/श्रीगुरुबद्दल वाटणारे अक्षय, अकृत्रिम प्रेम हाच जिचा स्वभावधर्म आहे तीलाच म्हणावे भक्ती !!! एकदा का असे भक्तीप्रेम जागृत झाले की मग अन्य काहीही रुचेनासे होते !!!

हे भक्तीप्रेम **निर्मळ आनंदाच्या** पोटी उपजते, वाढते. भक्त हा अशा निष्काम-उत्कट, निरतिशय प्रेमभक्तीने **परमप्रेमस्वरूप** भगवंताचा,

**आनंदघनाचाच** एक अतूट-अव्यंग भाग झालेला असतो. अशा परमप्रेमस्वरूप भक्तीने भगवंत हा भक्ताचा दास होतो.

म्हणजे एकंदरीत भक्ती म्हणजे स्वयंस्फूर्तीने प्रकटणारी, भगवंतावरील/श्रीगुरुंवरील परमप्रेमयुक्त जीवननिष्ठा म्हणजेच भक्ती. ही प्रक्रिया कधीच संपत नसते.

* * * *

# चिंतन १००

ब्रह्मसाम्राज्यदीपीका (ज्ञानेश्वरी) वाङ्‌यज्ञ श्रीगुरु ज्ञानराजमाऊलीच्या कृपेने संपन्न झाला. कुठेतरी जाण्यापेक्षा तुकोबाराया म्हणतात, **''जाशील तरी जाई संतांचिया गावा''** का तर **''होईल विसावा मना तेथे''**

गाता गळा, शिंपता मळा, तस लिहिता-लिहिता हात, साहित्य, एकदम थोडच येत ? लिहिता लिहिता जमत. छान रचना होते. जपून-सांभाळून ठेवण्यासारखी. सरावान छान जमत नाही का ? म्हणूनच समर्थांनीसुद्धा एवढं आग्रहपूर्वक सांगितले, **''दिसामाजी कांही तरी तें लिहावे.''**

माघ शु।। १० श्रीतुकोबारायांच्या अनुग्रहाचा पुण्यपर्वकाळाचा दिवस. त्यानिमित्त श्रीतुकोबांच्या गाथेचे (वै. गु. मामा म्हणावयाचे गाथा नव्हे तर तुकोपनिषद्) पारायण सुरू आहे.

निर्व्याज, निरंजन, दिव्य अशी भक्ती कशी प्राप्त करावयाची ? तर भक्ती म्हणजे खरोखरी अगदी नवीन, वेगळे असे काहीच करावयाचे नाही !!! फक्त आपल्या अंत:करणाचे सर्व-भाव आणि विचार हे एका भगवंताकडे वळवावयाचे. अस सर्वभावांनी, सर्वस्वी त्याच्याशी लगटून त्याचेच होऊन राहणे हीच मंगलभक्ती.

अशी ही भक्ती परमप्रेमस्वरूप तर आहेच पण अमृतस्वरूपाचीसुद्धा आहे. भक्ताचार्यांनी भक्तीला उद्देशून **''रूप''** आणि **''स्वरूप''** असे म्हटले आहे. या दोन शब्दात काही फरक आहे ? का एकाच अर्थाचे ? सामान्य व्यवहारांत हे दोन्ही शब्द एकार्थानेच वापरले जातात; पण भक्ति हे

शास्त्र आहे. ''रूप'' म्हणजे वस्तूचा रंग, आकार, उंची, जाडी, भारमान, काठिण्य आदी बाह्य गुणांचा बोध होतो. तर त्या वस्तूच्या अंगभूत स्थायीभावाचे लक्षण ''स्वरूप'' या पदाने सुस्पष्ट होत असते. साधक भक्तिसाधना करू लागला की त्याच्या आचार, विचार व उपासनेचे दर्शन दूसरेजनांस/सर्वांना जाणवते पण या परमप्रेमलक्षणाभक्तीची सुधा (अमृत) जो प्रत्यक्ष भक्त चाखत असतो त्यालाच त्याची अवीट गोडी कळते; इतरेजनांना नाही. पराभक्ती हे अमृत आहे आणि ही भक्ती साध्य/प्राप्त करून घेतलेला भक्त हा अमृतमयच नाही तर अमृतस्वरूप होतो.

अमृत म्हणजे काय ? जे मृत, नष्ट होत नाही ते अमृत. आत्मा/परमात्मा हाच एकमेव अमृत, अविनाशी आहे. म्हणून अशा भगवंताची परमप्रेमस्वरूपा भक्ती करणारा हा परमात्मस्वरूप/अमृतस्वरूप होतो.

अमृत म्हणजे मोक्ष. आपल्या समग्र भावभावना, विचार व क्रिया व्यवहार यांचे शुद्धीकरण, उदात्तीकरण आणि अध्यात्मीकरण करीत करीत साधकाला अपूर्णतेतून परिपूर्ण परमात्म्याकडे सुखरूपपणे घेऊन जाणारी प्रभावी शक्ती म्हणजे ही निष्काम एकप्रवाही **परमप्रेमस्वरूपा अमृत** भक्ती होय.

खर सांगावयाच तर अमृत म्हणजे **अनुभवगम्य आनंदरस** आहे !!! मात्र हा केवळ भौतिक द्रवपदार्थ, रसायन नाही. तसेच सागर मंथनातून काढलेले (देव-दैत्यांनी) अमृतपण नाही; रस हा केवळ उपमेय भाव आहे. **रस** म्हणजे ब्रह्मरस, तथा भगवंताच्या **परमानंदाचे** अनुभवगम्य रसायन. भगवंत वस्तुतः रसमय आहे. भक्ताला या **अमृतरसपानाचे** भाग्य लाभते. मग तो सर्वभैव **आनंदातच** राहातो. नाही-नाही **आनंदच** होतो आणि म्हणून द्रवीभूत ब्रह्मज्ञान, ब्रह्मरस म्हणजेच दुसरे तिसरे काही नसून **परमप्रेमस्वरूप** भक्तिच.

या पराभक्तीच्या अमृतपानाने मत्त होऊन हरिनाम गात भक्त विश्वसंचार करतात आणि आपला स्वानुभावच जगाला सांगतात. नुसता सांगतात एवढच नाही तर "**सेवितो हा रस वाटितो आणिका**" असा अवघ्या विश्वाला पाजतात.

भगवंत इतका रसमय "**रसो वै स:**" की त्याच्यामुळे साहित्यातील, स्वयंपाकातील सर्व रसांना रसत्व लाभते. **तो रसराज** आहे. मग त्याचे रूप, त्याचे नाम, त्याच्या लीला, त्याचे चरित्र केवढे रसाळ. नाम तर अमृताहूनी गोड. त्या नामाच्यातून गळणारा रस अखंड सेवन करावयाचा. **अमृतपान** करायचं, एवढच भक्ताच काम.

* * * *

# चिंतन १०१

भक्तिमार्गाचे तत्त्व-वर्म-रहस्य **प्रेमभाव** हे आहे आणि प्रेमासाठी दोन लागतात; भक्तिप्रेम करणारा व भक्तिप्रेम ज्याचेवर करायचे. अर्थात् प्रेमभाव हा दिसावयास द्वैतात्मक आहे आणि उच्चतम आध्यात्मिक अनुभूती ही तर अद्वैताची अनुभूती असते. भक्ती व्यक्तीरूप ईश्वरासाठी साधना करीत असते आणि भगवंत-ईश्वर हे उच्चतम शाश्वत सत्य आहे.

पूजा भक्तिमार्गातील पहिले वहिले पाऊल आहे. बाह्य उपचारिक पूजा जेव्हा आंतरिक पूजेचे स्वरूप घेते तेव्हाच खरी भक्ती सुरू होते. अशी खरी भक्ती खोल-खोल होत होत, तीव्र भगवद्भक्तीच्या रूपास येते. अशी ही तीव्र भक्ती, भगवंताशी असलेले/श्रीगुरुंशी असलेले आपले नाते अगदी निकटचे, **आनंदमय** असे करते आणि हे आनंदमय नाते, निकटचे नाते, वाढत-वाढत ऐक्याचे नाते बनते, निकटतेचा हा आनंद **ऐक्याच्या** आनंदात परिणत होतो. उच्चतम एकता, ज्ञानाप्रमाणे, इतकेच काय तर ज्ञानापेक्षाही भक्तीने निर्माण होते.

भक्ति-प्रेम या एकतेला मोठ्यात मोठी खोली व तीव्रता प्राप्त करून देते. हे तितकेच खरे की भक्तिप्रेम एकतेच्या पोटातून द्वैत आणण्यास उत्सुक असते. उदाहरणार्थ **''मी भक्त, तू देव ऐसे करी।।''** असं आपले श्रीतुकोबाराया भगवंताला प्रार्थित करतात; पण हे कल्पित द्वैत ह्या एकतेला, अद्वैतभक्तिला अधिकाधिक गोडी आणणारे !!! जास्तच गोडी येते मूलभूत अद्वैत स्थितीला अशा कल्पित द्वैताने; कल्पित-द्वैतातून होणाऱ्या भक्तिने.

अभेदभक्तिला सर्वांगाने ऐश्वर्यसंपन्न करणारा असा हा कल्पितभेद कल्पिण्यात भक्तिशील हृदय हे ज्ञानमार्गीय विचारापेक्षा अधिक उन्नत असते!!!

भगवंत हा काही ऐकांतिक एकटेपणाने बांधलेला नाही. मग त्याची एकता कशी आहे ? तर त्याची एकता, सतत स्वत:ला **अनंत विविधतेच्या** द्वारा अभिव्यक्त करत असते. या अनंत विविध स्वरूपाच्या आनंदाची मास्टर किल्ली म्हणजे **भक्तिप्रेम** आणि हा आनंद अनुभवत असताना एकत्वाच्या अद्वैताच्या, एकरूपतेच्या आनंदाला अजिबात धक्का लागत नाही. असा अनेकत्त्वाचा-अनेकत्त्वातील एकच एक असणारा आनंद अनुभवण्यासाठी भक्तिप्रेमाला एकतेचा आनंद गमवावा लागत नाही.

गीता आपल्याला सांगत आहे की, भक्तिमार्गाने, ह्या आनंद-पुरुषोत्तमाशी आपल्याला एकता प्राप्त करून घेता येते. प्रथम त्याचे ज्ञान, मग त्याचे दर्शन-भेट आणि शेवट त्या सच्चिदानंदाच्या स्वरूपात प्रवेश घेऊन आनंदच होऊन राहाणे. भगवंताच्या/श्रीगुरुंच्या पोटात निर्व्यक्तिक, निर्गुण-निराकार तत्त्व जसे आहे, तसे सगुण-साकार-अनंत-गुणव्यक्तितपण आहे. शुद्ध सत्ता, जाणीव, आनंद जसा आहे; जशी या सगळ्यांच्याच भक्तिप्रेमसंबंधाची अनंत लीला पण आहे.

गीतेने आपल्याला आर्त, जिज्ञासू; अर्थार्थी ह्या तीन्हीपेक्षा चौथी ज्ञानी भक्ती सांगितली. तिला म्हणजे ज्ञानीभक्तिला सर्वश्रेष्ठत्व मानले. बघा ना भक्त म्हणतो, "**मला कळत नाही; मला ज्ञान नाही; मी आपला भक्तिप्रेम करतो.**" अस जरी भक्त म्हणत असला तरीसुद्धा **भक्तिविषयात** राहणे म्हणजेच समर्थांच्या भाषेत शुद्ध जाणिवेत त्याच्याशी एकरुप होण होय आणि अशा जाणिवेची एकरुपता हीच ज्ञानाची पूर्णता आहे आणि म्हणूनच

भक्ती ही ज्ञानाच्या मस्तकावरील किरीटासारखी ज्ञानाला शोभिवंत-अलंकृत करणारी आहे. भगवंताचे ज्ञान भगवद्भक्तिच पक्के करते. आपला अतिव्यापक अनुभवाचा आनंद भक्तीला खुला करून देते. आपल्या उच्चतम दर्शनशिखरावर भक्तीला नेऊन बसवते.

परिपूर्णता पावलेली व्यापक भक्ती हृदयाच्या अंतर्गृहातील **आनंद** आणि विश्व यांचा विरोध मानत नाही; जग हे आपल्या प्रियतम **चिदानंदाचे**- भगवंताचे श्रीगुरुंचे धाम आहे; अवघे विश्व भगवंताचेच अस्तित्व व ते विविधरुपांनी अस्तित्व आहे असेच अनुभवते. याच हृदयगाभाऱ्यात **'रामकृष्णहरि'** स्फुरत असतो. त्याचे अनुसंधान राखावे.

कर्ममार्ग, योगमार्ग, ज्ञानमार्ग याचा मुकुट भक्तिच आहे. ज्ञानवृक्षाचा पुष्प-फल संभार भक्तिच, वृक्षाचा मोहोर भक्ती आहे. कर्म-ज्ञान-योग हे जेथे एकवटतात, यांचा जिथे सुंदर त्रिवेणी संगम होतो; त्या संगमावर भक्तिमंदिर आहे; अशा भक्तिमंदिरस्वरूप हृदयाच्या गाभाऱ्यात **आनंदकंद** लीलाविग्रही उभा आहे.

* * * *

# चिंतन १०२

देवकार्य, धर्मकार्य, अगर समाजकार्य यात ''मम'' म्हणणाऱ्यांचा वाटा मोठा असतो; पण ''मम''च्या जागी ''इदं न मम'' अशा भूमिकेवर येण हे फार मोठ सौभाग्य, महद्भाग्य !!! ते भाग्य श्रीगुरुज्ञानोबारायांनी अण्णाला दिल आहे.

परमपूज्य गुरुदेवांनी Dichotomising चा अध्यात्मातील अत्यंत महत्त्वाचा सिद्धांत अनुभवातून आपल्या साहित्यात जागोजागी मांडला आहे. म्हणजे एक आत्मारामच स्वत: आपल्याला आपल्यातच विभागून आपल्यालाच पाहातो, अनुभवतो, भक्तिप्रेमाचा आनंद अनुभवतो. आत माया धरून बसलेला आत्माच बाहेर येऊन परमात्मस्वरूपाने नटतो, दर्शन देतो. असा हा **आत्मा–भगवंतच** मग रूप, रस, गंध, नाद, स्पर्श (पण अगदी अतिंद्रिय) अनुभवाने साधका/भक्तासमोर आविष्कृत होतो. देह, मन व बुद्धीसुद्धा **जड** असल्याने त्यांना आत्मदर्शनाची शक्ती नाही तर हे दर्शन होण्यासाठी **प्रज्ञा** लागते. तो प्रज्ञेचा अधिकार/सन्मान आहे.

प्रज्ञा अशी परिणत होण्यासाठी साक्षात्कारी संतांच्याकडून नाममंत्राची/सबीजनामाची/बीजाक्षराच्या अनुग्रहाची मोठीच आवश्यकता असते. जो आपल्यातीलच आत्मारामाचे गुप्तरूप दाखवितो तोच श्रीगुरु.

असा अनुग्रह लाभला !!! साधकाने, सत्शिष्याने सबीजनामाचा स्वीकार केला, एवढ्याने संपत नाही, तर सुरवात होते !!! साधकाने श्रीसद्गुरुवचनावर अविचल श्रद्धा ठेवावी. नेमाचे निष्ठापूर्वक पालन, संकल्प–विकल्प एवढच

काय ध्यान विरहित होण्यासाठी सतत स्वत:चे स्वत:च आत्मनिरीक्षण व आत्मपरिक्षण करीत राहिले पाहिजे. श्रीमद्‌भगवद्‌गीता हेच सांगते ना "उद्धरेत् आत्मना आत्मानम्।" त्यासाठी कथनी, करनी व रहनी यात एकवाक्यता फार-फार मोलाची, ह्या त्रयींनी अवघ जीवन व्यापल पाहिजे.

यासाठी साधकाने, संसाराकडे विश्वस्त अगर साक्षी या नात्याने पहावे, म्हणजे मग संसाराचाच परमार्थ होतो. "दु:खात सुख पाहावे", संसार दु:खमय आहे, तो मायाभ्रम आहे, तो मुळात खोटा, नाशवंत आहे, हे मनात दृढ धरून मग संसार करावा म्हणजे तो बाधक नाही तर साधकच होतो. लाभ-तोटा, सुख-दु:ख, यश-अपयश याकडे साक्षित्वाने पाहावे व निष्ठेने परमार्थ आचरावा. त्यातल वर्म आहे, मी देह नव्हे तर आनंदघन आत्माराम आहे. याची सतत आठवण असावी. "जीवभावाचा शिवभाव करावा". त्यासाठी काय करावे लागते ? सदा नामस्मरण करावे, "देवा बरे झाले" असे अनुभवावे, खरे खरे सुख मिळते, खरी खरी शांती लाभते.

ज्ञान म्हणजे उपनिषदे, भगवद्‌गीता, ब्रह्मसूत्र, अकारादी/प्रकरणादी ग्रंथ, भाष्य, टीका, वार्तिके, दर्शने, पुराणग्रंथ, संतसाहित्य यांचे शाब्दिक ज्ञान नव्हे बर !!! या शब्दज्ञानाला मग काहीच मूल्य नाही का ? तर आहे. या शाब्दिक ज्ञानाने काय होईल ? तर या शब्दज्ञानावर **विश्वास** असल्यास भगवंताच्या केवळ अस्तित्वाची खात्री होईल. फार फार तर साक्षात्काराच्या महाद्वारापर्यंत जाता येईल. पण आत्मसाक्षात्काराच्या गाभाऱ्यात प्रवेश होणार नाही. म्हणून शब्दज्ञान हे ज्ञानच नव्हे, का तर "**ज्ञान**" ही एक परमविकसीत अवस्था आहे. **प्रत्यक्षानुभूती** आहे. भगवंत बोलण्याची गोष्टच नाही तर तो **प्रज्ञेने** अनुभवायचा आहे.

जी गोष्ट ज्ञानाची तीच भक्तीची. भक्ती **निष्काम** असावी. एकनिष्ठ-

अव्यभिचारी असावी. ही शुद्ध भक्तीची ठळक लक्षणे आहेत. अशा शुद्ध भक्तीची परिणती आत्मसाक्षात्कारांत (आवडीप्रमाणे सगुण किंवा निर्गुण अशा दोन्ही स्वरूपात, (पण प्रेमळभक्ताला सगुणाचेच प्रेम, निर्गुणाचे **ज्ञान** त्याला असतेच, पण सगुणाचे विलक्षण प्रेम असते) दर्शन, स्पर्शन, संभाषणादी अनुभूतीत होते. भक्ती ही परमप्रेमस्वरूप आहे. ती स्वयंफलरूप आहे. म्हणून ती **ज्ञानस्वरूपही** आहे.

मग आपण काय कराव ? तर नामसाधना/नामस्मरण दीर्घकाळ, निरंतर व सत्कारयुक्त करीत राहावे. याने काय साधते तर हळूहळू **जीवभावाचा** क्षय होतो (म्हणजे कमी होतो) व कमी होता होता त्याचाच मग **शिवभाव** होतो. देहबुद्धीची आत्मबुद्धी होते.

या नामस्मरणात निष्ठेबरोबर, आर्जवाची मोठीच गरज आहे. आई लेकराला जेवायला घालताना किती आर्जव करते, **तसेच** नाम घ्यावे. अशा नामस्मरणाने भगवंत खुणा दाखवत असतो. त्या खुणा आपण ओळखाव्यात. तुकोबारायांच्या शब्दात सांगायचे तर "**ओळखा रे वस्तू उघडा ज्ञान–दृष्टि ।।**" आपण डोळे उघडे ठेवावेत, तो दाखवतो त्या खुणा ओळखाव्यात, खूण ओळखून नाम घेत राहावे आणि या आनंदखुणा प्रज्ञेलाच प्रज्ञेच्या ठिकाणी प्रज्ञेच्याद्वाराच कळतात नाही का ? !!! माघ शुक्ल।। १० श्री तुकोबारायांचा अनुग्रहाचा पर्वदिन/तिथी. त्यानिमित्त चिंतनातून वरील शब्द आकाराला आलेत.

* * * *

# चिंतन १०३

भगवंताचा साक्षात्कार नित्यनवा आहे, First hand आहे, सेकंड हँड नाही. सर्वसामान्यत: सेकंड हँड देवच लोकांना माहीत आहे, असतो. दुसऱ्यांच्या अनुभवावरून आपण देवाची कल्पना करत असतो. ''उपनिषदांत'' असे सांगितले आहे, ''गीतेत तसे सांगितले आहे''. हेच सर्वसामान्यपणे बोलतात, बोलले जाते. अर्जुनाने विश्वरूपाचे वर्णन केले. स्वत: अनुभवलेल्या विश्वरूपाचे त्याने वर्णन केले. त्याला आलेला अनुभव हा सर्वतोपरी First hand, नित्यनवा होता. यशोदेला आलेला विश्वरूपाचा अनुभवपण नित्यनवाच होता. आपला देवाचा नित्यनवा अनुभव सर्व संतांनी लिहून ठेवला त्यांचे नुसते लिखाण वाचल्याने, त्याला केवळ शब्दार्थाने आपल्याला जो आनंद होतो तो जर अमर्याद, अलौकिक अगदी आगळा, वेगळा असतो तर प्रत्यक्ष भगवंताचा अनुभव किती श्रेष्ठ. नाही का ?

देवच देवाला पाहू शकतो. आत्मारामालाच आत्मारामाचे दर्शन होते. जनक राजाच्या दरबारात पंडितांची चर्चा चालू होती. त्या चर्चेत याज्ञवल्क्यांनी तेथे जमलेल्या सर्वच्या सर्व पंडितांना हरवले. शेवटी जनक राजाशी त्यांचा वाद सुरू झाला. ''कुंभकारांनी केलेल्या मडक्याला, कुंभाराचे ज्ञान होते का?'' असा प्रश्न जनकांनी विचारला. प्रश्न अतिमहत्त्वाचा आहे. जो परमार्थप्रेमी आहे, परमार्थ पाहण्याची ज्यांना तीव्र तळमळ आहे. त्यांच्या पुढे हा प्रश्न आलाच पाहिजे.'' होय कुंभाराला जाणण्याची शक्ती घटाला आहे. (कुंभार म्हणजे परमात्मा व घट म्हणजे जीव) या आपल्या देहातच

असणाऱ्या आत्म्यालाच परमात्मा जाणण्याची शक्ती, युक्ती, बुद्धी आहे. ''ती किमया आत्मस्वरूपाशिवाय इतर कोणालाच नाही.'' असे याज्ञवल्क्यांनी जनकराजास मोठे छान, खरे-खरे, अचूक उत्तर दिले.

आत्मारामाच्या या क्रियेला Dichotomy हा शब्द तत्त्ववेक्त्यांनी वापरला आहे. (म्हणजे एकाचे दोन होणे). एकाचे असे दोन होण्याचे सामर्थ्य फक्त एका आत्मारामालाच आहे. आता एकाचे दोन होतात म्हणजे ''आत्मा निम्मा-निम्मा झाला'' असे वाटण्याचीच शक्यता जास्त, नाही का ? पण तसे नाही !!! **डॉयकॉटमि** म्हणजे पाहणारा व दिसणारा दोघे एकच एक असतात. **म्हणूनच स्वप्नातूनपण अद्वैताचा अनुभव येतो**. एकाचे दोन होणे म्हणजे आरशात आपण आपल्याला पाहिल्यासारखे नव्हे. आरशातील प्रतिबिंब विकृत असते (उजव्याचे डावे, तर डाव्याचे उजवे) जशाचे तसेच दिसण्याचे सामर्थ्य फक्त एका आत्मारामालाच आहे. हे स्व-स्वरूपाचे ज्ञान कुणाला होते? आत्म्याचा अनुभव केवळ आत्मारामालाच.

हा आत्मसाक्षात्कार मग कोणाला ? देहाला की आत्मदेवाला ? ''मी देव पाहिला'' आपण सहज बोलून जातो. त्यांनी देव पाहिला, असेही आपण सहज बोलतो.

असो. हा देह जड आहे तर आत्मा अत्यंत सूक्ष्म आहे !!! किती सूक्ष्म आहे ? तर शब्दांनीच सांगायच झाल तर एका खसखशीच्या दाण्याचे १००० भाग करावेत व त्यातील १/१००० भागाची विभागणी पुन: १००० भागात करावी (त्याला 'रेणू'' म्हणतात). आत्मा त्याच्यापेक्षाही सूक्ष्मीतीसूक्ष्म आहे. अशा सूक्ष्मतम आत्मारामाचे ज्ञान या जड देहाला कसे होणार ना ??? जडाला सूक्ष्माचे ज्ञान होणे कधीच शक्य नाही. जडाने जडाला जडमाध्यमातून जडाचेच ज्ञान होते. सूक्ष्म कळणार नाही.

पण या जड देहात एक चैतन्य आहे, एक शक्ती आहे, एक आनंद आहे, त्याला तुम्ही काहीही नाव द्या. मग यालाच आत्मा अस शास्त्रकार म्हणतात. सारांश काय तर जड इंद्रियांना देव कळत नाही, मग मनाला कळतो का ? तर मनाचा डोळा पण देव पाहू शकत नाही. मन पण जडच आहे, तर आत्मचक्षूच आत्मारामाला/देवाला जाणू शकतात, पाहू शकतात.

मनाच काय, बुद्धीला देवाच ज्ञान होऊ शकत का ? तर नाही. बुद्धीला गुरुदेव "Lower intellect" खालच्या पातळीची बुद्धी म्हणत असत. या बुद्धिला फक्त देवाचे अस्तित्व कळते. तेवढाच या बुद्धीचा उपयोग. म्हणून आपल्या बुद्धीने देवाच्या महामंदिराच्या दरवाजापर्यंत जाता येते म्हणून मनाने, बुद्धीने कळणार नाही, वाचेने सांगता येणार नाही.

मग इंद्रियांना दिसत नाही, बुद्धीला कळत नाही, मनाला कल्पना/**आकलन** करता येत नाही, असा देव मग आहे तरी कशावरून ? देव हे काय गौडबंगाल/म्हणजे किमया/जादूगरी आहे ?

तर **देवाचा साक्षात्कार** हे **"Intuitive apprehension"** आहे. ते **प्रतिभा दर्शन** आहे. इंद्रियजन्य, बुद्धिगम्य अगर मानसिक नाही तर **प्रज्ञादर्शन** आहे. याला लागणारी **प्रज्ञा** म्हणजे **प्रतिभा शक्ती** त्याला आत्मदृष्टी/आत्मशक्ती अस पण म्हणतात. गुरूदेव त्यालाच Intution अस म्हणत.

मग नामाचा काय उपयोग ? नामाने काय होते ?

तर नामाने देवाला जाणण्याची ही आपल्यातीलच सुप्त/निद्रित असणारी शक्ती नामस्मरणाने जागृत होते. याच शक्तिला योगशास्त्रांत **कुंडलिनी** म्हणतात. भक्तिशास्त्रात **प्रेमभाव** म्हणतात तर माधुर्यभावात याच शक्तिला **राधा** असे म्हणतात.

* * * *

# चिंतन १०४

शुद्ध-पवित्र अशा भक्तिमार्गाचा अर्थ अगदी साधा सोपा आणि सरळ आहे, भक्ती अमृतस्वरूप म्हणजे उज्ज्वल अशी हरिभक्ती !!! अंत:करणाने उपास्याशी/भगवंताशी/श्रीगुरुंशी एकरूप होऊन जर भक्ती झाली तर हे दिव्य अमृत प्राप्त होते आणि भक्तिपदतीर्थांमृत भक्ताचे भक्तजीवन सुशांत व सुमंगल करते.

एकदा भगवद्प्राप्ती हे साध्य ठरविल्यावर, साधनकालात भक्त निष्ठेने, **नेमाने** अनेकविध भक्ति-उपाय अवलंबितो. या अमृतस्वरूप रसमय भक्तिमार्गाचे वैशिष्ट्य म्हणजे अंतिम ध्येय साधल्यावरही भक्त भक्ती करणे बंद करीत नाही; तर उलट अधिकाधिक प्रेमाने, उत्साहाने, आनंदाने, अविरत, अविश्राम, अखंड भक्तीच करत राहातो.

मात्र साधना भक्ती व सिद्धभक्ती यात महदंतर आहे. मग असा सिद्धभक्त भगवंतावाचून अन्य दुसरे काहीच बोलत नाही; चिंतीतच नाही, पहात नाही व जाणत नाही; कारण त्याला आत व बाहेर एकच सर्वत्र, सर्वव्यापी, सर्वेसर्वा, सर्वज्ञ विश्वेश्वराचीच प्रचिती येत असते. "**आंत हरि बाहेर हरि। हरीने घरीं व्यापिले।। बाहेरि-भितरी तुजच मी देखे**" असा त्याचा अनुभव असतो. "**हरिः सर्वेषु, भूतेषु भगवान अस्ति ईश्वरः। इति भूतानि मनसा कामैस्तैः साधु मानयेत।।**" असं भागवतकारांचं पण म्हणण आहे.

अशा सर्वात्मक भावाने/भावनेने देवाचे पूजन, अर्चन, गुण-नाम-

स्वरूपसंकीर्तन करण्याएवढा अमूप आनंद अन्य कशातही मिळत नाही. ह्यात नवल ते काय ? पण अशा भक्ताची/वैष्णवाची सर्वतोपरी नुसती साथसंगत लाभली तरीसुद्धा आभाळात मावणार नाही एवढा आनंद मिळतो.

या अशा वैष्णवाचे संगतीने काय होते ? तर प्रतिक्षणी नवतेजाने चित्तात हरिनाम स्फुरणे हेच अमृतस्वरूप आहे. भागवतकार म्हणतात अशा वैष्णवाच अमृतपान करणे, परस्परवैष्णवांनी परस्परांना अमृतपान देणे हे प्रत्यक्ष स्वर्गलोकिच्या अमृतपानालाही लाजेने मान खाली घालायला लावणारे आहे. केवढे हे श्रेष्ठ **अमृतपान** ? **''यदि भवति मुकुन्दे भक्तिः आनंदसान्द्रा। विरूढति चरणाग्रे, मोक्ष साम्राज्यलक्ष्मीः।।''** या **अमृतपानापुढे** मोक्षलक्ष्मीसुद्धा तुच्छ !!!

वेदान्त/अध्यात्म शास्त्राच्या मते, निर्वाण, मोक्ष हेच अंतिम प्राप्तव्य आहे; परंतु भक्तिशास्त्रकारांच्यामते, अशा अमृताभक्तिीचे मूल्य त्या मोक्षाहून कितीतरी पटीने जास्त मोलाचे आहे. या पराभक्तीच्या भक्तिप्रेमामृतापुढे लौकिक-पारलौकिक सुखेच काय पण मुक्ती कःपदार्थ वाटते. तुलसीदासजी म्हणतात, ''मुकति निरादरी, भकती लुभाने'', भक्तिप्रेमाचे हे अमृतकुंभ मुक्तीपेक्षा पण **आनंददायक** मोठे रसाळ शांती, पुष्टी, तुष्टिप्रदान करणारे असे मधुरतम आहेत. मग या भक्तिप्रेमामृतानी ओथंबलेल्या अमृतपानाचा दिव्य आनंद अनुभवता येतो!!!

अमृतशब्दाचा आणखी एक अर्थ शास्त्रसंमत आहे. तो म्हणजे यज्ञ करून जे शेष राहते तेच अमृत. **''यज्ञशेषमधामृतम् यज्ञशेष प्रसादान्न''** (भगवंताच्या भोजनातील/श्रीगुरूंच्या भोजनातील) शेषभाग, उच्छिष्ट ह्याला पण भक्तिशास्त्रकारांनी अमृतच म्हटले आहे. ते सेवन करणाऱ्याला नित्य ब्रह्मपदाचीच प्राप्ती होते अस गीतापण छातीठोकपणे सांगते.

**''यज्ञशिष्ट-अमृत-भुजः यान्ति ब्रह्म सनातनम्।''**

यज्ञ म्हणजे आपल्या सर्वांचा त्याग करणे व स्वामित्व सोडणे. हे सर्वस्वाचे समर्पण जाणीवेने, स्वेच्छेने **'इदं न मम''** असे म्हणत सोडावयाचे.

या अमृतस्वरूप भक्तिमार्गात कामना/इच्छा/अपेक्षापूर्तीसाठी जे देवतापूजन घडते त्यास सकामभक्ती असे म्हणतात. अशी भक्ती श्रेष्ठभक्ताचार्यांना गौण-कनिष्ठ-हलकी वाटते.

भक्ती आराधना करावयाची ती जगदीश्वर परमात्म्याची/परब्रह्मस्वरूप श्रीगुरुंची आणि ती कोणत्याही ऐहिक-पारलौकिक लाभाची, सुखाची इच्छा मनात न ठेवता करावयाची असते. म्हणजे मगच ती अशी सर्वतोपरी, सर्वांगांनी, सर्वार्थानी अमृतस्वरूपाच होते !!!

अशी ही अमृतस्वरूप **परमप्रेमाभक्ती** भगवंतासाठीच/श्रीगुरुंसाठीच, भगवंतावर/श्रीगुरुवर **परमप्रेमभक्ती**. एकदा या अमृताभक्तिची गोडी लागली मग ती कधीच सुटत नाही, सुटणार नाही आणि तिचा कधीच वीट येणार नाही. **''वीटे ऐसे नाही सुख!!!! अवीट गे माये विटेना''** असा श्रीगुरुज्ञानोबामाऊलीचा या भक्तीप्रेमसुखामृताचा निर्वाळा.

खरोखरी आनंदस्वरूपी अमृतसागरात, दिव्यतेजाने उन्मेषित होणारी चैतन्यवेळ म्हणजेच ही निर्मळ, निष्काम, नितळ, पारदर्शक, नित्यनूतन अनन्यभक्ती आहे !!!

ही परमप्रेमस्वरूपभक्ती अंतर्बाह्य **अमृताने** नुसती सदैव ओथंबणारी अमृतवल्लीच आहे. प्रत्येक मनुष्यमात्राने ही पराभक्ती साध्य करावी आणि सच्चिदानंद भगवंताशी/श्रीगुरुंशी **समरस** होऊन अखंड अमृतसागरात मुक्तपणे विहार करावा, मुक्तपणे या **अमृतपानाचा** रसास्वाद घ्यावा हाच

ज्ञानोबारायांचा आग्रह आहे.

त्या भाग्यवान् गोपांगना अमृतपानाने तृप्त असूनसुद्धा पुन्हा भगवंताच्या वेणूचा भाग्योदय पाहून हेवा करत. केवढी भक्ती ? केवढी तृप्तता ? केवढी धन्यता. पण रसामृत सेवन करून पुनः तृप्तिला भूक लागली असं म्हणावयाच्या. असा हा भक्तिप्रेमरस. केवळ गोड, अमृतच आणि अविट !

* * * *

# चिंतन १०५

आनंद "**ब्रह्मणो विद्वान**" ब्रह्म आनंदस्वरूप आहे का आनंददायी आहे हा विद्‌वानांच्यातील वादाचा विषय आहे; परंतु या ब्रह्माच्या अनुभवांत आनंद आणि केवळ **आनंदच** आहे; हे खास. आनंदाचे मुख्य लक्षण म्हणजे भीतीचा अभाव. ब्रह्मानुभवाच्या या आनंदानुभूतीत देहभावाचा अभाव असतो. तेथे जीवाशिवाचे सामरस्य/ऐक्य असते. जेथे द्वैत म्हणजे दोनपणा आहेत/दोन आहेत तेथे भिती असते. म्हणून ब्रह्मानंदाचे दुसरे लक्षण **अभय** आहे. ब्रह्मसंस्पर्श ज्याला झाला तो **आनंदाच्या** डोही **आनंदतरंग** होऊन राहातो.

या ब्रह्माचे दुसरे एक लक्षण ते अव्यय आहे. व्यय म्हणजे खर्ची पडणे; कमी होणे; नाहीसे होणे. व्यय याचा आणिक एक दुसरा अर्थ तो जुना होतो का ? त्याचा बदल व्ययाकडे असतो का ? त्याला देश-काल-वस्तूचे बंधन आहे का ? तर वरील कोणताही अवगुण भगवंताला नाही; म्हणून परब्रह्म **अव्यय** आहे.

भगवंत/देव अनंत आहे. दिन-प्रतिदिन तो वाढलेलाच अनुभवास येतो. या वाढत्या चढत्या साक्षात्कारसुखाचा आनंदपण देवाप्रमाणेच चढता-वाढता असतो आणि त्याला कारणभूत आहे श्रीसद्‌गुरुंकडून मिळालेले नाम. "**अठरा पुराणांच्या गोष्टी। नामाविण नाही गोष्टी।।**" जगातील सारसर्वस्व म्हणजे फक्त एक भगवंताचे नाम. तुकोबाराय म्हणतात, "**सार, सार, सार। विठोबा नाम तुझे सार।**" "**नाम तेची रुप**" या साक्षात्कारी संतांच्या वचनाप्रमाणे नाम हे **ब्रह्मबीज** आहे. नाम हाच देव असल्याने त्याच्या

स्मरणांत कधी व्यय नाही, खर्च नाही, ज्या ज्या वेळी नामाचे स्मरण होते त्या त्या वेळी नामाची एकच असलेली जमेची बाजू सातत्याने वाढतच राहाते. जाणून अगर न जाणून जरी आठव झाला तरी आपले सद्‌गुरु आपणास देवाचीच खूण दाखवत असतात. नाम व रूप एकच आहे. याने आपल्या प्रचितीत सतत वाढ होते. ''**नाम आठविता रुपी प्रगट पै झाला**'' हाच सोनियाचा अमृतस्वरूप आनंददिन.

या देवाच्या अनुभवात सातत्य पाहिजे. एकदा दिसलेले रुप पुनः पुनः दिसावयास हवे. ''**तो मज व्हावा, तो मज व्हावा। वेळोवेळा व्हावा पांडूरंग।।**'' कटीवर हात ठेवलेल्या, पितांबरधारी, गळा वैजयंती माळा, कस्तुरी मळवट, चंदनाची उटी, समचरण, समदृष्टी, सुंदर सावळे सुकुमार विठ्ठल पुनः पुनः दिसला पाहिजे. **सातत्य** हा देवाच्या स्वरूपाच्या सत्यानुभवाचा निकष आहे. यासाठी चित्तात स्मरण, परेत नाम आणि डोळ्यांनी **रूप** एकाच वेळी झाले पाहिजे. (स्मरण झाले पाहिजे, नाम **आले** पाहिजे आणि स्वरूप पाहिले-पाहातां आले पाहिजे.)

कोणत्याही साध्यासाठी साधनाची नितांत गरज असतेच. साधनाशिवाय साध्य शक्यच नाही. साधन व साध्य एका अर्थाने एकरूपच असतात. साधनात साध्य हे सामावलेले असतेच जसे दुधांत लोणी असतेच पण तापवणे, विरजणे, घुसळणे ह्या प्रक्रियाखेरीज ते हाती येत नाही तसेच साध्य-साधनाचे. साधनाची सुरवात म्हणजे साध्याची पहिली पायरीच होय. ''**ज्या क्षणी अनुग्रह त्याच क्षणी मुक्तता**'' या वाक्याचा अर्थ हाच आहे !!! एकाच दिवसांत कोणी सावकार/श्रीमंत झाला नाही आणि शाळेत पहिल्याच दिवशी जाऊन कोणी पंडीत होत नाही. अगदी तसेच या देवाच्या आत्मसाक्षात्काराचे. भगवत्‌साक्षात्काराचे ध्येय गाठण्यासाठी सातत्याच्या

साधनाचीच नितांत गरज आहे. साधकाला आपल्या उभ्या जीवनात साधनेशिवाय दुसरे काहीच मूल्यवान् वाटता कामा नये.

या साधनाचा उगम आपल्या सद्गुरुकडून मिळालेल्या सबीज नामात आहे. या नामाचे निरंतर साधन करून अध्यात्माचे शिखर आपल्या शिष्याने गाठावे हीच श्रीगुरुंची आस. शिष्य शिष्यच न राहता तो गुरुबोधाकार कधी होईल ? गुरुत्वास कसा पोहोचेल अशीच वाट सद्गुरु पाहात असतात !!!

नाम घ्या, इतके घ्या नां की भगवंत मागे-पुढे उभा असल्याची खूण पटेल.

* * * *

# चिंतन १०६

अमृताभक्तिप्रेमसुख प्राप्त झाले की मनुष्य अंतिम पारमार्थिक ध्येय (भगवद्प्राप्ती व भगवद्सेवाप्रेम) साध्य करतो. तो जन्ममरणाच्या फेऱ्यातून सुटतो. अमर होतो; भक्त स्वत:च अंगेकरून अमृतस्वरूप सत्वगुणांचा पुतळा बनतो आणि तो तृप्त, शांत कृतार्थ होतो.

भक्तिप्रेमसुख हे नुसत्या पौरूष (मानवी) प्रयत्नाने मिळत नाही. मानवी प्रयत्नाने मिळवता येते त्याला भक्तिशास्त्रकार "**यत्प्राप्य**" म्हणतात आणि ज्या गोष्टींची प्राप्ती होते, हे मानवी प्रयत्नांच्या जोडीने, ईश्वराच्या कृपेवरच अवलंबून असते. त्यासाठी "**यत् लब्धवा**" असा शब्दप्रयोग करतात. खरे तर त्या कृपाळू, दयाघन भगवंताच्या कृपेशिवाय काहीच मिळत नाही. आत्मसाक्षात्कार, सगुणभगवंताच्यारूपात ईश्वराचा साक्षात्कार आणि सायुज्यतामुक्तिच्याही मस्तकावर किरीटासारखी विराजमान होणारा **भक्तिप्रेमा** हे केवळ ईशकृपेनेच / श्रीगुरूकृपेनेच मिळतात. "**य एव एष वृणुते तेन लभ्य:**" असंच कठोपनिषदकारांचंही सांगणे आहे.

'**विश्वरूप**' अर्जुनाच्या विनंतीस अनुसरून भगवंतानी प्रकट केले, पण अर्जुन केव्हा पाहू शकतो ते ? तर अर्जुनावर कृपादृष्टी होऊन त्याला जेव्हा दिव्यचक्षू मिळाले तेव्हा ना ? अशी त्या कृपावंत भगवंताची विशेष कृपा झाल्यावाचून, मायेच्या अतीत असणाऱ्या परमसत्यस्वरूप परमात्म्याचे अत्यंत निरूपाधिक स्वरूप कधीच जाणता येत नाही; अनुभविता येत नाही. भक्ताचार्य नारद म्हणतात, "भगवंताची अत्यंत उत्कट प्रेमभावाने, निष्काम भक्ती कराल

तर तुमची पात्रता एवढी वाढेल की तो भक्तिप्रेमाचा भुकेला प्रभूच स्वत: प्रसन्न होऊन आपले **स्व–रूप** दाखवतो, आणि संवितज्ञान, मुक्ती आणि मुक्तिला लाज आणणारे परमभक्तिप्रेमसुख भरभरून देतो.

ही परमप्रेमस्वरूप भक्ती आचरण्यास, भाषाभेद, वर्णभेद, वंशभेद, जातीभेद आदी कोणतेही भेद न मानता, सर्वांनाच आचरण्यास पूर्ण मुभा आहे. ''**या रे यारे लहान थोर। याति भलते नारी नर। करावा विचार। नलगे चिंता कोणासी।।**'' तुकोबारायांची ग्वाही आहे ''**सकळांसि येथे आहे अधिकार।**''

असा परमप्रेमस्वरूप भक्ती करणारा भक्त हा सिद्ध होतो. व्यवहारात सिद्ध याचा अर्थ सिद्धी प्राप्त झालेला. म्हणजे तरी काय तर जगरहाटीवेगळे काहीतरी चमत्कार करून दाखविता येण्याचे सामर्थ्य. ते सामर्थ्य मंत्र–तंत्र, जप–तप, तसेच अघोरी साधना यामुळे प्राप्त होते. अशा माणसाभोवती नेहमीच गर्दी असते, त्याची वाखाणणी प्रशंसा होते, पण अंती नरकावस्था.

भक्तिशास्त्रकारांनी सिद्ध शब्दाचा अर्थ फार सुंदर सांगितला आहे. सिद्ध होणे म्हणजे परमप्रेमरूपाभक्तीने संपन्न होऊन हरिप्राप्ती साधणे. अशा भक्ताला भगवंत हेच साध्य प्राप्त झालेले असल्याने अन्य काही साध्य उरतच नाही आणि त्यामुळे तो तृप्त होतो. गंगा सागराला मिळाली की तिचा पुढचा प्रवासच खुंटतो ना ? अगदी तसच भक्ताच. मग तो सगळा उर्वरित काळ परमानंदात, भक्तिप्रेमसुख अनुभवण्यात, भगवद्सेवेतच घालवतो.

आता हा अनन्य भक्त पूर्ण तृप्त होतो तरी कसा ? तर अंत:करणाचे सर्वभाव, विचार व चिंतन एका भगवंताकडे वळविल्यानंतर मन, बुद्धी, इंद्रिय यांची धावच कमी होते आणि शेवटी हरि–साक्षात्कार झाल्यावर तर काय ''**परं दृष्ट्वा निवर्तते।**'' मग भक्त, पूर्ण शांत, तृप्त व समाधानाने सर्वांगाने

अलंकृत होतो. ‘‘**सर्व सुख ल्यालो सर्व अलंकार। आनंदे निर्भर डुल्लतसे।।**’’ सर्व आशा-आकांक्षा लय पावतात. द्वेष, मत्सर, क्रोध, दुःख असंगत होतात.

असा भक्त अमृतस्वरूप होतो, म्हणजे अमृतासारखा गोड, मधुर, सर्वांना हवा-हवासा वाटणारा व सर्वजनप्रिय होतो. रज-तम गुणांचा निरास झाल्याने शुद्ध-सत्वगुणांचा पुतळा होतो. त्याच्या अंगकांतीद्वारे, बोलण्यात-चालण्यात-वागण्यात विलक्षण आनंद प्रेमळपणा प्रकटतो, त्याच्या भोवतालचे वातावरण मांगल्याने भरून जाते. पराशांतीचे साम्राज्यच त्याचेरूपाने नांदत असते. अमृत म्हणजे अमर. यालाच मोक्ष, निर्वाण म्हणतात. पण हा भाग्यवान भक्त मोक्ष मिळूनही हरिनाम गाण्याकरिता, भगवत्सेवेसाठी, भक्तिप्रेमसुखासाठी पुनः पुनः जन्म घेण्यास भीत नाही. तर उलट प्रतिज्ञापूर्वक या प्रेम-भक्ति-सेवेसाठी जन्माला येतो.

* * * *



# चिंतन १०७

वाङ्‌यज्ञ, प्रवचन, भजन, निरूपण किंवा अनुष्ठान काय? ह्या सर्व प्रकारच्या सेवा तो समर्थप्रभू करवून घेतो. त्यात अण्णा फक्त निमित्त. कर्ता-करविता तोच एक भगवंत. हेच काय ते खरे. 'मी' करतो म्हटले ना? तर काहीएक होणार नाही. "**निमित्ताकारणे केला असे प्राणि। माझे माझे म्हणोनि व्यर्थ गेला.**"

प्राणीमात्राच्या जीवनाची एकंदर जडण-घडण श्रद्धेतूनच होत असते. प्रत्यक्ष हे एक श्रद्धेचे महत्वाचे प्रमाण आहे. आपण प्रत्यक्ष पाहिलेल्यावर मनुष्यमात्राची सहजच श्रद्धा बसते. त्याचप्रमाणे शब्द प्रमाणाचे. आप्त वाक्यातूनपण श्रद्धेचा उगम होत असतो. येथे आप्त म्हणजे नातेवाईक. सोयरे-धायरे असा अर्थ अभिप्रेत नाही. तर आप्त म्हणजे संत, साधू, श्रीसद्‌गुरू, अध्यात्मग्रंथ इत्यादी. ज्यांना आपण ज्येष्ठ-श्रेष्ठ-पूज्य मानतो त्यांच्या शब्दावर आपला सहजच मोठा विश्वास बसतो. त्यांचे शब्द आपल्याला सत्य वाटतात. वेदतुल्य वाटतात.

श्रद्धाकेंद्र अनेक!!! असतात. व्यक्ती-व्यक्ती समाज, राष्ट्र यांच्या स्तरावर भौतिक जीवनात ती भिन्न-भिन्न असू शकतात. ध्येये अनेक तर श्रद्धा केंद्रे पण अनेक ना? परंतु अध्यात्मात सगळ्यांचे ध्येय एकच. ते म्हणजे आत्मज्ञान, आत्मसाक्षात्कार-आत्मानुभव आणि ते ध्येय गाठण्याचा निश्चित असा मार्गही पण एकच. तो म्हणजे नामसाधन. नामस्मरण. या साधनाची प्रक्रिया पण सामान्यत: एकच आहे. म्हणून अध्यात्मजीवनात श्रद्धेचे स्थान एकच. आपले श्रीगुरू.

या क्षेत्रातील महाजनांमध्ये श्रीसद्‌गुरूचे स्थान श्रेष्ठतम. त्यानंतर क्रमांक म्हणजे सगळे आत्मसाक्षात्कारी संत.

संत-सद्‌गुरू भेटण कठीण. महाकठिण. "**पूर्व जन्मी सुकृते थोर केली। ती मज आजि फळासी आली।।**" असे दस्तुरखुद्द श्रीगुरूज्ञानेश्वरमहाराज म्हणतात; मग आपला काय पाड ना? बर भेटले तर त्यांच्यावर श्रद्धा बसणे आणखी कठीण. एवढ्यानेही झाल नाही. श्रद्धा बसली आपली!!! तरी त्यांची कृपा होणे त्याहून कठीणच. श्रीगुरूंची कृपा म्हणजे त्यांच्याकडून सबीज नाम मिळणे. जसे "**रामकृष्णहरि.**" पण, आपल्या संपर्कात, सान्निध्यात, आपल्याजवळ येणाऱ्या जीवींचा भक्तिप्रेमभाव, श्रद्धा, त्याचे अंत:करण ते जाणतात आणि मगच त्याच्यावर कृपानुग्रह करतात हं ! आता अशा कसोटीला उतरून नाम जरी मिळाले तरी, सुरवातीची श्रद्धा, पुढे शेवटपर्यंत टिकवणे हे पण अति महत्वाचे. अत्यंत प्रयासाने, कष्टाने, त्या आड येणाऱ्या सर्व गोष्टी निर्भयपणे बाजूस सारून ती श्रद्धा जोपासावी लागते, टिकवावी लागते.

श्रीगुरूंवरील अर्थात निवृत्तिमार्गावरील श्रद्धेला प्रवृत्ती मार्गातील अनेक धोके असतात. अध्यात्ममार्गातील या श्रद्धेचा मुख्य शत्रू म्हणजे देहभाव. देहभावातच सुख वाटले तर श्रद्धा तेथेच विसंबते. कारण जेथे सुख तेथे श्रद्धा हा सामान्य नियम. आपले सुख, पैसा, लौकिक, व्यवहार, इत्यादी ठिकाणी विभागलेले असते हे प्रवृत्तीतील सुख सहज अनुभवता येते. थोड्या श्रमाने, प्रयत्नाने सहज हाती येते (आले असे वाटते) त्यामुळे अध्यात्माकडील श्रद्धा कमी पडते.

श्रद्धा हा मनाचा स्थायीभाव आहे. श्रद्धा ही भावनामय असते. देहभावाला चिकटलेल्या मनाच्या कल्पना श्रीगुरूंवरील श्रद्धेच्या आड येतात. त्यासाठी

देहभावातून हळू हळू आत्मभावाकडे पाऊले टाकणे फार आवश्यक आहे.

मनाची संकल्पशक्ती, आणि बुद्धीची भावनाशक्ती यांचा सुंदर समन्वय साधला की मग श्रद्धा वाढते; ती सूक्ष्म पण बळकट, दृढ आणि अतूट होते.

अशी श्रद्धा का एकदा बळकट झाली की ध्येय बळकट होते. सगळ्या शंकासुरांना तोंड देऊन त्यांचे निर्दलन करते मग ही श्रद्धास्वरूपी महालक्ष्मी. महाकाली-महासरस्वती. **"या देवी सर्वभूतेषु श्रद्धा रूपेण संतीता। नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमो नमः।।"**

मग परमपदाचे, भगवद्साक्षात्काराचे ध्येय श्रद्धा आणि नामसाधना यांतून साकार होतेच होते. म्हणून सद्गुरूंवर नितांत श्रद्धा ठेवून त्यांनी दिलेल्या सबीजनामाचे नित्य, अखंड, सत्भरयुक्त स्मरण असावे.

* * * *

# चिंतन १०८

येथील श्रीमद् भागवत्कथा त्या सुंदरनटवराच्याच अंगी असणाऱ्या कौशल्याने नितांत सुंदर अशी गुंफली गेली. त्या त्रिभुवनसुंदरालाच अर्पण केली (अर्पण केली हा सुद्धा एक सूक्ष्म अहंकारच!) प्रत्येक पुष्प गुंफताना खूप-खूप आनंद अनुभवत होतो आणि त्या प्रत्येक आनंदक्षणी, आनंदकणागणिक खूपच खूप आठवण सातत्याने येत होती ती भगवंताची.

येथील 'श्रीमद्भागवतकथाज्ञानयज्ञ' त्यात पण नित्यनूतन रंग-रंगसंगती, रंगछाया, श्रीरंगनाथाच्याच रंगप्रसादामुळे रंगतच आहे. उद्या तर रंगपंचमी!! आणि बघा काय योगायोग, उद्याच्या कथाभागात रसराज कृष्णराजाची रासपंचाध्यायीच-रासलीलाचं वर्णन-गुणगान करण्याच, त्या भक्तिप्रेमरसात नखशिखान्त रंगून जाण्याच सौभाग्य. भक्तिप्रेमरसरंगाइतका, नितळ पारदर्शक, न विटणारा, दिवसेंदिवस वाढतच जाणारा अन्य रंगच नाही. जीवनाच्या कक्षांमध्ये, अल्हाददायक, सुखवणारा, प्रसन्नता देणारा हा श्रीरंगाचा रंग; मोहक आहे. रंगतदार आहे. रंग हा तर खरा नेत्राचा विषय, पण ह्या भक्तिप्रेमरसरंगाला नाद, स्पर्श, रस आणि गंध पण आहे. केवळ शब्दच जर इतके रंगीत तर शब्दापलीकडला प्रत्यक्ष अनुभव किती रंगदार? गोकुळातल्या भगवान्गोपी!!! नंदलालाचा शब्द कानी पडला, त्याच्या बासरीचा सूर कानी पडला तर लगेचच कृष्णरूप होऊन जात. नुसत्या 'ध्वनि-शब्द-नाद' ह्यात जर इतक सामर्थ्य? तर प्रत्यक्ष भेटीत-संवादात किती? नाही का? जिवीचा जिव्हाळा, आनंदकंद त्याचा शब्दच ऐकून भावसमाधी लागायची त्यांची. दूरवरून आलेल्या शब्दात इतका आनंद, मग समोरासमोर आल्यावर त्या

आनंदस्वरूपात आनंदच होऊन राहणार ना?

भक्तियोग सांगतो की मन कोणत्या तरी चिंतनात गुंतत असते. ही मनाची खोड लक्षात घेऊन त्यास अधिक अधिक हरिचिंतनात/नामचिंतनात गुंतवा!! भगवंताच्या-सच्चिदानंदाच्या अनुसंधानात गुंतलेले चित्त त्याच्यातच लीन-विलीन होते आणि हरिभक्ती दिन प्रतिदिन वाढतच जाते.

जसजसे मन परमात्म्याकडे ओढले जाते, त्या त्या प्रमाणात ते जास्तीत जास्त एकाग्र होत जाते; योगशास्त्राच्या अवघड अशा अष्टांग योगसाधना न आचरताही भक्तियोगाने योगाच्या अष्टांगात विशारदता मिळते. म्हणून तर नारदासारखे भक्ताचार्य आणि सर्वच्या सर्व संतमहात्मे सांगतात की मन सतत हरि-नामस्मरणातच रमवा. मग चित्त सहजच निरुद्ध आणि भक्तियुक्तच होईल.

हा भक्तिमार्ग पौरूष, प्रयत्नावर भर देणारा, आशावादी व सातत्याने क्रियाशिलतेस अनुसरणारा असा महान प्रवृत्तिमार्ग आहे. कोणतीही क्रिया, कर्म म्हणताच, त्या कर्माचरणाचा हेतू आणि फल या गोष्टी प्रामुख्याने विचारात घ्याव्याच लागतात. आदर्श भक्त तोच की जो धन-मान-सत्ता-लौकिक-प्रतिष्ठा या सर्वांपासून दूर राहातो. प्रारब्ध वशांत जरी समोर-हाताशी आल्या तर त्यात आसक्त चित्त नसतो. त्याचा सुंदर विनियोग करून पुन: मोकळाच्या-मोकळा राहतो. भगवत्प्राप्तीला अनुकूल असाच त्याचा कर्मक्रियाचा आचार असतो. अशुभ कर्मे तर करतच नाही. कारण कर्माचे नावही काढत नाही; इतकेच काय पण शुभकर्माचे जे फळ निरपेक्ष असतानाही मिळते, ते सुद्धा तो श्रीहरिचरणीच अर्पण करतो. अशा योगाने तो सर्वबंधमुक्त होतो. आपल्या ठिकाणी असणाऱ्या परमप्रेमभक्तिभावामुळे तो मस्त होऊन, उन्मनी अवस्थेत धुंद होऊन भगवंताशी, जीवीचा जीव्हाळा, प्रेमभावाचा पुतळा अशा प्रियाची परमसीमा असणाऱ्या परमपुरूषोत्तमाशी तादात्म्य योग साधतो.

या सर्व गोष्टींवरून अस अनुमान निघते, की हरिप्रेमाने नुसती ओथंबलेली अमृताभक्ती ही नेहमीच निष्काम, निरागस, निरामय, निर्मळ, निरंजन, निर्‌विषय असते. या भक्तिप्रेमसुखासाठी जीवनाचा प्रत्येकक्षण, अर्धाक्षणसुद्धा हरिस्मरणात-नामस्मरणात व्यतीत करा असाच सगळ्या भागवतोत्तमोत्तमांचा आग्रह आहे. कळवळून सांगण आहे. मग आता अण्णा या शिवाय दुसरे काय सांगणार, बोलणार, लिहिणार. खर ना??

या भक्तिमार्गाच आणखी एक वैशिष्ट्य!!! योगमार्गाहून श्रेष्ठ. योगमार्गात मन वळवावयाचे नाही तर मन शून्य करावयाचे असते. त्यामुळे ते निरूद्ध होण्यास अति कष्ट पडतात; काळ जातो. तर भक्तियोग एक विषय-हरिविषय करावयास सांगते. त्यामुळे भक्तिमार्ग अगदी सामान्यांसही सहज आचरता येतो. या भक्तियोगशास्त्रात मन-इंद्रियांची व्यापार (म्हणजे प्रवृत्ती) नष्ट करावयाची नाही तर त्या चिदानंदाचाच व्यापार-चिंतन करावयाची/करणारी बनवावयाची आहे.

भक्त आपल्या सर्व इंद्रियांना, मनाला म्हणत असतो, "**जिव्हे कीर्तय केशवं मुररिपुं, चेतो भज: श्रीधरम्। पाणि द्वन्द्वसमर्चय, अच्युतकथा: श्रोत्रद्वयं त्वं श्रुणु।। कृष्णं लोकय लोचनद्वय हरे:, गच्छांध्रि युग्मालयम्। जिघ्र घ्राण मुकुन्द-पाद-तुलसी मूर्धन् नम: अधक्षोजम्।।**" अर्थ शब्दवाही सोपा आहे, तुम्हाला गोळाबेरीज स्वरूपात सहज लक्षी येईल म्हणून लिहीला नाही.

सर्व गात्रे, क्रिया, कर्मे, तसेच विचार व भाव भगवत्‌प्रेमभावाने स्फुरित होऊन वर्तणे होते मग घडणारे प्रत्येक कर्म हेच भगवद्‌पूजन होते.

एखादा साधक, सत्‌शिष्य स्वभावत:च इतका विनयसंपन्न असतो ना? बोलायचच काम नाही. भावनाप्रधान भक्त असाच असतो, आपल्या ठिकाणी

असणारा प्रेमभाव, गोडवा, आत्मीयता, श्रद्धा त्याला सतत कमीच वाटते. हे वाटण सुद्धा विनयभावाचच लक्षण. उत्तम लाडाचच. या लडिवाळपणालाच भुलतो देव!!!

* * * *




मनुष्याच्या जीवनाचे उच्चतम मूल्य म्हणजे परमार्थ अगर आत्मसाक्षात्कार. भक्तिप्रेमसुख हा तर आत्मसाक्षात्काराच्या मस्तकावरील मुकुटमणी. कनीष्ठतम जीवनमूल्य कोणते म्हणाल तर संसार.

श्रीज्ञानेश्वरमहाराजादी भावंडे, श्रीसमर्थ ह्यांचा अपवाद वगळल्यास सर्व संतांनी प्रपंच केलाच होता. त्यांना घर-दार, शेती-वाडी, जमीन-जुमला, स्त्री-मुल-बाळ सर्व होतेच नां? त्यांची व्यवस्था ते पहात असत. आपापला धंदा-व्यवसाय-नोकरी-चाकरी करतच असत. अस असतांना संसाराला त्यांनी कनिष्ठ का लेखले असेल? असा सर्वसाधारण सामान्यांस प्रश्न पडतो. खरे ना?

संसार व प्रपंच हे दोन्ही समानार्थीच शब्द आहेत. अशीच सर्वसामान्यत: समजूत आहे. परंतु अध्यात्मशास्त्रदृष्ट्या त्यांचा अर्थ अगदीच वेगळा आहे. एकंदर दृष्टाकार खरा असून तेच जीवनाचे सार सर्वस्व आहे, असे समजून या जीवाला त्याचीच सवय लागणे म्हणजे संसार!!! आपला देह, मन, बुद्धी व चित्त यातच गुंतून पडणे, हे सर्व म्हणजेच खरा मी असे समजून जगणे म्हणजे संसार!!!

तर आपण या दृश्याचे/आकाराचे, पंच आहोत, विश्वस्त आहोत, या विचाराने/विवेकाने या पंचभूतात्मक अशा दृश्य जीवनात साक्षीत्वाने राहणे म्हणजे प्रपंच!!! म्हणून सगळे संत एकमुखाने सांगतात की ''बाबांनो, संसार करू नका तर केवळ साक्षीभावाने प्रपंच करा.

जीवनमूल्य मापनाचा आधार कोणता? ही जीवनमूल्ये कोणत्या तत्वावर

आधारीत असतात? मागणी व पुरवठा हा मूल्यमापनाचा मूलभूत असा सिद्धांत आहे. प्रत्येक प्राणीमात्राला सुख हवे आहे. प्रत्येक जीवाची मागणी ही सुखाचीच आहे. दु:ख कोणालाच नको असते. आपणास अनुभवाला येणाऱ्या सुखाच्या प्रमाणावरून प्रत्येकाच्या मूल्याचे मापन होते. सुख, शांती व आनंद हे मूल्यमापनाचे निकष आहेत. ज्याच्यापासून जास्तीत जास्त सुख प्राप्त होते, त्याचे मूल्य जीवनात जास्त.

संसार हे दु:खाचे मूळ आहे. त्याला काळाचे बंधन आहे. **''दु:खासी कारण जन्म घ्यावा।''** असेच श्री तुकोबारायांचे वचन आहे. पण परमार्थ हा सुखस्वरूप आहे; तर आनंद हाच साक्षात्कार आहे. (म्हणजे स्वानंदाची सहज अनुभूती) या आनंदानेच मनाची, बुद्धीची व चित्ताची भूक शांत होते. म्हणून आनंदस्वरूप असलेला परमार्थ श्रेष्ठतम आहे.

संसारात काळजी व प्रपंचातील साक्षीत्व हा संसार व प्रपंच यातला फरक आहे. काळजीचे पेव जवसाच्या पेवासारखे आहे; त्याचा अंत कोणाला लागत नाही. काळजीचा शेवट म्हणजे दु:खाचाच शेवट. या काळजीला दुसरी एक बाजू असते काळाची. ज्या काळावर आपला ताबा नाही अशा काळातील गोष्टींची आपण वृथा, सतत काळजी करतो. एकूण दृश्याच्या काळजीने आपल्या पदरी काळजीशिवाय काहीच येत नाही. मात्र सोन्यासारख्या मोलाच्या आयुष्याचा नाश मात्र होतो.

अगदी मोजक्या, थोड्याच जणांना त्यांच्या पूर्व अशा पुण्याईने काळजीतून मुक्त होण्याचा मार्ग सापडतो. जास्तीत जास्त पूर्वपुण्य व चांगला मार्गदर्शक श्रीगुरू ज्यांना लाभतो असे थोडेच भाग्यवान्!!! आपल्या पूर्वपुण्याईच्या जोरावर व मार्गदर्शकाच्या कृपेने ही मंडळी सुखाने आनंदाच्या वाटेवर आनंदाने वाटचाल करतात. प्रत्येक घटनेकडे मग परमार्थाच्या दृष्टीने

साधकाला, वाटचाल करणाऱ्या शिष्योत्तमाला पाहता येते. ''**प्रारब्धकर्मणा भोगादेव क्षयः।**'' आपत्तीमुळे कर्माचा क्षय होतो. साधकाचे भक्तिप्रेम अविचल, एकाग्र, एकविध होते. आपत्ती, संकटे, दुःख हे देहाला लागलेले आहेत. देह अनित्य आहे. आत्माराम नित्य आहे. अशा चिंतनाने आत्माकारता प्राप्त होते. मग काळजी कशाची?? काळजीचे नावच नाही. फक्त आनंदच उरतो केवळ.

* * * *



# चिंतन ११०

भक्ताने/उपासकाने, आपल्या उपास्य देवाच्या/श्रीगुरूच्या ठिकाणी अनन्यभक्तिभाव ठेवावा; आणि तद्विरोधी अशा देवता, कर्मे, उपासना, कामना, यांच्याबद्दल उदासीनता, उपेक्षाभाव ठेवावा, हे सुद्धा भक्तीचे आणखी एक विरोध लक्षण आहे.

भक्ती ही कामायमाना (म्हणजे सकाम) नाही. भक्तिविरोधी गोष्टींबाबत भक्ती उदासीनच असते; आणि अशी भक्ती ही विरोधस्वरूपाच असते; का म्हणाल तर ती आपल्या इष्टदेवतेशी अनन्य असते. म्हणून जसे रविकिरण सूर्याशी, चांदणे चंद्राशी, अगर आईच्या गर्भातील गर्भ आपल्या मातेशी. भक्तिचे मर्मस्थान जर कोणते असेल तर अनन्यत्व हे होय. अशी अनन्य भक्ती असल्यावर ती आपोआपच अन्य-विषय-निरूद्ध असतेच; त्याने चित्त निष्काम होते आणि मग ते सहजच भगवद्चिंतनात एकाग्र होते.

आता प्रश्न असा की श्रीहरिबद्दल ही अनन्यता कशी साधावी? योगमार्गात शरीर, प्राण व मन कठोर शिस्तीत राबवून मगच एकप्रवाहिता साधने वशीकरणासारख्या विद्येत सामान्य मनुष्याच्या मनावर दुसऱ्या एका प्रभावी मनाने दडपण आणून, त्यास आज्ञापालन करावयास लावले जाते; पण हा सर्वच प्रकार अस्वाभाविक, बळजबरीचा असल्याने भक्तियोगात तो वर्ज्य आहे/करावा.

परमप्रेमस्वरूपा अशा भक्तिमार्गात कोणत्याही प्रकारे शरीर, मन, भावना व सर्व इंद्रियांचा व्यवहार बंद करणे, दडपून टाकणे नाही तर या सर्वांचा मोहरा

एका भगवंताकडे वळवावयाचा आणि मन-इंद्रिय यांच्या सर्व वृत्ती, प्रवृत्ती, प्रेरणा, भावना, यांना प्रेमस्वरूपाभक्तीमध्येच गुंतवावयाचे. भागवतकार म्हणतात, ''**कायेन वाचा मनसा इन्द्रियै वा। बुध्याऽऽत्मना वा अनुसृत-स्वभावात्।। करोमि यद् यद् सकलं परस्मै। नारायणाय इति समर्पयेत् तत्।।**''

या भागवतकारांच्या मार्गदर्शनाप्रमाणे अत्यंत प्रामाणिकपणे, चिकाटीने, प्रेमभक्तीने वागणाऱ्यांचे जीवनच बदलते, चित्प्रकाशाने उजळून निघते! भक्तिप्रेमाच्या लाख-लाख ज्योती जीवनाच्या गाभाऱ्यात उजळतात, सतत नंदादीपागत तेवू लागतात या मंगल अवस्थेत मुळी, चित्त आपोआपच निरूद्ध-निरोध होऊन भगवंताशी अनन्यभावाने रत होते!!! मग एका सच्चिदानंदाशिवाय दुसरे काही सुचत नाही, रूचत नाही, खपत नाही.

यमुनेच्या काठी व्रजगोपी श्रीकृष्णाला म्हणाल्या, ''हे मुरलीमोहना, आता आमचे चित्त, सर्व अवधान तू केव्हाच आपल्या सत्स्वरूपी एकरूप केले आहेस, त्यामुळे आमचे चित्त आनंदकंद अशा स्वरूपी आनंदाने रममाण होऊन गेले आहे. अरे कुंजविहारी, आमचे पाय सुद्धा तुझ्या चरणकमलापासून एक केसभर सुद्धा दूर जाण्यास तयार नाहीत.'' असे अनन्य भक्तीचे एक निरंजन स्वरूप व्रजगोपींच्या ठिकाणी स्थिरावले होते म्हणून अशीच अनन्य भक्तिस्थिती तळमळीच्या भक्तमात्राने साधावी. नाही का?

भगवद्गीतेतील सर्वत्र विखुरलेले भक्तिविषयक श्लोक हे समग्रत: अशा अनन्यभक्तीचे स्वरूपच विविध अंगाने, त्यातील तपशील उलगडून सांगणारेच आहेत.

अशा उत्कट, एकप्रवाही व अनन्य प्रेमलक्षणाभक्तिनीच तो भगवंत वश होतो!!! शास्त्रज्ञान हे परोक्षच आहे. त्यामुळे, तसेच यज्ञ, जप, तप, तीर्थ,

यात्रा, दान, व्रते व देहदंड या सर्वांमुळे त्या परप्रेमास्पद परमात्म्याची प्राप्ती होईलच असे नाही. परंतु ही अतिदुर्लभ गोष्ट, परमात्मप्राप्ति-अनन्य-परमप्रेमलक्षणाभक्तीच्या प्रभावाने/सामर्थ्याने अगदीच सुलभरित्या साधते. केवढे हे महद्‌आश्चर्य??? एका भक्तिप्रेमाचे.

या भक्तिप्रेमाने, भक्त हा प्रत्यक्ष भगवंतावरपण सत्ता गाजवतो. त्याला अधीन करून ठेवतो. ''**अशी अनन्य परमप्रेमलक्षणा भक्ती अंत:करणात प्रवाहित होण्याचे साधन प्रेमपूर्वक नामस्मरण.**''

* * * *

# चिंतन १११

ज्ञानेश्वरी!!! बऱ्याच लोकांची अशी चुकीची समजूत आहे की ज्ञानमार्ग हा एक स्वतंत्र मार्ग आहे; भक्तीशी त्याचा काही-एक संबंध नाही. उपनिषदे, भगवद्‌गीता व ब्रह्मसूत्राचा शब्दश: अभ्यास म्हणजेच ज्ञानमार्ग!!! असे हे लोक समजतात बघा. आणखी थोड्या लोकांची तर अशी कल्पना आहे की या प्रस्थानत्रयींच्या अभ्यासाने साक्षात्कार होतो; पण तस नाही बर का. या शब्द-ज्ञानाने साक्षात्काराच्या मंदिराच्या सभामंडपापर्यंत जाता येईल फार तर, पण गाभाऱ्यात प्रवेश नाही करता येणार. त्यासाठी; हवे भक्तीच्या उदरी जन्मलेले ज्ञानच.

संतवाङ्मयात "ज्ञान" शब्दाचा उल्लेख जिकडे-तिकडे खूपच आढळतो. मग ज्ञान म्हणजे काय? त्याची व्याप्ती किती? ग्रंथवाचनातून मिळणाऱ्या माहितीला ज्ञान म्हणावयाची रूढी आहे; तर बुद्धीला ताण देऊन, तर्काच्या आधारावर होणाऱ्या ज्ञानासही ज्ञानच म्हणतात. पण हा शब्दार्थ झाला. संगीतावरील ग्रंथ वाचून संगीताची माहिती प्राप्त करून घेता येते बघा. पण त्याने तो काही गवई होत नाही. पाकशास्त्राची पुस्तके वाचून, नुसती वाचून कोणी सुगरण होत नाही. तसंच स्वरूपज्ञानाच, स्वरूपाचा-स्वानंदाचा-आत्मारामाचा अभ्यास, सराव करावा लागतो आणि तो सराव म्हणजेच नामस्मरण.

सराव, साधन सतत करावयाची गोष्ट. आत्मबोधाचे साधन कसे करावयाचे? ज्ञान ही एक विशिष्ट अवस्था अनुभूती आहे. जाणीवेची ही

अवस्था म्हणजेच ज्ञान तीच भक्ती. म्हणून ही एक क्रिया नसून आत्मप्रेमाची अनुभूती आहे. परंतु भक्ती या सदरातील पूजा-अर्चा, याक्रियांत त्यांच्या मागे असणारा भाव, त्यांच्या मागे असलेली श्रद्धा व आपली इच्छाशक्ती ह्या सर्व मिळून निर्माण होणाऱ्या जाणीवेस शास्त्रकारांनी, आत्मसाक्षात्कारी संतांनी **'भक्ती'** असे म्हटले आहे. सारांश काय तर, देहभावाचा विसर पडून शिवभावाने व्यापिलेली शुद्ध जाणीव म्हणजे भक्ती. आत्मारामाची, आनंदघनाशी झालेल्या ऐक्याची अवस्था म्हणजे भक्ती.

ज्ञान म्हणजे भगवंताची प्रत्यक्ष अनुभूती. आत्मा-परमात्म्याची एकरूपता. आत्म्याला आत्म्याचे होणारे दर्शन, स्पर्शन व संभाषण ही आनंदावस्था व त्या नितांत आनंदस्थितीचा प्रत्यक्ष अनुभव म्हणजे ज्ञान.

नाथराय म्हणूनच म्हणाले, "**भक्तीच्या उदरी जन्मले ज्ञान.**" भक्तीशिवाय ज्ञान नाही. जेथे भक्तिप्रेम नाही तेथे ज्ञान नाहीच नाही. भक्ती जेथे आहे तेथे ज्ञानोदय हा झालाच पाहिजे. पण नुसते शब्द-ज्ञान जेथे आहे तेथे भक्ती असतेच असे नाही; नाही नाही, बहुतेक ती नसतेच. श्री तुकोबाराय म्हणतात, "**भक्तिप्रेमसुख नेणवे आणिका। पंडिता, वाचका, ज्ञानियासी।।**" इथंच ही यादी संपली नाही, तर पुढे पहा "**आत्मनिष्ठ जरी झाले जीवनमुक्त। परिभक्तिप्रेमसुख दुर्लभ त्या।।**"

अशा पोकळ शब्दज्ञानाचा अहंकार पार मस्तकापर्यंत जाऊन भिनला म्हणजे नामावरचे प्रेम कुठले टिकणार? ते टिकतच नाही. म्हणून त्या परमप्रेमास्पद प्रेमस्वरूप भगवंताची प्रार्थना सतत करावी बघा!!! काय प्रार्थना? तर "**भक्तिप्रेमाविण ज्ञान नको देवा। अभिमान नित्य नवा तयामाजी।।**" मग काय दे? तर, "**प्रेम-सुख देई प्रेम-सुख देई। प्रेमेविण नाही समाधान।।**"

तात्पर्य, भक्तिच्या पायाशी कर्म व ज्ञान लागतात. म्हणजे नतमस्तक होतात. अशी ही नामस्मरण स्वरूपाची विलक्षण प्रेमलक्षणा भक्ती.

शुद्ध वस्तूवरील आत्यंतिक प्रेमभाव ही शुद्ध भक्ती. भगवंतासाठी प्रेम म्हणजे भक्ती. हेचि थोर भक्ती भगवंताला फार-फार आवडते. ''**आवडे तयाचे नाम घेता तयासि.**''

* * * *




भगवंताशी पूर्णत्वाने अभिन्नता, एकरूपता झाली. अशा स्थितीत मग, एकरूप झालेल्या जीवांचे स्वत:चे असे काही राहातच नाही. तो सर्वांगाने भगवंतच होतो. जशी गंगा!!! सागराला मिळाल्यावर तीचे नाव, रूप, आकार, स्वरूप, गुणधर्म वेगळे न राहता सागरच होऊन जातात.

तीच, अगदी तशीच गोष्ट श्रीगुरू आणि शिष्य यांच्या बाबतीत. जेव्हा श्रीगुरू शिष्याला शक्तिपातासहित नाम/सबीज नाम देतात तेव्हा शिष्य, शिष्य न राहता शिष्यात गुरूचा अवतार होतो, अर्थात शिष्य गुरूचेच स्वरूप, म्हणजे श्रीगुरूरूपच होतो.

हा शक्तिपात श्रीगुरू चार प्रकाराने करत असतात. १) स्पर्शाने; २) शब्दाने; ३) दृष्टीने; आणि ४) स्मरणाने.

**१) स्पर्शाने** – जसे कोंबडी आपल्या अंड्यावर बसते आणि अशा स्पर्शाने अंडे परिपक्व होऊन पिलाचा जन्म होतो. तसे श्रीगुरू ‘‘**लाऊनिया हात कुरवाळिला माथा। सांगितली चिंता न करावी।।**’’ किंवा ‘‘**माथा हात ठेविला नोहे थापटिला जैसा**’’ किंवा ‘‘**अलिंगने घडे। मोक्ष सायुज्यता जोडे।।**’’ याप्रमाणे.

**२) शब्दाने** – जसे कुरटी नावाची पक्षीण आकाशात फिरत असताना शब्द करत फिरत असते आणि अशा तिच्या आकाशातील शब्दरवाने तिची अंडी परिपक्व होतात; तसे श्रीगुरू आपल्या सत्‌शिष्याच्या हृदयाकाशात श्रुतीच्या द्वारा बोधवाक्य पेरत असतात. सत्‌शिष्याच्या शंकाचे शब्दद्वारा

निरसन करतात, जसे अर्जुन काय विचारणार हे अधीच लक्षात घेऊन, त्याने विचारायच्या आधीच सांगून मोकळे होतात, कसे म्हणाल तर बारा लेकरांची भूक आईला, त्यांना सांगावयाच्या आधीच कळते!!! होय की नाही? अगदी तसेच.

३) **दृष्टीने** – जसे मासोळी थोड्या थोड्या वेळाने स्वत: घातलेल्या अंड्यांकडे दृष्टी टाकते आणि अंडी परिपक्व होतात, किंवा कासवी आणि तिच्या पिलांची नुसती दृष्टीभेट होऊन त्या लेकरांचे पोषण होते, कारण कासवीला स्तन नाहीत. तसे श्रीगुरूंच्या नुसत्या दृष्टीक्षेपाने, की ज्या दृष्टीतून कृपामृताचाच सतत वर्षाव होत असतो. महाराजांनी वर्णन केले आहे, "**कृपाकटाक्षे न्यहाळिले।**" आणि त्याचा परिणाम काय तर, "**आपुले पदी बैसविले**" किंवा "**आपणासारिखे करिती तात्काळ। नाही काळ वेळ तयालागी।।**" श्रीगुरूज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "**हे असो दिढी जथावरि झळके। की हा पद्मकरू माथा पारूखे। तो जीवचि परि तुके। महेशेंसी।।**" ज्ञानेश्वरी अ. १०-९

आणि ४) **केवळ स्मरणाने** – येथे परत कासवीणीचेच उदाहरण आहे. जसे कासवीण वाळूत अंडी घालते, आपण स्वत: पाण्यात राहते, पण पाण्यात असतांना आपल्या अंड्यांचे निरंतर स्मरण करत असते, त्यामुळे स्मरणेमात्रेकरून अंडी उबतात, परिपक्व होतात. तीर्थयात्रा करत असताना राजस्थानात एका सरोवराच्या कडेला काही कासवीणीची अंडी पाहिली, एका कोळयानी आपल्या जाळ्यात मासे पकडत असताना, त्यात एक कासवी सापडली, व्याकुळ झाली, त्याचा परिणाम तिचे आपल्या अंड्यांचे स्मरण सुटले आणि त्याचा परिणाम म्हणजे ती अंडी विकार पावली. श्रीगुरूंच्या ठिकाणी आपल्या सत्‌शिष्याच्या परमकल्याणाविषयी असणारी तळमळ,

त्यामुळे सत्‌शिष्याचे परम कल्याण होते.

भगवंताच्या केवळ स्फुरणानेच जीवाचे परमकल्याण होते, स्मरणाने कल्याण होते. पण भगवद्‌गीतेकडे दृष्टी टाकल्यास अस लक्षात येत आपल्या की, अर्जुनाच्या ठिकाणी भगवान श्रीकृष्णांनी उपर्युक्त चारी प्रकारे शक्तिपात केला आहे. भगवान् आणि अर्जुनाचा (१) "**स्पर्शाने अलिंगीला स्वशरणु भक्तराजु ।।**" (२) संवादाच्या माध्यमातून, अर्जुनाच्या शंकांचे निरसन करून हा शब्दाने. (३) भगवान् अर्जुनाकडे अत्यंत कृपादृष्टीने पाहतात असा दृष्टीतून आणि (४) भगवंतानी नेहमीच अंत:करणापासून अर्जुनाचे परम कल्याणच चिंतीले आहे हा स्मरणानी.

सर्व जीव भगवंताचेच अंशमात्र आहेत "**ममैवांशो जीव लोके!**" आणि या नात्याने सगळे जीव भगवंताचीच अंडी/पिल्ली आहेत. जीवाने पूर्णत्वाने भगवंताला कां शरणागती केली की त्याने मोहरूपी अवरण म्हणजे अंड्याचे कवच नाहीसे होते आणि जीवाला आपल्या स्वानंदरूपाची/शिवभावाची आठवण/स्मरण होते. मग भगवंत आणि भक्त यांच्यात भेदच उरत नाही, मग उरते काय तर एकरूपता/स्वस्वरूपता.

म्हणून साधकाने, सत्‌शिष्याने, भक्ताने नेहमी "**मी भगवंताचा/श्रीगुरूंचा आहे आणि फक्त भगवंतच/श्रीगुरूच माझे आहेत**" असा बुद्धीच्याद्वारा अंत:करणात दृढनिश्चय करावा. श्रीतुकोबाराय सांगत आहेत हीच गोष्ट, "**देव माझा, मी देवाचा । हीच माझी सत्य वाचा ।।**"

भगवंताशी तर जीवाचा नित्यसंबंध आहे, जसे लाटा व पाणी, सूर्यकिरण व सूर्य, अलंकार व सोने, मृत्तिका आणि मृत्तिकापात्र, वस्त्र व तंतू तसाच जीव आणि शिव संबंधाचा निश्चय बुद्धीद्वारा होत असला तरी तो **मी** पणात स्थित असतो. स्मृती आणि विस्मृतीत **मी** कायमच असतो नां? म्हणून मी

भगवंताचाच/श्रीगुरूंचा आहे आणि भगवंतच/श्रीगुरूच केवळ माझे आहेत असा निश्चय असावा.

अशा प्रकारे मीपणा/(स्वयं) भगवंतात/श्रीगुरूत स्थित झाल्याने मन-बुद्धीही आपोआपच भगवंतात लागतात. मन-बुद्धी भगवंतात लागल्यावर, मग चित्त, अहंकार, पंचज्ञानेंद्रिये; पंचकर्मेंद्रिये ही एका आनंदघनाशीच एकवटतात हे काय वेगळे सांगावयास हवे? ही स्वानंदघनता अनुभवास येते ना? नसेल तर परिसातच दोष आहे असे होईल बघा. अशा भावात निर्विकल्प स्थिती झाल्यावर मग "**चिदानंद रूपः शिवोहं शिवोहं.**"

* * * *

# चिंतन ११३

जीवनात भावभक्तीला, भावऐश्वर्याला अतिशय मूल्य आहे. **"भावचि कारण, भावचि तारण."** ज्याचा त्याचा भावच ज्याला त्याला तारत असतो. भावबळासारखे दुसरे कोणतेच बळ नाही.

भगवंताच्या पूजाभक्तीमध्ये उपचारापेक्षा भावालाच फार-फार मूल्य आहे. आता पूजाभाव म्हणजे भगवंताची/श्रीसद्‌गुरूंची पूजाभक्ती मोठ्या अत्यादराने करणे, तसेच त्या आधीची व नंतरची सर्व सर्वतोपरी तदनुषंगिक कर्तव्यकर्मे तितक्याच श्रद्धेने करणे आणि या कर्तव्याबाबत कमालीची ओढ वाटणे, हेच पूजाभावातील मुख्य लक्षण आहे.

पूजा करणे म्हणजे हाताने यंत्राप्रमाणे काही उपचार करणे आणि मुखाने काहीतरी चर्पटपंजरी करणे नव्हे. **"भावशून्या: न फलंति पूजा"** हृदयात भावभक्तीचा उमाळा नाही, ती पूजा निष्फळ आहे. भगवंताबद्दल/श्रीगुरूंबद्दल प्रेमभाव नसेल तर तो पूजेचा केवळ अभिनय होईल; मात्र भावपूजा होणार नाही. आपल्या अंत:करणात, परमादर, भक्ती आणि आनंद ओथंबलेला, दाटलेला असावा; आपण प्रत्यक्ष आनंदघन अशा स्वानंदाभिरामाचीच पूजा/सेवा करत आहोत याची जाणीव सतत असावी. नाहीतर हाताने पूजाविधी, मुखाने स्तोत्रपठण आणि मनाने संसाराचेच चिंतन असा विपरीत प्रकार घडेल!!!

पूजेमध्ये केवळ शारीरिक क्रिया नसून भावनांच्या, भावभक्तीच्या व भावविचारांच्या दृष्टीने साधक-भक्त विशेषप्रकारे उच्च स्तरावर आरूढ

झालेला हवा. हा पूजाविधानातला अत्यंत आवश्यक असा भाग आहे. तरच ती पूजा, भगवंताबद्दल/श्रीगुरूंबद्दल वाटणाऱ्या पूज्यभावनेच्या अभिव्यक्तीशी द्योतक ठरेल. पूजा ही स-अनुराग तशीच सर्व चित्तवृत्ती एकवटून भक्तिप्रेम/प्रतिपूर्वक, स्वेच्छेने झाली पाहिजे. पूजासमयी मन-बुद्धी, भावभावना, भगवंताशी/श्रीगुरूंशी एकरूप करता आल्या पाहिजेत. "**काया वाचा आणि मने। जीवे चित्ते वित्ते प्राणे। सद्‌भावे भगवंत अर्चणे। या नाव अर्चनाभक्ति ।।**" असा श्रीसमर्थांचा पण याबाबतचा निर्वाळा आहे. पूजेमध्ये जे जे बाह्य उपचार आहेत त्यांचा उद्देश अंत:करणात एकप्रवाही भगवंताचे ध्यान सुरू व्हावे हाच आहे. "**सदा अंतरीचे ध्यान। मुख्य या नाव पूजन ।।**" अस आपले श्रीतुकोबाराय पण सांगतात.

भजन, पूजन, कीर्तन, स्मरण, श्रवण, स्तवन, तत्वचर्चा, अध्यात्मग्रंथांचा, संतवाङ्‌मयाचा अभ्यास व मनन आणि ध्यान ह्या आणि अशा सर्व गोष्टींचा समावेश "पूजा" या विधीत आहे. या सर्व गोष्टींसह जर पूजा झाली तरच ती सम्यक् आणि साधक-भक्ताची सर्वतोपरी उन्नती करणारी होते. म्हणून या वरील सर्व गोष्टी श्रद्धेने, प्रेमाने, आणि सातत्याने आचराव्यात. तरच इन्द्रिये, शरीर, वाणी, मन, बुद्धी आणि भावनांचा एक केंद्रित प्रवाह भगवंताकडेच वाहू लागेल. त्यामुळे पूजाकार्यात बाह्य आणि अंतरजीवन एका भगवंताशी/सद्‌गुरूशीच जोडले जाईल अशी सर्वांगीण पूजा प्रत्येकाने करावी; त्यासाठी साधकभक्ताच्या ठिकाणी ओढ लागावी.

आता अशा पूजेचे स्वरूप म्हणजे "**अनुराग.**" अनुराग म्हणजे उत्कट प्रेमभावाने उद्‌भवणारी व अशी हरिप्रेमसुधा सतत मिळावी, अशी सात्विक आसक्ती. व्यवहारातील आसक्तिपेक्षा हिचे स्वरूपच वेगळे. फलाशा न ठेवता भगवंताबद्दल, ह्या सच्चिदानंदाबद्दल अनिवार्य ओढ असणे, अकृत्रिम

प्रेमभावाने/प्रेमभक्तीने अखंडित आसक्ती वाटणे ही तर निर्मळ भक्तीची उच्चतर अशी एक मधुरतम अवस्था आहे. या अशा अति उत्कट भगवंत-अनुरागाच्या एकधारा प्रवाहामुळे अन्य इच्छा, वस्तूकडे धावणाऱ्या प्रवृत्तीला आळा/पायबंद बसतो. परिणामी अशी स-अनुराग भक्ती उदित झाली की त्या भक्ताकडून एक भगवंताचेच, स्मरण, चिंतन, ध्यान चालते.

सारांश ईशभक्ती अशी सानुराग असेल तरच भगवंताचा सगळा पूजाविधी यथार्थाने, सर्वभावाने, सर्वतोपरि संपन्न होईल. पूजा म्हणजेच भगवंताच्या/श्रीगुरूंच्या पूज्यभावनेची क्रियास्वरूप अभिव्यक्ती होय. म्हणूनच अशी अनुराग भक्तीने केलेली पूजा हीच सार्थ व सफल होत असते.

* * * *

# चिंतन ११४

भगवंतासाठी/देवासाठी/आत्म्यासाठी, म्हणून आत्मारामाची केली जाणारी/होणारी भक्ती हीच खरी शुद्धस्वरूपाची भक्ती.

पहिली महत्वाची गोष्ट म्हणजे, भगवंत या चराचरविश्वात भरून राहून विश्वाच्या दोषापासून अत्यंत अलिप्त आहे. या देहात पण तोच व्यापून आहे; पण तरीसुद्धा या देहाचा मळ त्याला लागलेला नाही. त्यामुळे तो परमपवित्रच आहे. त्याला विटाळ/ओवळेपणा नाही. तो विश्वंभर आहे, पण विश्वापासून वेगळा आहे. म्हणून त्याला विश्वात्तीर्ण असे म्हणतात. या चराचरातील प्रत्येक जड वस्तूला, प्राणीमात्राला अंत आहे. तो आत्माराम मात्र अनंत आहे. त्याला देश-काळ-वस्तूचे बंधन नाही. तो अनादी पुरूष आहे. त्याला अवस्थेचे बंधन नाही; तर तो अवस्थातीत आहे. म्हणून तो परमशुद्ध-परमपवित्र आहे. अपवित्र/ओवळे/विटाळ ह्या अज्ञानातील भावना आहेत. परमशुद्ध-परमपवित्र-परममंगळ अशा भगवंताला त्या कशा स्पर्श करणार? अशा शुद्धस्वरूपाशी, या आनंदस्वरूपाशी एकरूप होऊन राहणे म्हणजेच शुद्ध भक्ती.

ज्याच्यासाठी प्रत्येक प्राण्याची, विशेषत: मनुष्यमात्राची धडपड चालली आहे, ते सुख या स्वरूपाच्या शुद्धभक्तीने मिळते. त्याने ब्रह्मस्वरूपता मिळते. या शुद्ध भक्तीत देवाचा साक्षात्कार होतो. बुद्धी संशयातीत होते. अमृतरसरूपी आत्मारामाचे/ब्रह्मरसाचे भोजन मिळते. भक्त तृप्त होतो. हे कस होत व काय होत, का होत हे पूर्णपणे सांगणे शक्य नाही. काही अंशी सांगता आले तरी शब्दांनी हा अनुभव पूर्णत्वाने कळणार नाही. कारण शब्दाला एक मर्यादा आहे.

जशी साखरेची गोडी ती खाल्ल्यावरच कळणार, ''गोड साखर'' यावरचे प्रबंध वाचून ती कशी कळणार ना? फुलाच्या सुगंधाचे वर्णन करून तो सुगंध कळणार नाही. पण फुलाचा नाकाशी संबंध आला की बस्. झाले काम. अगदी सोळा आणे!!! तेथे शब्दाची गरजच/काम नाही. तसेच बिंदूस्वरूपी आत्मारामाचा, आनंदाचा ज्यांना अनुभव, त्यांनाच सिंधूची-परमात्म्याची अनुभूती येणे शक्य. सांगोवांगीचे हे कामच नव्हे. म्हणूनच समर्थ म्हणतात, ''**ही प्रत्यक्ष अनुभवाची अंगे। कळो येती संतसंगे।।**'' श्रीगुरूज्ञानोबाराय पण हरिपाठात सांगतात, ''**संताचे संगती मनोमार्ग गती। आकळावा श्रीपती येणे पंथे।।**'' अशा या शुद्धभक्तीपासून येणाऱ्या ब्रह्मस्वरूपाच्या अनुभवालाच/ब्रह्मस्वरूप/आनंदस्वरूप होण्यालाच ब्रह्मज्ञान असे म्हटले आहे. केवळ शब्दज्ञानाला नव्हे.

भक्तीप्रेमाचा आरंभच आनंदकंद आत्मारामावरील परमप्रेमापासून होतो. म्हणून श्रीगुरूंच्याकडून मिळालेल्या अक्षरस्वरूप/नाममंत्ररूपी ब्रह्मस्वरूपावर म्हणजेच आपल्याला मिळालेल्या नाममंत्रावर परमप्रेम असणे अत्यंत गरजेचे आहे. सद्गुरूंनी दिलेल्या नामात सद्गुरूंची आत्मशक्ती पूर्णत्वाने अवतरलेली असते.

नाम किती घ्यावयाचे? आपल्या देहातील प्राण व नाम एकरूप झाले पाहिजेत. त्यासाठी नामाचे, स्मरणाचे ध्यान बनले पाहिजे. नंतर त्या नामाचा ध्यास लागला पाहिजे. जसा धनलोभ्याला धनाचा, तसा नामधारकाला नामाचा. यासाठी नामस्मरण, आदराने, प्रेमाने, निष्ठेने, भावनेने, दीर्घकाळ आणि निरंतर करावयास हवे. नामस्मरणाविषयी नेहमी अतृप्तता हवी आणि या अतृप्तीतून तृप्तीचा लाभ आहे. खूप-खूप नाम घेतल तरी आता बस् अस कधी वाटता कामा नये. इतके नाम आणि नामच घ्यावे.

* * * *

# चिंतन ११५

भक्तिप्रेम अंत:करणात रूजलं, जोपासलं, वाढलं आणि मग ही भक्तिप्रेमाची वेल चिदाकाशापर्यंत वाढली की मग शब्दांतून, अक्षरांतून, इतकच काय? पण अगदी, काना, मात्रा, वेलांटीतूनसुद्धा तो निखळ-निर्मळ भक्तिप्रेमभावच फुलत असतो; बहरत असतो. मग किती ओळी, शब्द, पान ही मोजावयाची नाहीत/नसतात. हाराचे पदर, फार तर त्यातली फुलांची संख्या मोजता येईल!!! पण त्या साऱ्यात सुगंध एकच ना? तसच भक्तिभावाच!!!

सेवा करता करता देह पडावा यापरत दुजे भाग्य नाही. महानुभाव पंथाचे प्रवर्तक श्रीचक्रधर स्वामी यांच्या लोकचरित्रात जे आहे ते योग्यच आहे. गुरूमुखातील प्रत्येक गोष्ट ही अमृताते पैजा जिंकणारीच असते नाही? नाही तर अमृताला पण रसाळपणाच्या बाबतीत लाजवणारी असते.

दीर्घकाळ, निरंतर, नामस्मरणाने एकदा चित्तवृत्तीचा निरोध केला की नाम, श्रीगुरू व शिष्य एकस्वरूपच होतात. या ऐक्याची अवस्था, अनुभूती म्हणजेच भक्ती. या सर्वच्या सर्व प्रक्रियेच्या मुळात प्रेम-भाव-भक्ती आहे. या सगळ्यास मूळ आनंद. ज्याच्यापासून आपल्यास आनंद होतो त्या ठिकाणी आपला भाव स्थिर होतो. प्रत्येक प्राणी सुखासाठी/आनंदासाठी जगतो, ज्याच्यापासून त्याला सुख/आनंद वाटतो, ते त्याला आवडते. सुखाचे, आनंदाचे पर्यवसान परमशांतीत आहे. आपल्या तान्ह्या मुलाला आई अंगावरचे दूध पाजते ते आनंदासाठी, शांतीसाठी. तसा नामस्मरणात आनंद-सुख-शांती अनुभवावी. नामाचाच ध्यास सुखरूप वाटावा. नामस्मरणाने मन व बुद्धी शांत झाली की तेच नामस्मरण प्रेमाने केलेले **ध्यान**.

वरीलप्रमाणे नामस्मरण झाले की मग देहभावाचा विसर पडतो. अष्टधा प्रकृतीला आपली जाणीव रहात नाही. प्रकृतिच पुरूषाकार बनते. या अवस्थेत प्रकृतीचा तात्विक अंत होतो. देहाचा, मनाचा व बुद्धीचा विसर पडतो. मग तर मीचाच अंत होतो. आत्मशक्तीची जाग रहाते. अंतरीचा आत्मा चेतला जातो. तो आपलेच स्व-स्वरूप पाहू लागतो. तसेच ऐकू लागतो, जेऊ लागतो, आपलेच नाम आपणच उच्चारू लागतो आणि या सगळ्या क्रिया होत असताना तो आनंदस्वरूपच असतो. **"तृप्तो भवति," "मत्तो भवति," "आत्मारामो भवति,"** ध्येय, ध्याता, ध्यान/कर्म-कर्ता-क्रिया, भोग्य-भोग-भोक्ता, ज्ञेय-ज्ञाता-ज्ञान, अशी त्रिपुटीच राहात नाही. केवळ उरते आनंदघनता. हीच शुद्ध-प्रेम-भक्तीची अवस्था.

आत्मज्ञानास काळ-वेळ दोन्ही नाहीत. मग आपण फक्त नामस्मरण करत त्याच्या ध्यासात राहण्याचा, प्रयत्न करावयाचा. नामस्मरणात चित्त रममाण होऊन आनंद वाढू लागला आणि अशा वस्तुनिष्ठ आनंदात मन मुरले की शुद्धप्रेमभक्ती झाली असे निश्चितपणे समजावे. श्रीगुरूंच्या कृपाप्रसादक्षणीच अशी प्रेमलक्षणाशुद्धभक्ती होत असते.

मग हा जो क्षण आहे तो कणा-कणाने वाढवत जाणे, हेच शिष्याचे कर्तव्य/साधन आहे. भक्ती अगर ज्ञान हे कणा-कणाने, क्षणाक्षणाला मिळवावयाचे असते. आपली श्रीगुरूंच्या/भगवंताच्या ठिकाणी असलेली शरणागती शिगेला पोहोचल्याचे क्षणीच शिष्य शिष्यत्वातून मोकळा होऊन मुक्त होतो, आत्मस्वरूप बनतो.

आत्मज्ञानाच्या महानवृक्षाचे मूळ भक्तीत आहे आणि फळ ज्ञानात आहे. भक्तीप्रेमाचे खत व नामस्मरणाचे पाणी घालून हे झाड वाढवावे लागते. मग ज्ञानस्वरूप फळांतूनही भक्तिप्रेमाचाच रस गळतो. या रसाला अपूर्व स्वाद, गोडी आणि रसाळपणा असतो.

* * * *

# चिंतन ११६

भगवद्नामस्मरण साधना ही येता-जाता तर करावी, पण नामसाधन हे एक नेम करून केले पाहिजे. निष्ठा ही एक फार मोठी गोष्ट आहे. निष्ठा असल्याशिवाय कोणत्याही व्यवहारिक कामात सुद्धा यशस्वी होता येत नाही. मग परमार्थात निष्ठा किती मोलाची ना? निष्ठा अशी हवी की, ''कोणत्याही परिस्थितीत का असेना, मला माझा नेम पाळलाच पाहिजे.'' सगळ्याच बाबतीत एक नियम ठरवून घ्यावा की इतका वेळ ध्यान करीन, नाम घेईन, वाचन करीन या नियमाला कोठेही, कधी, दुय्यम स्थान येता कामा नये. आपण श्वासाला कधी दुय्यम स्थान देतो का? मग साधनेला किती अग्रक्रम द्यावयास हवा? तर श्वासाएवढाच!!!

नियमित साधना हा शारिरीक व मानसिक तसेच अध्यात्मिक विकासाचा एकमेव उपाय आहे. साधे घड्याळ, जेव्हा बरोबर चालत नाही, तेव्हा त्याला नियंत्रित करून घ्यावे लागते. मगच ते बरोबर वेळ दाखूव लागते. माणसाच्या मनाचे देखील असेच असते बघा. नाना कारणांमुळे ते अस्ताव्यस्त होऊन जाते. श्रीगुरूंच्या/साधुसंतांच्याद्वारे त्याला सतत व्यवस्थित करून घेऊन चालवावे लागते. श्रीगुरू-साधुसंत-महापुरूषांच्या प्रबोधनानुसार चालण्याचा निश्चयपूर्वक प्रयत्न केल्यास, त्याने आयुष्यात अनेक विघ्न-बाधांच्या तावडीतून सुटून पुढे जाता येते. त्यांच्या उपदेशाप्रमाणे चालले की ते ज्या परमसुखाचे अधिकारी झाले आहेत त्याच परमानंदाचे आपण स्वत:देखील अधिकारी होऊन आपले मानवी जीवन इहपरलोकी धन्य-धन्य होऊन जाते.

भगवंताच्या ठिकाणी मन जडविता आले नाही तर या दृष्य जगामध्ये चालणे फार-फार कठीण. अनेक समस्या, आघात, प्रसंग सहन करता करता अगदी प्राणांत होण्याची वेळ येते. जीव व्याकुळ होतो ना? अंतर्बाह्य रिपूंशी सदासर्वदा प्राणपणाने झुंजत राहून स्वत:चे कल्याण करणे ही काय तोंडची गोष्ट आहे? की थट्टा-मस्करीची गोष्ट आहे!! "**रात्रंदिवस आम्हा युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जग आणि मन।**" म्हणून मी सतत सांगत असतो, नामस्मरण नेमाने/कट्टाने, प्राण पणाला लावून करा आणि नामाच्या/भगवंताच्या बलानेच बलवान् व्हा.

आपले जीवन कशासाठी याचा निश्चय झाल्यावर मग त्या एका ध्येयाकडे घेऊन जाणाऱ्याच मार्गाने चालत राहील्यासच ध्येय हस्तगत होते. आपले मन चुकारपणाचा सल्ला देते, पण नेमाला महत्व आहे हे कळले की मग हा चुकारपणाचा सल्ला, सबबी (की ज्यांना फारसा अर्थ नसतो; पण आपणच त्याचा बाऊ करून साधनेला दुय्यम स्थान देतो) याच भांडवल मन करत नाही.

नदीच्या प्रवाहाप्रमाणे काळ सारखा चाललाच आहे. आयुष्य निघून जात आहे. जो क्षण एकदाचा निघून गेला तो फिरून परत यावयाचा नाही. आपला किती वेळ साधनात आणि किती साधनाशिवाय गेला याचा क्षणोक्षणी विचार करावयास हवा.

नामाने नामीशी एकरूप होऊन दाखवीन तरच खरा अशी जिद्द हवी. भगवंतासाठीच जर या आयुष्याचा वेच झाला तर तो केवढा लाभ आहे? वेच म्हणजे खर्च होऊन सुद्धा बाकी शिल्लक मोठी आहे. "**तुका म्हणे आता। लाभ नाही या परता। महालाभ फुकासाठी।**!!!" वाचेवरून नाम तुटता कामा नये. त्यात नुकसान नाहीच नाही.

मनाला ठासून सांगा मी वस्तुलाभ करून घेणारच घेणार!!! या दुनियेपेक्षा

वस्तू फार मोठी सुखरूप आनंदस्वरूप. दुःख-कष्टाच्या पलीकडे निघून जाता आले पाहिजे. नामस्मरणाने भगवत्सुखाचा अंमळ थोडासा सुगावा लागला, गोडी लागली, कळू लागली मग या नित्यानंदापुढे सर्व तुच्छ वाटू लागते. इंदूरची रबडी खाल्ल्यावर जशी चहाच्या घोटाची काय किंमत बापुडी? अगदी तसेच. परमात्मसुख-साक्षात्कारसुख अनंत आहे; अमर्यात आहे. "**देशे काळे वेदानुवादा। ज्या सुखाची न करवे मर्यादा। त्या महासुखाची सुखसंपदा। मद्‌भक्त सदा भोगती।।**" अशी सर्वेसर्वा, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, सर्वसुखरूप अशा भगवंताची नामधारकांना ग्वाही आहे. आपण त्याच्या विश्वासाचा घात करता कामा नये.

* * * *




आपला कन्हैय्या, कान्हा, कृष्ण, आकर्षून घेणारा असा आकर्षक श्रीकृष्ण, मोहून टाकणारा-मनमोहक कृष्ण. नंद-यशोदा धन्य झाले. अवघ गोकुळ भरून पावल होत. का ??? तर त्यांना निकोप, निर्भेळ, निरपेक्ष भक्तिप्रेमासाठीच प्रेमभक्ती करणारा, भक्तिप्रेमसखा मिळाला म्हणून.

हा गोपपुत्र देहाच्या-मनाच्या दोन्हीही सौंदर्यानी अवघ्यांना मोहून टाकणारा, आकर्षून घेणारा. यापूर्वी कुणीच केला नाही असा एक नवाच योग ह्याने निर्माण केला **भक्तिप्रेमयोग** नावाचा !!! आपल्या सर्वांनाच तो निकोप प्रेमाचा अविस्मरणीय असा लळा लावतो, लावला आहे त्याने. भक्तिप्रेमाची दिव्य दीक्षाच तो देत असतो.

कृष्णाने आपल्या दिव्य जीवनात, त्याला समजलेल्या स्त्रीत्वाचा सत्यार्थ प्रत्यक्ष आचरून दाखवीला. माता, महामाता, पत्नी, कन्या, नात, स्नुषा, आत्या, भगिनी, काकी, मामी, मावशी, सेविका आणि सखी अशा सर्वच जिव्हाळ्यांच्या नात्यातील एक उन्नत-विकसीत सुंदर अर्थ त्याने विशद केला. इतकच नाही तर भेटणाऱ्या प्रत्येक स्त्रीला त्यान एक शाश्वत निसर्गतत्त्व म्हणून गौरवल.

कृष्ण सर्वार्थान विभूतीपुरुष आहे, महान पूर्णपुरुष आहे. तो एकच योगयोगेश्वर आहे. आपल्या देवत्त्वाच्या सर्व कल्पना नि:शंकपणे याच्या पायी अर्पून मोकळ व्हाव. कारण हा पूर्णत: अनासक्त आहे. याचा स्थायीभाव भक्तिप्रेमयोग आहे.

कृष्ण, गोपाल, गोविंद, दामोदर, मुरलीधर, मोहन, मिलिंद, माधव, मुरारी, मुकुंद, मधुसूदन, शाम अशा नावांनी शोभला-शोभतो. वासुदेव हाच आणि अच्युत असा अत्युच्च हाच द्वारकाधीश म्हणूनपण शोभला आणि आपल्याच कुळाचे डोळ्यादेखत विसर्जन घडवून आणणारा, कमलदलासारखा निरामय, निर्लेप हाच.

याला मनापासून प्रिय गोष्टी तरी किती साध्या-साध्या !!! शरदातील पहाटेच अंगावर दहिवरलेल प्रपकाच फूल, हे फुलात अत्यंत प्रिय, फळात आम्रफळ - त्यातही झाडाच्या टोकावरच झाडावरच पिकू घातलेल शेंदरी वर्णाच, पक्ष्यात मृगसरीच्या धुंद नादान आपला डेरेदार पिसारा फुलवून नाचणारा पिसारा, श्रीमंत, रंगवैभवी मोर. रसात गोरस आणि भोजनात दह्यात कालवलेला, मीठाची चिमूट घातलेला, गुरगुट्या मऊ-मऊ भात आणि या सर्व आवडीचा शिखामणी ''प्रेमभक्ती.''

त्याची मुरली तर त्याला अतिप्रिय. मुरलीरव तर सर्वच गोकुळवासीयांना प्रिय. राधा म्हणावयाची, ''किती सैरभैर करतोस रे ही मुरली वाजवून कन्हैय्या!!!'' अस म्हणत कृष्णाच्या कपोलावरून तळहात फिरवून आपल्या कानशीलावर कडाकड बोट मोडत त्याची इडापीडाही घ्यावयाची. तिच्या भावस्पर्शात निरागस भक्तिप्रेमभाव, जो शब्दात पकडता येत नाही आणि म्हणूनच तो सांगता तर कधी येणारच नाही.

राधा म्हणावयाची, ''कृष्णा, तुझी मुरली ऐकली की वाटत कन्हैय्या, आपणसुद्धा मुरलीच व्हाव.'' राधा ही लौकिकात कृष्णापेक्षा वयाने कितीतरी मोठी. भगवंताची गोपदीक्षा झाली, त्याच दिवशी राधा त्याला प्रथम भेटली. भक्तीशास्त्रकार म्हणतात, राधेनसुद्धा कृष्णाला एक दीक्षाच दिली. कशाची? तर सर्व नात्यांच्या पलीकडे जाऊन स्त्री म्हणजे काय भव्य-दिव्य-उदात्त-उन्नत

भक्तिप्रेमतत्त्व आहे याची.

कृष्णाच्या मुकुटात सदैव शोभणारं मोरपीस; ते आहे एका निरामय शाश्वताचं अतिशय अनुरुप अस नाजूक प्रतीक. राधेन खोवलेल, समस्त स्त्रीत्त्वाच्या निर्माणशील अशा परमपवित्र अवयवाच मंगल चिन्ह. कृष्णान ते पूर्ण विचाराअंती, जाणीवपूर्वक, स्वच्छपणे आपल्या मस्तकी धारण केल.

खरच, राधा ही श्रीकृष्णाच्या योगीजीवनातील पहिलीच ''**स्त्री**'' गुरु. स्त्रीत्त्वाच्या सर्व भावविभावांची व कलांची दीक्षा देणारी, तीही अबोध. कधी खूप बोलून; तर कधी शब्दही न बोलता मूकपणे. राधा-राधिका कृष्णजीवनांतील एक अजोड जोड !!! वासनारहित, भावभरित, अतुल अशा भक्तिप्रेमयोगाची प्रत्यक्ष श्रीगुरुमूर्तीच. म्हणून तर राधेऽऽऽकृष्ण, राधेऽऽऽगोविंद गोविंद राधेऽऽऽऽगोविंद.

* * * *




श्रीरूक्मिणीपांडूरंगाच्या कृपाप्रसादाने, आणि श्रीगुरूंच्या बळावर निर्भर असल्यानेच प्रकृती म्हणावी तशी साथ देत नसतांनाही श्रीतुकोबारायांची गाथा म्हणजे एक "**उपनिषद्तुल्य**" असेच "**श्री तुकोपनिषद्**" यांचा वाङ्‌यज्ञ होत आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज, नामदेवराय, एकनाथ महाराज, तुकोबा आणि समर्थांसारखे सगळेच संतांचे आत्मानुभवाच्या अमृताने ओतंचप्रोतंच भरलेले, रसाळ, आत्मप्रत्ययकारी, विदग्धरसवृत्तीने नटलेले कल्याणकारी साहित्य पाहिले की, मन, बुद्धी, अती विस्मयाने थक्कच होऊन जाते. भाविकांना दिलासा देणारे, पंडितांच्या पगडीच्या झुरमुळ्यांनापण डोळे आणणारे, अक्षरशत्रू अशा अडाण्यालापण गोडी लावणारे आणि उपनिषद् प्रणित, अध्यात्मज्ञानातील प्रमेये अगदी सरळ, साध्या, सोप्या रितीने उलगडून सांगणारे असे हे संतसाहित्य, म्हणजे महाराष्ट्र सारस्वताच्या अफाट मौल्यवान खजिन्यातील पृथ्वीमोलाची नवरत्नेच आहेत.

गुरूवर्यांच्या संगतीत तर बराच दीर्घकाळ या ग्रंथातील प्रासादिकता, प्रतिभा, तरल, तरलस्पर्शी अशी आत्मानुभवाचा तितकाच हृदयस्पर्शी अविष्कार यांचा रसास्वाद खूपच सेवन करता आला.

मात्र श्रीगुरूंच्या निर्याणानंतरच आज पस्तीस वर्षे हे सारेच्या सारे संतवाङ्मय आणि श्रीगुरूराजज्ञानेश्वरमहाराजांची संजीवनसमाधी आणि यास साक्षी ठेऊन मिळालेले सबीज नाम, हाच जीवनाधार राहिला.

परम-प्रेमस्वरूप, परमप्रेमास्पद, प्रियाची परमसीमा असणारा आत्मारामच,

भक्ताच्या परमप्रेमभावामुळे, सगुण-साकार, परमप्रेममाधुऱ्याने मुसमुसलेल्या श्रीहरीच्या स्वरूपात प्रकट होतो. अशा प्रेमाचा पुतळा असणाऱ्या भगवंताचे नामसुद्धा तितकेच मधुर; गोड; अमृताहीपेक्षा गोड. त्याचे नाम गोड, त्याचे रूप गोड, आणि असा गोडाहून गोड असणारा भगवंत भक्ताला गोड असा, कधी न मिळणारा भक्तिप्रेमसुखाचाच खाऊ देत असतो.

परमात्मस्वरूपाचे वर्णन सच्चिदानंद अशा पदाच्या श्रुतीमातेने केले आहे; सत्, चित् आणि आनंद अशा तीन पदांचे एकीकरण म्हणजे सच्चिदानंद; पण वरील तीन्ही पदे, असत्, जड व दुःख ही अज्ञानी लोकांच्या खोट्या/मिथ्या प्रत्ययाच्या अपेक्षेने आलेली आहेत; एवढच काय पण अज्ञानसापेक्ष ज्ञानदशेत ती वेगवेगळ्या तीन प्रकारे प्रत्ययाला येतात. त्यांचा भिन्न-भिन्नपणाने येणारा प्रत्यय नाहीसा होऊन निर्विकल्प/निखळ असा आनंद म्हणजेच भक्तिप्रेमसुख प्राप्त होण्याकरिता या त्रयीची आटणी होऊन एकपद झाले पाहिजे व याच बरोबर या एकपदाचा म्हणजे भगवंताचा अनुभव घेणारा भक्त पण भगवंतापेक्षा/श्रीगुरूहून वेगळा न राहता, अनन्य झाला पाहिजे, एकरूप झाला पाहिजे. गोपाळकृष्णाच्या सवंगड्यांची त्याला हीच प्रार्थना आहे, "**मी-तू पण जाऊ दे दूरी। एकचि घोंगडे पांघरू हरि।।**"

असा हा तीनपणा, दोनपणा हा आनंदात म्हणजेच भक्तिप्रेमातच नाहीसा होतो असा श्रीज्ञानोबारायांचा निर्वाळा आहे.

जसा कापूर हा पदार्थ इंद्रियवृत्तीने पाहिला असताना, शुभ्रता, मृदूता आणि सुगंध या वेगवेगळ्या तीन धर्माने भासतो; पण धर्माचे धर्मीच्या ठिकाणी असणाऱ्या तादात्म्याने सगुण झालेला तोच पदार्थ, चित्ताच्या ठायी तीनपणाने न प्रत्ययाला येता, एकाच वस्तुत्वाने अनुभवास येतो. तसाच श्रीहरिसुद्धा एका आनंदरूपानेच भासतो. म्हणजे सत्-चित् आणि आनंद यांचे एकीकरण केवळ

आनंदाच्याच ठिकाणी होते. "**आनंदाचे डोही आनंद तरंग। आनंदचि अंग आनंदाचे ।।**"

नाथराय म्हणतात, "**सत्पद ते ब्रह्म, चित्पद ते माया। आनंदपदी जया म्हणती हरि ।।**" म्हणजे श्रीहरि हा आनंदस्वरूपानेच अनुभवास येतो. या आनंदस्वरूप श्रीहरीशी/सगुण श्रीहरीशी जोपर्यंत अखंडएकरसता प्राप्त होत नाही तोपर्यंत खरी प्रेमस्वरूप भक्ती नाही.

अत्यंत निरपेक्ष स्वयंसिद्ध अवस्था प्रेमलक्षणापूर्वक नामस्मरण भक्तीनेच प्राप्त होते. म्हणजेच सगुण-साकार अशा श्रीहरीची सगुणभक्ती ही अत्यंत निरपेक्ष स्वयंसिद्ध सहजावस्थाच आहे.

परमप्रेमभक्तीस्वरूपाने तो श्रीहरीच जीवात व्यापून आहे. अशी श्रीहरीची अनुभूती भक्तिप्रेमातून साध्यच होत नाही. म्हणून नारदासारखे भक्ताचार्य त्रिवार सांगातात, "**भक्तिरेव गरियसी, भक्तिरेव गरियसी, भक्तिरेव गरियसी ।।**" म्हणून भक्तिप्रेमभावानी नामस्मरण करावयाचे.

* * * *



# चिंतन ११९

भगवत्पूजेत काय किंवा कोणत्याही प्रकारच्या भगवत्सेवेत बाह्य आणि अंतरजीवन हे एका भगवंताशी/श्रीगुरूंशी सर्वभावे जोडले जाते. विशेषत: पूजा ही परमेश्वराबद्दल वाटणाऱ्या परमपूज्यभावनेच्या अभिव्यक्तीची द्योतक आहे. अशी भगवंताची/श्रीगुरूंची पूजा स-अनुराग, तथा सर्व चित्तवृत्ती एकवटून भक्तीप्रेमपूर्वक स्वेच्छेने करावयाची. पूजेमध्ये जे सगळे बाह्य षोडशोपचार आहेत, त्यांचा उद्देश, आपल्या अंत:करणात एकप्रवाही श्रीहरीगुरूंचे ध्यान सुरू व्हावे असाच आहे. श्रीतुकोबाराय म्हणतात, ‘‘**अंतरीचे ध्यान। मुख्य, या नाव पूजन।।**’’

आपले आराध्य दैवत/श्रीगुरू हे प्रत्यक्ष आपल्या पुढ्यात पूजा-सेवा करून घेण्यासाठी, आपण केलेल्या प्रार्थनेला मान देऊन आले आहेत अशी भावना दृढ करूनच मग पूजेस प्रारंभ करावा. देव म्हणजे धातू-पाषाणाची प्रतिमा नव्हे; तर प्रत्यक्ष पांडूरंगच/श्रीगुरूच पूर्ण चैतन्य स्वरूपात आपल्यासमोर प्रत्यक्ष प्रकट झाले आहेत अशी दिव्य भावना असावी.

यामुळे काय होते? तर अशा सांगोपांग भावपूजेमुळे अनेक विचारांनी, अनेक दिशांना भटकणारे मन काही काळ तरी निश्चितपणे स्थिर होते; एकाग्र होते आणि पवित्र भक्तीप्रेमभावनांनी आनंदाने बहरते; हा आनंद बराच काळ टिकतो.

या पूजासेवेमध्ये मनावर कोणतेही दडपण न आणता, इंद्रिये-मन-बुद्धीचे स्वाभाविक व्यापार बंद न करता, आपली सर्व इंद्रिये व देहसंस्था उत्कट,

उल्हासित, अशी भक्तिप्रेमभावाने भगवंताच्या/श्रीगुरूंच्या उपासनेत गुंतविली जातात. या सेवेनंतर देव/आपले श्रीगुरू आता यापुढे आपल्या हृदयस्वरूप पर्यंकावर निवास/आराम करणार आहेत अशी भावना मनाशी घट्ट करावयाची. खरोखरी पूजा म्हणजे पूजक/अर्चक आणि पूजनीय भगवंत यांची एकरसता साधणारी सुलभ साधना आहे. समर्थ सांगतात **"विश्वेश्वर चिद्घन। मूर्तीमाजी आवाहन। पूजांती करूनि विसर्जन। देव/श्रीगुरू जाण हृदयी ठेवावा।।"**

अशी प्रत्यक्ष उपचारांच्या द्वारा सगुण-साकाराची स्थूल पूजा जमली आणि अंत:करणात खरीखुरी भगवद्भावना, भक्तिप्रेम, आणि ईश्वरनिष्ठा जागृत झाली की मग मुळी, मानसपूजेकडे वळावे. या मानसपूजेत अनेक लाभ होतात. सर्व स्थूल उपचार नेहमीच हाताशी असतात आणि त्याचबरोबर ते सर्वांना परवडतात असे नाही; पण या मानसपूजेत मात्र केशर, कस्तुरी, अत्यंत अप्राप्य असे गोरोजन अशा अत मौल्यवान वस्तू आणि सर्वात अत्युत्कृष्ट अशी सर्व प्रकारची फुले, फळे, पत्री, सुवर्णरत्नजडित अलंकार अर्पण करावयास काहीच अडचण येत नाही. सर्व प्रकारची कित्येक उंची, रूचकर, स्वादिष्ट पक्वान्ने, शाक-भाज्या यांचा नैवेद्य अर्पण करता येतो, बहुमोलाची वस्त्रे नेसवता येतात. सर्व उपचार कसे यथासांग करता येतात. अशी मानसपूजा सरस तर आहेच, तसेच ती कोठेही, अगदी प्रवासात असतांनासुद्धा करता येते!!! होय की नाही?

मात्र मन हे चंचल असल्याकारणाने ते या मानसपूजेत जसे चटकन् रमते, रंगते, तितक्याच त्वरेने ते निसटून जाऊन अन्यत्र जाईल. म्हणून या मानसपूजेत मनाची बैठक फार महत्वाची. एकदा ती साधली ना की बस्. कामच झाले.

पहाटेचा ब्राह्ममुहूर्त जसा नामस्मरणास उत्तम तसाच या मानसपूजेसाठीपण

चांगला. या मानस पूजेमुळे मनाची चंचलता मोडते, दुसरा महत्वाचा लाभ म्हणजे आपल्या समोर प्रत्यक्षत: स्थूल स्वरूपात आपले आराध्यदैवत/श्रीगुरू नसतानाही त्यांचे स्वरूपाचे-सगुणाचे ध्यान-चिंतन करण्याची आपल्या मनाला सवय लागते; हा मानसपूजेचा मोठाच लाभ आहे.

ह्यासाठी अनुराग हवा. अनुराग म्हणजे उत्कट प्रेमलक्षणाभक्तीने उद्‌भवणारी व ही हरिप्रेमसुधा सतत मिळावी अशी सात्विक आसक्ती!!! व्यवहारात आसक्ती हा दोष नाही तर महादोष. पण फलाशा न ठेवता, भगवंताबद्दल अनिवार्य ओढ असणे ही तर निर्मळ, निश्चल, भक्तीचीच एक उच्च-उच्चतर अवस्था.

सारांश काय तर अशी अनुराग भक्ती उदित झाली की मग भगवंताचेच स्मरण, ध्यान, चिंतन, पूजन, सेवन चालते. अशी सेवा ही मुळी आमरण चालणारी, उत्तरोत्तर विकसित होणारी एक अखंड प्रक्रियाच आहे.

* * * *




जन्म देणाऱ्या माऊलीचे आपल्या सर्व अपत्यांच्यावर निर्व्याज प्रेम असतेच; ती कितीही मोठी झाली तरी सुद्धा मातेला लहानच असतात. हे अगदी स्वाभाविक आहे ना? अस मुलांवर प्रेम असण (सगळ्या लेकरांवर) आणि त्यातल्या एखाद्याकडे जास्त 'ओढा असण' ह्यात एक सूक्ष्म फरक आहे आणि असा हा फरक असण हे अगदी नैसर्गिकच आहे.

जो मुलगा अथवा मुलगी आपल्या आईच्या आवडीनुसार वागतात, आईचे मनोगत न सांगता ओळखतात, आपल्या वागण्या-चालण्या-बोलण्याने आपल्या आईची थोरवी वाढवतात, त्या आपत्यावर जन्मदात्रीचे अधिक प्रेम असते, ते सहजच अधिक लाडके असते. अगदी त्याचप्रमाणे श्रीगुरूंचे आपल्या सगळ्या अनुग्रहीतांवर प्रेम असले तरी जो शिष्य एकाग्र चित्ताने आणि अत्यंत दृढश्रद्धापूर्वक, मोठ्या निष्ठेने, अव्यभिचारी भक्तीने, श्रीगुरू उपदिष्टित नामसाधना उत्साहाने, आवडीने, सातत्याने करत असतो, अधिकाधिक प्रेमाने, आनंदाने करत असतो, अशा शिष्याकडे श्रीगुरूंचा जास्त ओढा असतो.

सर्वतोप्रकारच्या लघुत्वासकट गुरूत्वालाही मिळून राहिलेला तो श्रीगुरू. म्हणजेच सर्वांचा आत्माराम. अशा सच्चिदानंदघन आत्मस्वरूपाचे अखंड अनुसंधान राखण्याचाच अभ्यास म्हणजे श्रीगुरूसेवा.

ज्या देहात आत्मस्वरूप झळझळीत स्वरूपात लखलखल असत व ज्या देहाच्या/हृदयाच्या गाभाऱ्यातून वाणीच्या द्वारा आपल्याला सप्रेम-साशीर्वाद

आत्मबोध झाला-सबीज नाम मिळाले, अशी श्रीगुरूकाया म्हणजे सुद्धा चैतन्याचाच गाभा. आणि म्हणूनच श्रीगुरूंची कायिक सेवा ही श्रीहरीचीच सेवा. कारण त्यात देहभावाला थाराच नसतो.

श्रीगुरूंचा अनुग्रह म्हणजे श्रीगुरूंच्या निर्निमित्त, निरामय, सच्चिदानंदस्वरूप अशा अनुभवात, अत्यंत निष्काम प्रेम-भक्ती-भावाने, हक्काने वाटेकरी होणे. हीच अनुग्रह या शब्दाच्या मागची फार मार्मिक, गुरूउपासनेतल वर्म उकलून दाखवणारी अत्यंत हृद्य, गोड संकल्पना आहे.

कबीरसाहेब म्हणतात, "**माल मुल्क हरि देता है। हरिजन हरि को ही देत।।**" स्थावर-जंगम संपत्ती भगवंताच्या कृपेने मिळते; परंतु हरिरूप असे श्रीगुरू खुद्द श्रीहरिलाच आपल्या शिष्याच्या पदरात टाकतात.

श्रीगुरू शिष्याच्याच हृदयमंदिरात अंत:करणाच्या सिंहासनावर विराजमान असतात. आपले ज्ञानोबाराय काय सांगातात बघा नां!!! "**आतां हृदय हे आपुले। चैफाळूनिया भले। वरी बैसऊ पाऊले। श्रीगुरूंची।।**" ह्या श्रीगुरूस्मृतिमंदिराला ना पाया खणावा लागत, ना भूमिपूजन, उद्‌घाटन नको, वास्तुशांत नको, अहंकार, अज्ञान, हवेपणा यांची माती, नामस्मरणस्वरूपी कुदळ-फावड्याने दूर केली की बस्. शिष्याचे हेच काम-स्मरणाची धार ह्या चरणकमळांवर अखंड धरावयाची-हाच अभिषेक. अष्टसात्विकभावाचे अष्टगंध. सद्‌भावाचे/सद्‌वासनेचे वस्त्र. नवविध भक्तींचे नवकमळ, अहंकाराचा धूप आणि सोऽहं बोधाचा दीप. निष्काम-निरामय, निरलस, निर्व्याज भक्तिप्रेमाचा नैवेद्य आणि परमस्नेहभावाची पुष्पांजली.

श्रीगुरू आईपेक्षा, काय देवापेक्षाही दयाळू-मायाळू. केवळ दयेचा-कृपेचा आनंदाचा सागरच. देव आणि श्रीगुरू दोघे एकाचवेळी एकदम पुढ्यात ठाकले तर, "**धरावे ते पाय आधी-आधी**" पण कोणाचे? तर श्रीगुरूंचे. तेच

आपल्याला अनंताची-स्वरूपाची आनंदाची/स्वानंदाची ओळख करून देतातना म्हणून !!!

पूर्वजन्मीच्या सुकृतानुसार, ते पुण्यफळाला आले म्हणजे, श्रीगुरू आपणहून, आपल्या पायांनी, आपल्या घरी चालत येतात आणि अध्यात्माची आवड, तळमळ असणाऱ्या साधकाला, आपणहून अनुग्रहीत करतात. हा कार्यकारण भाव त्या जगनियंत्या, सर्वज्ञ-सर्वे-सर्वा परमात्म्याचीच योजनापूर्वक लीलाच असते. त्याच्याच संकेताने गुरू-शिष्याची गाठ घातली जाते. स्वानंद-स्वरूपी.

* * * *




सबीजनाम मिळालेला नामधारक आणि सबीजनाम देणारे श्रीगुरू या दोघांच्या अंत:करणात नामरूपी शक्ती एकच असते. आपली अध्यात्मशक्ती त्या नामात घालून, मग श्रीगुरू अनुग्रहीताच्या अंत:करणात नामाचे बीज पेरतात. प्रत्येकाच्या नामातील शक्ती एकच असते. ज्या दिवशी, ज्या क्षणी श्रीगुरूंनी नाम दिले त्याच क्षणापासून, अनुग्रहीत हळूहळू ब्रह्मस्वरूप बनू लागतो. जसे बी शेतात पेरल्यापासूनच फूल/फळ/दाणा/कणीस तयार होऊ लागलेले असते.

नाथ महाराज म्हणतात, **''डोळ्यांनी सत्य गुरूची खूण। आपले स्वरूप घ्या ओळखून।।''** यात नाथांनी डोळ्यांना दिसणाऱ्या वस्तूचा उल्लेख केला आहे असेच वाटण्याची दाट शक्यता आहे. परंतु एवढा केवळ शब्दश: मर्यादित अर्थ त्यात नाही. रूप, रस, नाद, गंध व स्पर्श अशा भगवंताच्या सर्व प्रकारच्या खुणांचा त्यात समावेश आहे. येथे डोळे म्हणजे बाहेरचे दृष्य जगत् पाहण्यासाठी आपण ज्या डोळ्यांचा उपयोग करतो ते डोळे संतांना, शास्त्राला अभिप्रेत नाहीत. तर स्वरूप अनुभवण्याच्या दिव्य शक्तीला अर्थात दृष्टी, श्रवण, स्वाद, वास घेण्याला लागणाऱ्या शक्तीला डोळे असे म्हटले आहे. डोळ्यांनी आपण पाहात नाही. पाहणारा वेगळाच!!! तीच तऱ्हा सर्व इंद्रियांची आहे. आत जर तो एक नसेल तर या इंद्रियांचा काहीच उपयोग नाही. सर्व इंद्रियांच्यामधून वेगवेगळे काम करणारी शक्ती एकच आहे. त्यालाच आत्मशक्ती अस म्हणतात. हा आत्माराम शक्तीरूपाने सर्व देहात/

चराचरात व्यापून आहे. त्याचे नेत्र शरीराच्या रोमारामात आहेत. डोळे बंद केले तरी आपल्याला आत्मवस्तूचे स्वरूप पाहाता येते. तोच पाहतो. त्यालाच पाहतो.

अशी अशा स्वरूपाची खूण, नामधारकाला हळू-हळू येऊ लागली की मग आपल्या जीवनाविषयी, आपल्या दृष्य लौकिक संसाराबद्दल तक्रार करायला वावच उरत नाही. माझ वाईट झाल, मला दु:ख झाल, असे म्हणण्याचे कारणच मुळात उरत नाही. श्रीगुरूंनी दाखवलेली निजखूण सत्य आहे, हे कळल्याने चित्स्वरूपाची जाणीव होते. आता जे सत् आहे तेच चित् आहे व जे सत्-चित् आहे तेच आनंदस्वरूप आहे. असा निखळ आनंदच अनुभवास येऊ लागल्यावर असत्-जड-दु:ख याचा विचारच राहात नाही आणि म्हणूनच मग चित्तातपण दु:खाचा अंश उरत नाही. आनंद आणि दु:ख मुळी तम:प्रकाशवत् आहेत. "**आठव तो ब्रह्म, नाठव तो भवभ्रम**" या श्रीगुरूदेवांच्या म्हणण्याचा अर्थ तोच आहे. जेवढा वेळ नामस्मरणात तो आनंदकाळ; नामाचा विसर तो भ्रमाचा काळ. भ्रम तेथे दु:खच ना!!!

आत्माराम सत्-चित्-आनंद आहे. आत्मस्वरूप आपल्यापेक्षा वेगळे नाही. आत्माराम/भगवंत हा काळातीत आहे व स्थळातीत पण आहे. तो आनंदघनराम आहे. म्हणून त्याचा अनुभव पुन:पुन: सातत्याने घेतला तरी परत-परत वारंवार, इतकच नाही तर अखंड घ्यावा अशी इच्छा होते. श्रीगुरूज्ञानोबाराय सारखे आत्मतृप्त म्हणतात "**तो मज व्हावा, तो मज व्हावा। वेळोवेळा व्हावा पांडूरंग।।**"

आपल्याला भगवंत दिसत नाही असे म्हणत असताना, आपण दिवसातून किती काळ, किती वेळ नाम विसरलो, किती वेळा आपण जीवभावात असतो याचा बारकाव्याने विचार करावा. अशाही अवस्थेत/दुरावस्थेत आपल्याला

पुन: नामाची आठवण होते ही नामाचीच/भगवंताचीच कृपा. या त्याच्या कृपेचाच उपयोग करून आपल्याला नामाचा विसर पडणार नाही, आणि आपण जास्तीत जास्त शिवभावात कसे राहू हाच अभ्यास अनुग्रहीतांनी करावयाचा आहे. अशा अभ्यासाला, भगवंताची कृपा, श्रीगुरूंचे पाठबळ आहेच.

सगुणाचा उगमच नाम आहे. रूपाचा उगम नामच आहे. ‘‘**नाम आठविता रूपी प्रगट पै झाला**’’ अशी श्रीज्ञानेश्वरमाऊलींची साक्ष आहे. रूपी प्रगट झालेला क्षण न् क्षण सोनियाचा आणि अमृताने न्हालेला. मग आपण किती नामस्मरण करावयास हवे नाही का? जर पांडूरंग वारंवार दिसावा/अनुभवावा असे वाटत असेल तर?

* * * *

# चिंतन १२२

माणूस जेवला असता तो तृप्त झाला की नाही हे त्याच्या ढेकर देण्यावरून कळते. आपणाला मग सहजच कळते की हा बाबा यथेच्छ, अगदी तृप्त होईपर्यंत जेवला आहे. वास्तविक ढेकर द्यावीच अशी प्रत्येक जेवणाऱ्या माणसाची इच्छा असतेच असे काही नाही; परंतु जेवण अगदी पोटभर झाले, बरवे झाले, निगुतीने झाले की ढेकरा येतातच. अर्थात ते तृप्तीचे, समाधानाचे एक पारदर्शक असे द्योतकच आहे. आपले ज्ञानराज काय म्हणतात, **''धाल्याचे ढेकर निघती होतां सुख। तेवीचि आत्मिक जाणिजेतु।।''** तुकाराम महाराज पण म्हणतात, **''ढेकरे जेवण दिसतसे साचे.''**

ज्याप्रमाणे पोट भरल्यावर ''तृप्ती'' ढेकररूपाने बाहेर पडते, त्याचप्रमाणे माणसाला निरतिशय, सुखाचा लाभ झाला म्हणजे तो असाच तृप्तिढेकरांनी सहजच त्याच्या मुखातून बाहेर पडतो.

जशी पक्व दशेला आलेली, म्हणजेच पूर्ण उमललेली कमळाची कळी ही आपल्या आत असलेल्या सुवासास दाबून ठेवू शकत नाही, तर तो सुवास जसा अगदी सहजच बाहेरच पडत असतो, त्याप्रमाणे सुखउर्मीसुद्धा दाबून ठेवता येत नाही; कोणाजवळ तरी (एकच आवड असलेल्याजवळ तर विशेषत्वाने) तिचा अनुवाद करावा असे वाटतेच. विशेषत: अंत:करणात एक आवड असेल तर. एकरूपता असेल, जिव्हाळा असेल तर त्या आनंदनिवेदनाला उधाणच येते.

ज्ञानोबारायांनी भगवंताचे स्वरूप पाहिले आणि ते पाहताच त्यांना इतका

काही सर्वसुखाचा उमाळा आला की तो त्यांच्या हृदयात मावेना. अमर्याद अशी सुखरूपता त्यांना प्राप्त झाली आणि मग आपल्या जिवलग मैत्रीणीला ते तो सर्वसुखसोहळा-भगवत्‌दर्शनानंदाचा अगदी इत्थंभूत सांगू लागले आणि म्हणतात कसे, "**रूप पाहतां लोचनी। सुख झालें वो साजणी।।**"

आता वास्तविक हा सुखानुभव सांगता येण्यासारखा नाही. पण सांगतात. एरव्ही "**ते सुख काय सांगो वाचे बोलतां नये। आर्तीचेनी गुणे गेले मीपण वाचे।।**" अस तेच म्हणतात.

पण तरी सांगितलेच. आता ज्या साजणीस/म्हणजे मैत्रिणीस सांगितले अशी ही साजणी कोण??? कोण ही भाग्यवान मैत्रीण??? आता ही साजणी/सखी दुसरी तीसरी कोणी हाडामांसाची मैत्रीण नाही तर अत्यंत निर्मळ अशी "बुद्धी" हीच श्रीज्ञानेश्वरमहाराजांची जिव्हाळ्याची सखी; की जेथे काही न लपवता सगळेच्या सगळे, जसेच्या तसे सांगता येते. काहीही न लपवता, हातचे न राखता बर.

"**राजस सुकुमार मदनाचा पुतळा**" असा बरवा विठ्ठल. बरवा म्हणजे नितान्त सुंदर. किती सुंदर म्हणून सांगावा? तर "**रविशशिकला लोपलिया**" इतका आणि एकाच चंद्राची काय कथा? काय किंमत? तर "**तुझिये निढळी कोटि चंद्र प्रकाशे। असे सावळे परब्रह्म आवडे या जीवा।**" का तर तो सर्व सुखाचे आगर. "**नामा म्हणे सर्व सुखाचा आराम। धामा परम धाम विटेवरी।।**"

त्याला पाहिला आणि "**भाग गेला शीण गेला। अवघा झाला आनंद.**" त्याला पाहा, सातत्याने पाहा, तो आनंदकंद, त्याला पाहणारा पण आनंदस्वरूप होऊन राहातो.

* * * *

# चिंतन १२३

आपले श्रीगुरूज्ञानेश्वरमहाराज हे अलंकापुरीचे राजे असून ज्ञानियांचे राजे, साधकांचे मायबाप, महायोगी, संजीवन समाधीचे अनभिषिक्त सम्राट आणि आनंदसाम्राज्याचे सार्वभौम चक्रवर्ती आहेत. कृपेची साक्षात मूर्तिच आहेत. तेच आपले मायबाप, स्वामी, बंधू, सोयरे, सज्जन, सुखसागर असून आपल्या तापत्रयाचे निवारण करतात आणि आपला सांभाळपण करतात बर!!!

मूळ ब्रह्म हे अनिर्वाच्य, निर्गुण-निराकार, निरवयव, रूप-रंग-विरहित आहे. तेच ब्रह्म श्रीगुरूस्वरूपात प्रगटते, भेटते. त्याच्याविषयी वर्णन-गुणगान करतांना वाणी मौनावते. पण हे ब्रह्मस्वरूप आपलीच अत्यंत निर्मळ अंत:करणवृत्ती स्वत:च स्वत:च्या ठिकाणी अभेद बोधाने, अद्वैतअनुभवाने जाणते.

व्यवहारातही आपण वृत्तीच्या सहाय्यानेच वस्तू जाणतो. वृत्ती मर्यादित असते; त्यामुळे जाणीवेतील दृश्य विश्व मर्यादितच असते; पण नामाने वृत्ती जेव्हा अमर्याद होते, म्हणजेच वृत्तीलय होतो; तेव्हाच परमात्मवस्तूचा दिव्य बोध होतो.

असा सत्य-ज्ञान-आनंदघन पांडूरंग!!! त्याची भक्ती आत्मज्ञानानंतरच होते. आत्मज्ञान हा भक्तांचा भरभक्कम पाया आहे.

आत्मज्ञानानंतर अद्वैतस्थितीमध्ये कोणतीही क्रिया संभवत नाही. (क्रिया दूर लांबच राहिली-बोलणे सुद्धा होत नाही. बोलता येत नाही ना???) पण असे असूनही या अद्वैतस्थितीत भक्ती मात्र होऊ शकते. हे अनुभवानेच-

स्वानुभवातूनच कळण्यासारखे आहे. ते भक्तीप्रेमसुख शब्दाने वर्णन करता येणार नाही. आपले ज्ञनोबाराय काय म्हणतात, **''तैसी क्रिया कीर न साहे। परि अद्वैती भक्ती आहे। हे अनुभवाची जोगे, नोहे। बोला ऐसे।।''**

ज्ञानानंतर होणारी भक्ती कशी असते, तर मी भक्ती करतो असे ज्ञानी समजत नाही. तर त्याच्या ठिकाणी, भक्ती ही स्वाभाविक असते-राहते; करावी लागत नाही तर ती होतच राहाते.

झाडाची फांदी वाकवता-वाकवता जमिनीला टेकली व त्याच टेकलेल्या स्थितीत ती स्थिर झाली, आता वाकविण्याची क्रिया संपली, केवळ स्थिती उरली तशीच भक्ति-तसेच भक्तीप्रेमसुख.

* * * *



# चिंतन १२४

गुरूपौर्णिमा झाली. श्रीगुरूपूजन झाले. गुरूकृपेतूनच ज्ञानाची प्रभा-ज्ञानाचा उष:काळ होत असतो. अशा ज्ञानाचीच प्रत्यक्ष चालती-बोलती, चेतन, सच्चिदानंदघन मूर्तीच असलेल्या श्रीगुरूंच्या चरणकमळी आपल्या निर्मळ भावकुसुमांची ओंजळ नम्रभावाने वाहण्यात काय अपूर्व समाधान आनंद असतो!!! खर ना? पंचांगात श्रीगुरूपौर्णिमा फक्त आषाढ पौर्णिमेलाच छापलेली असते; पण सत्‌शिष्याच्या जीवनात गुरूपौर्णिमा रोजच उदित होते. स्वानंदाच्या चंद्रामृताचा अखंड वर्षाव श्रीगुरू आपल्या लाडक्या पट्टशिष्यावर सततच करतात, खर की नाही? सगळ्याच सत्‌शिष्यांचा, साधकांचा हा नित्यनूतन असा आनंदानुभव आहे.

त्यातून श्रीगुरू जर महावैष्णव असतील तर मग काय आनंदाला आनंद, सुखाला सुख, विश्रांतीला विश्रांती, गोडीला गोडी अशी मौज. ज्ञानाला भक्तिप्रेमभावाचा साज चढतो; आणि आत्मज्ञानपण अलंकृत होते.

श्रीमधूसुदन सरस्वती आपल्या गीतेवरील टीकेत म्हणतात, ‘‘**अद्वेष्टत्वादिवत्तेषां स्वभावो भजनं हरे:**’’ म्हणजे श्रीहरीचे प्रेमलक्षावृत्तीने नित्य भजन/स्मरण/सेवा करणे हा ज्ञानीभक्तांचा स्वभावच असतो. भक्ती ही आत्मज्ञानाची स्वाभाविक स्थिती होऊन जाते. हा भाव, ही भावाची संपत्ती, हे भावाचे ऐश्वर्य, भगवत्‌कृपेला पात्र झाल्याशिवाय, श्रीगुरूंना परमप्रेमझाल्यानंतरच हा ऐश्वर्याचा लाभ होतो बर!!!

अद्वैतभक्ती म्हणजे ज्ञानोत्तर भक्ती, म्हणजे परमप्रेमास्पद आत्मरूपाने

आत्मस्वरूपावर-स्वस्वरूपावर नितान्त, निरंतर, निरपेक्ष, निर्मळ, निरूपचार, निरतिशय, प्रेम करणे. आत्मारामाचा/आत्म्याचा परमप्रेमास्पद असणे हा स्व-भाव आहे. तो व्यक्त होतच असतो आणि व्यक्त झालाच पाहिजे आणि म्हणूनच या परमप्रेमास्पदतेमुळेच परमभक्तिप्रेमभावाचे, अखंड स्व-रूपाचे ठिकाणी स्फुरण होतच राहते व ते स्वस्वरूप-स्व-अभिन्न अशा आनंदघन भगवंताच्या ठिकाणी अर्पण होत राहते. येथे मुद्दाम आग्रहपूर्वक अट्टाहासाने अर्पण करावे लागत नाही. तर ते अगदी सहज, अगदी अकृत्रीमरित्या अर्पण होतच राहते. यालाच आत्मसमर्पण असे शास्त्रकार म्हणतात. आत्मसमर्पणा इतकीच काय पण याच्याहून दुसरी कोणचीच मोठी गुरूदक्षिणा नाही हेच खरं!!!

ज्ञानानंतर खरे-खोटे हे भावच राहात नाहीत. सर्वत्र एक आत्मस्वरूपच/भगवत्स्वरूपच दिसते; उरते. प्रत्ययास येते आणि अशा स्वरूपज्ञानानंतर अवघी नामरूपेही ब्रह्मच होऊन जातात.

ब्रह्माचे जे ज्ञान आहे ते भक्तिरूपी गावाला जाण्यासाठी ठेवलेल प्रस्थानच आहे. ज्याप्रमाणे व्यवहारात आपण जे प्रस्थान ठेवतो ते पुढील प्रवासासाठीच असतं. तसेच आत्मज्ञान हे भक्तिसाठीच आहे आणि भक्ती म्हणजे परमप्रेमभाव. हा परमप्रेमभाव वस्तुत: ज्ञानोत्तरच संभवतो. आपले उपास्य पांडूरंग/आपले श्रीगुरू, आपल्यापेक्षा वेगळे आहे असे अज्ञान जोपर्यंत आहे, हा भेदभाव जावत्‌काळपर्यंत आहे, तोपर्यंत परमप्रेमभाव संभवतच नाही. आपल्या आत्मस्वरूपाशी भगवंताचे/श्रीगुरूंचे ऐक्य झाले की मगच हा परमप्रेमभक्तिभाव उदयास येतो. कारण आपले नि:सीम प्रेम आत्मस्वरूपावर/स्वस्वरूपावर आहे. तेच स्वस्वरूप आत आहे. बाहेर आहे. त्याच्याशिवाय दुसरे काहीच नाही. एक गोपी आपला स्वानुभव सांगते आहे,

''**बाहेरि भीतरी तुजच मी देखे।**'' ज्ञानोबाराय हरिपाठात हेच सांगताहेत, ''**एक हरि आत्मा, जीव-शिव सम**''

असा संपादित झालेला भक्तिप्रेमभाव हाच खरा पुरूषार्थ. हेच खरे भाग्य. परमात्मा-भगवंत-श्रीगुरू ओळखणे हे मुख्य प्रयोजन नाही तर त्याचे सुखरूपत्व अनुभवणे हेच मुख्य प्रयोजन. भक्तिप्रेमसुख भोगणे हे परमप्रयोजन असून त्याच्या प्राप्तीचे साधन ब्रह्मज्ञान. ''**भक्तिभाग्यप्रेमपुरूषार्थ। हाचि ब्रह्मीचा मुख्य अर्थ।।**'' अशा शब्दात तुकोबाराय त्याचे वर्णन करतात.

* * * *

# चिंतन १२५

सत्यपरमतत्त्व सर्वांना सहजी प्राप्त आहे; परंतु तिकडे आपण दृष्टी वळवत नाही; म्हणून ते अप्राप्त आहे असे वाटते. जसे तुम्ही काही करा अथवा करू नका, कोणत्याही वेळी, स्थळी, आपण स्वत:चा कधी अभाव पाहतो का? ''मी नाही'' असा स्वसत्तेच्या आभावाचा अनुभव कोणालाही येत नाही; येऊ शकतच नाही. यावरून असे सिद्ध होते की, स्वत:चा भाव अर्थात अस्तित्त्व निरंतर असतेच. क्रियेमध्ये अंतर होऊ शकते, परंतु आपल्या अस्तित्वात फरक पडत नाही. परंतु माणसाची दृष्टी क्रियेकडे राहते. स्वत:च्या अस्तित्त्वाकडे राहत नाही. (तो लहान-मोठे, उच्च-नीच, विहीत-निषिद्ध) कर्म करत राहतो; पण त्याची दृष्टी त्या तत्त्वाकडे जात नाही, की ज्या तत्त्वावर कर्ता टिकलेला आहे; कर्त्याचे जे प्रकाशक, आश्रय आणि अधिष्ठान आहे. त्या ज्ञानाचा, तसेच प्रकाशरूपी निर्विकल्पत्वाचा कधीही अभाव होत नाही. आपला भाव (अस्तित्त्व) निरंतर आहे. हेच आपले निजस्वरूप आहे. याकडे दृष्टी असणे हाच स्वरूप बोध आहे. समर्थांनी ''**स्वरूपी रहाणे**'' हाच स्वधर्म सांगितला आहे.

आगोदर अंत:करण शुद्ध होईल मग स्वरूपाचा बोध होईल, ही शास्त्रांची प्रक्रिया फार चांगली आहे. पण अंत:करण शुद्ध झाल्यावरच तत्त्वप्राप्ती अशी गोष्ट नाही. मनुष्यमात्राचा जन्मच केवळ या तत्त्वानुभूतीसाठी आहे. भगवान् आपल्या स्वत:च्या अहैतुकी कृपेने, जीवाला त्याच्या पाप-पुण्याच्या समानतेतून मनुष्यशरीर देतात एवढच नाही तर जीवनमुक्तीचा संपूर्ण अधिकारसुद्धा त्याबरोबरच देतात. जो परमपदाची प्राप्ती करून घेत नाही

त्याला हे मानवशरीर प्रदान करण्याएवढे भगवान् निर्बुद्ध नाहीत. अशा जीवाला मनुष्यशरीर प्रदान करण्याएवढी भूल, भगवंताकडून होत नाही, नाही-नाही तर होऊच शकत नाही.

जर आपल्याला हा नरदेह प्राप्त झाला आहे तर परमपदाच्या प्राप्तीचा अधिकारही प्राप्त झाला आहे. आता असा हक्क, अधिकार त्या परमकृपाघन दयावन्त भगवंताने देऊनसुद्धा आपण स्वत:च आपणाला असमर्थ समजणे ही आपली केवढी घोर चूक आहे? असे म्हणतात की, अशुद्ध अंत:करणाचा माणूस भगवत्तत्त्व कसे जाणणार??? अशुद्ध अंत:करणाचा माणूस अंत:करणद्वारा परमतत्त्व जाणू शकत नाही. पण, मुळी ते परमतत्त्व अंत:करणाच्या काय तर बुद्धीच्याही पलीकडे आहे. गीताच सांगते **''यो बुद्धे परतस्तु स:''** आपला 'स्व' (म्हणजे आत्माराम) अंत:करणाच्या आश्रयाने, आधाराने, प्रकाशाने आहे का? तर तसे त्रिवार नाही. त्याच्या (त्या आत्मारामाच्या आधाराने) अंत:करण, बुद्धी आदिकरण (म्हणजे कार्य, साधन, उपाधी, माध्यम, साधन इत्यादी) आहेत आणि 'स्व' (आत्माराम) स्वत: कर्ता आहे. करण हे नेहमी कर्त्याचे अधीन असते; पण कर्ता हा कधीही करणाचे अधीन राहात नाही. ज्याच्याकडून आपण काम/क्रिया करून घेतो, त्या माध्यमाला करण म्हणजे काम करण्याच्या अवजाराचे नाव आहे. काम करणाऱ्याचे नाव, त्याला कर्ता म्हणतात आणि कर्ता हा व्याकरणशास्त्रदृष्ट्या नेहमीच प्रथमेत (म्हणजे प्रथमा विभक्ती) असतो म्हणून गुरूप्रतिपदा.

आता अवजारांच्या द्वारा केल्या जाणाऱ्या, होणाऱ्या क्रियात कर्ता हा तर करणाशिवाय असफलच असतो हे अगदी खरे!!! परंतु करणापेक्षा अतीत तत्व असणारा आत्माराम अर्थात आत्मतत्व, स्वत्व आपण आपल्यात (म्हणजे स्व मध्ये म्हणजेच आत्मारामी) स्थित होण्यात करणाशिवाय कर्ता असफल कसा

होईल???

अंत:करणाच्या माध्यमातूनच जो स्व ला जाणू म्हणतो त्याला अंत:करण शुद्ध झाल्यावरच (स्व (म्हणजे) भगवंत) कळेल. परंतु आपण अंत:करणाचा नसलेला संबंध विच्छेदन करून टाकला तर आपण त्या आत्मारामाला म्हणजे भगवंताला का जाणू शकणार नाही??? भक्तिप्रेम म्हणजे अंत:करणच आपले अवजार/हत्यार/करण म्हणून न बाळगता, अंत:करणाचा अधिष्ठाता-आश्रय-प्रकाश असा जो भगवंत/श्रीगुरू त्यालाच देऊन टाकले मग शुद्ध-अशुद्धाचा प्रश्नच उरत नाही. गावातील गटारे नदीच्या द्वारा जेव्हा गंगेला मिळतात तेव्हाच त्यांचे गटारपण कोठल्या कोठे नाहीस होते, कसे नाहीसे होते हे त्या गटारालाच कळत नाही. गटार गटार रहात नाही तर गंगास्वरूप होते. अशा गंगास्वरूप प्राप्तीनंतर त्या गटारांनी आपले गटारपण काय म्हणून आठवावे ना? कारण एकच तर आत्माराम (पांडूरंग) हा अंत:करणाच्या अधीन नाही तर स्व-तंत्र आहे. करण म्हणजे अवजारे/हत्यारे वेगवेगळी असतात आणि त्यांच्या माध्यमातून होणाऱ्या क्रिया पण वेगवेगळ्याच असतात; परंतु त्या करणांचा आधारभूत आत्माराम एकच असतो. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध अनेकानेक, असंख्य, अमर्याद पण त्यांना करणाच्या म्हणजे इंद्रियांच्या अंत:करणवृत्तीचेद्वारा अनुभवणारा एकच.

**स्व** (आपले स्वरूप) सदा निष्क्रियच असते. जेव्हा कार्य समोर येते तेव्हा मात्र **कतृत्त्वअभिमानामुळे** आपण त्या कार्याचा कर्ता बनतो. वास्तविक स्वरूपत: जर विचार केला तर आपण अकर्ताच आहोत. जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन्हीही अवस्थेत आत्माराम (स्व) जसाच्या तसाच आहे. त्याच्याकडेच सातत्याने लक्ष केंद्रित करणे हेच पारमार्थिक जीवन आणि साधन आहे.

एक गोष्ट कधीही विसरू नये आमचा काय अधिकार ? आम्ही

प्रायमरीत !!! आम्ही मातीचा कण ??? अशी आपली आपणच अप्रतिष्ठा-अवहेलना, अवमूल्यन कधीच करू नये. अस करण म्हणजे भगवंताने उदारहस्ते दिलेल्या साधन-संपत्तीचा अवमान करण्यासारखे आहे. त्याने प्रदान केलेल्या सर्व साधन-संपत्तीचा, सामग्रीचा योग्य उपयोग करण ही भगवद्विषयक **कृतज्ञता** आहे. असे जर नाही केले तर मात्र ती कृतघ्नता होईल.

एका आणिक गोष्टीचा नित्य विचार केला पाहिजे. ''आपले अंत:करण-बुद्धी शुद्ध होईल, तेव्हा मग परमात्मा जाणेन'' अस म्हणणे ही भविष्यकाळातील वृथा आशा आहे. अशा आशेला काही अर्थच नाही. भगवंत हा भूत-भविष्य आणि वर्तमान या तिन्हीत आहे. तसाच तो या तिन्हीहून अत्यंत अतीत/वेगळा आहे.

असा कोणता देश, काळ, वस्तू, व्यक्ती, अवस्था, परिस्थिती आहे की ज्यात भगवंत नाही? पण त्या भगवंतात मात्र देश, काळ, वस्तू, व्यक्ती नाही. जसे अलंकारात सोनेच आहे, लाटात पाणीच आहे, वस्त्रात तंतूच आहेत, मातीच्या भांड्यात सर्वत्र मातीच आहे. परंतु सोन्यात अलंकार, पाण्यात तरंग, तंतूत वस्त्र, मातीत पात्र नाही.

अस जर आहे, सर्वत्र तोच **एक** आहे तर, आपण त्याला का जाणू शकत नाही ? अथवा प्राप्त करून घेऊ शकत नाही ? आपल्यात ही करण नाही, त्याच्यातपण करण नाही, आपल्यात उपाधी नाही, त्याच्यात उपाधी नाही. आपण (म्हणजे भगवंतासहित, भगवंतात लयाला गेलेले मीपण) उपाधिरहित आहोत. मग त्याला जाणण्याला, ओळखण्याला, अनुभवावयाला वेळ का?

ह्या भगवंतास जाणण्याची वेदांताची जी प्रक्रिया आहे त्यात अंत:करणाचा (प्रकृतीचा) संबंध आहे. पण भक्तिप्रेमशास्त्रात अंत:करणात त्याला जागा

दिल्यावर ह्या कार्य-कारण संबंधाला काहीच अर्थ उरत नाही.

ते परमतत्व जाणण्याची, अनुभवण्याची, तत्वाकार/आनंदाकार होऊन राहण्याची तीव्र उत्कंठा-लालसा पाहिजे अस म्हणा हव तर !

भगवंत तर नित्य-निरंतर जसाच्या तसा अविनाशी-आनंदघन आहे. तो तात्काळ जाणला जाऊ शकतो. आपली दृष्टी दृष्यावर न जाता दृष्य-द्रष्टा-दर्शन या त्रिपुटीला आधारभूत असणाऱ्या भगवंताकडे पाहिजे. दृष्टी वळली की तो आहेच.

आपण डोळ्यांनी सर्व पदार्थ पाहतो. परंतु पदार्थांच्या आधी प्रकाश असतो; पदार्थरूपानेपण प्रकाशच असतो. कारण प्रकाशाच्या अंतर्गतच सर्व काही असते/दिसते.

हा आत्मप्रकाशच सर्व कारणांना सदैव प्रकाशित करत असतो. या आत्मप्रकाशाच्या द्वाराच सर्व काही जाणले जाते.

म्हणून एवढीच विनंती आहे, प्रार्थना आहे, आपण आपल्याला कधीच चुकून सुद्धा परमपदाच्या प्राप्तीत, अनुभवात अयोग्य, अनाधिकारी समजू नये.

भगवंताच्या आनंदात भविष्यावर अवलंबून राहण्याची गरजच नाही. वस्तू उत्पन्न होणारी, क्रियाजन्य असेल, ती जर दूर देशात असेल, ती कोणाचे कार्य असेल, तीच्यात काही परिवर्तनाची गरज असेल तर त्या वस्तूप्राप्तीत भविष्याची अपेक्षा आहे.

परंतु सच्चिदानंदघन परमात्मवस्तू ही स्वत: सिद्ध आहे. स्वयंप्रकाशातीत आहे; स्वानंदघन आहे. नित्यसिद्ध आहे; लांबदेशांतरांत स्थळी-काळात नाही तर आपलेच निजस्वरूप आहे. सर्व देश, काळ, वस्तू, अवस्था, स्थिती, परिस्थिती यात तीच एक स्वत: सिद्ध आहे. ती परमात्मसत्ता, प्रकाश, आनंद

अखंड आहे. फक्त आपण बंद असलेले डोळे उघडावयाचे आहेत. डोळे भगवंतांनी दिलेच आहेत. भगवंत प्राप्तच आहे. नव्हे-नव्हे आपले निजस्वरूप आहे. असलेला चैतन्यब्रह्म/आनंदघन भगवंत अनुभवावयाचा आहे बस्. झाले काम. डोळे बंद करून बसू नका. ''**आहेसी तू अगा। अंगी डोळे उघडी.**'' आपल्यातलाच तो जाणावयाचा. आपणच जाणावयाचा.

* * * *

# चिंतन १२६

भगवत्साक्षात्कार प्राप्त करून घेणे हेच मनुष्यप्राण्याचे आद्य कर्तव्य आहे. देह पडल्यानंतर काय होते हे आपल्याला काय आणि कसे कळणार? देह पडल्यानंतर मुक्ती हे काही खरे नाही. मग ही मुक्ती कुणाला मिळणार? कशी मिळणार? आणि या मुक्तीचा अनुभव घेणार तरी कोण व कसा आणि कोणत्या माध्यमातून? तर तस नव्हे.

‘‘**याचि देही याचि डोळा। भोगिजे मुक्तीचा सोहळा।।**’’ या मानव देहात असतानाच, मुक्ती अनुभवावयाची म्हणजे परमशांती आणि परमानंदाचा सोहळा अखंड अनुभवावयाचा. हा आनंद नित्य, निरूपाधिक, निरामय, निरतिशय, निर्निमीत्त, आणि निरूपचार असतो. हा आनंद अनुभवता-अनुभवता आनंदच होऊन जाण म्हणजे जीवनमुक्तावस्था. देहात असतानांच हे शक्य आहे. मग आपल्याला भगवंताने अवसर दिला आहे, तोपर्यंत परमार्थ झपाट्याने, त्वरेने नको का करावयास?

क्षुधा किंवा तृषा अनावर होते, तसेच या परमार्थप्राप्तीच्या इच्छेचे आहे. परमार्थाची भूक अनावर झाली, व्याकुळता पराकोटीला गेली म्हणजे मगच तो माणूस नामासाठी बसतो; जसा तान्हेने व्याकुळ झालेला पाण्याकडे धावतो. जसा-जसा पाण्याचा घोट घेईल तशी-तशी तहान भागते, जसा एक-एक घास पोटात जाईल तेवढी-तेवढी भूक भागते, तृप्ती लाभते. अगदी तसच, जसे-जसे अखंड नामस्मरण होईल तसे-तसे समाधान वाढते; आनंद वृद्धिंगत होतो.

म्हणूनच साधनेला वेग असावा; तीव्रता असावी; उन्हात तापलेला जसा

सावलीकडे धावतो, तशी धाव आपूली नामाकडे असावी.

नाम चांगले होईल तसा पांडूरंग अधिकाधिक गोचर होईल. मधून-मधून होणाऱ्या या दर्शनाने तितकी दर्शनाची तळमळ तीव्र, उत्कट होत नाही, तर असे दर्शन हा आपल्या जीवनाचा आधार बनला पाहिजे. जसा पाणी हा मासोळीचा आधार आहे. ही दर्शनाची आस, ओढ वाढणे म्हणजेच मुमुक्षुता.

ही जी नामस्मरणाची प्रेरणा ती कधीच कमी होऊ न देता ती वाढती-चढती असली पाहिजे. आपल्याला याच जन्मात नामस्मरणाने भगवंत अनुभवावयाचा आहे. अशी तळमळ म्हणजे मुमुक्षुता. मळमळ नसावी तर तळमळ असावी; नुसती तळमळ पण नको, तर अखंड नामसाधना असावी.

माणसाने उद्योग करावा, प्रपंच करावा, पण यातच सर्व काही आहे-आले, असे वाटू नये. आपल्या जीवनाचे सार सर्वस्व परमार्थातच आहे याची जाण नित्य असावी. जेवणात मुख्य भाकरी-भात; तसाच जीवनात परमार्थ; प्रपंच जेवणातील चटणीसारखा; चटणीएवढाच. नुसती चटणीच खाल्ली तर आग-आग होईल ना?

आपल्याला मुख्य परमार्थ करावयाचा आहे ही भावना जागृत व नेहमी चढती-वाढती असावी आणि त्याच दिशेने आपण मन लावून प्रयत्नांची पराकाष्ठा केली पाहिजे; म्हणजे काय करावयाचे तर "**करा विठ्ठल स्मरण (म्हणजे नामस्मरण)। नामी रूपी अनुसंधान।**"

नाम घ्यावे, नाम गावे, नाम रचावे, नाम बोलावे, नाम ऐकावे, मग नामातील आनंद हळू-हळू अनुभवास येऊ लागतो; तो वाढू लागतो. नामाशिवाय राहू नका, नाही-नाही नामातच रहावे.

* * * *

# चिंतन १२७

परवानगीचा प्रश्नच नसतो. आपण म्हणतो, विचारतो 'आत येऊ का?' केवळ उपचारच!!! आपण जातच असतो, जाणारच असतो, नाही-नाही तर जावच लागत ना??? आणि ज्याला व्यवहारच नाही, त्याला व्यावहारिक अडीअडचणी-समस्या कशा आणि काय, किती समजणार???

व्यवहारात तडजोड असावी. मिळत-जुळत घ्याव, तडा जाऊ देऊ नये आणि देणारपण नाही असा विश्वास असावा. पण पारमार्थिक तत्वजीवनात आपल्या ध्येयाच्यासाठी माणसान घट्ट असलच पाहिजे; अर्थात हे सांगण एवढच अण्णाच कर्तव्य. कुणाला पटणार नाही हे माहिती असताना सुद्धा!!! "**प्रल्हादे पिता, बिभिषणे बंधू। राजमाता निंद्य भरते केली।। देव जोडे तरी करावा अधर्म।**" अस तुकोबाराय पण निक्षून सांगतात. व्यवहारातच काय देहातच असाव, पण देहाच, व्यवहाराच नसून भगवंताच असावं. माया-उपाधिपासून जे मुक्त झाले त्यांना मुक्त म्हणतात. त्यांचा देह सच्चिदानंदस्वरूपच असतो. याच माध्यमातून ते सगुण स्वरूपभगवंताचे भजन करतात.

आत्माराम म्हणजे जे आत्मस्वरूपाचे ठिकाणीच रमणारे असतात ते. मुनी म्हणजे ज्यांचा नारायण हाच जीवनविषय झाला आहे आणि त्यामुळे अंतर्बाह्य जे नारायणस्वरूपच झालेले असतात. ज्यांच्या अज्ञानग्रंथी (म्हणजे गाठी) नाहीशा झालेल्या असतात. तेदेखील भगवंताची निर्हेतुक भक्ती करतात. तुम्ही म्हणता ना तसाच हा भक्तिप्रेमभाव आहे. आपण आपल्यापासून काही

मिळवण्यासाठी जसे आपल्या स्वत:वर प्रेम करत नाही, तसेच भक्तदेखील भगवंतापासून काही प्राप्त व्हावे अशी इच्छा न धरता, त्यालाच आपले सर्वस्व द्यावे म्हणून भगवंतावर प्रेम करतात.

या भक्तीप्रेमानेच अहंकार समूळ नाहीसा होतो. ही भक्ती श्रीगुरू व भगवंत या दोघांच्या ठिकाणी असण आवश्यक आहे. श्रीगुरूभगवंताशी एकरूपता श्रीगुरूहरिभक्तीनेच मला प्राप्त झाली असा श्रीगुरूज्ञानेश्वरमहाराजांचा निर्वाळा आहे. त्यांचा तो स्वानुभव आहे. श्रीगुरूभक्तिशिवाय परमात्मप्राप्ती नाही व परमात्मप्राप्तिशिवाय श्रीगुरूभक्ती नाही. एकाच सच्चिदानंद चैतन्याची ही दोन रूपे आहेत. श्रीगुरू दुसरे काय देणार ना??? फक्त आणि फक्त दुर्लभ असे भक्तिप्रेम आणि आत्मज्ञानानंतरही या दोघांविषयी भक्ती कृतज्ञताबुद्धीने कायमच राहते; पांडूरंगापेक्षासुद्धा काकणभर सरस अशी श्रीगुरूंच्या ठायी; कां म्हणाल तर त्यांनीच रूक्मिणीकांताची ओळख करून दिली म्हणून. म्हणून तर एक श्रीज्ञानराजांची आरती.

'मी' गेला की एका सच्चिदानंदाशी ऐक्य होते. **''जीवा शिवाची जडली समाधी.''** ऐक्य झाले की भक्ती वाढू लागली. हा सर्व महावैष्णवांच्या-संतांचा अनुभव आहे.

नि:सीम व अखंड भक्तिप्रेम करण्याचा हा प्रवाह जीवनमुक्ती व विदेहमुक्ती यांत कायमच असतो. विदेहमुक्तित अत्यंत एकरूपता असते. जीवनमुक्तित नाममात्र वेगळेपणा असला तरी भक्तिभावप्रेमप्रवाहात खंड पडत नाही. नदी समुद्राला मिळाल्यानंतर एकरूप होते, प्रश्नच नाही. पण तत्पूर्वीही तिचा प्रवाह/ओघ एकरूपतेकडेच अखंड चालूच असतो. हाच भक्तिप्रेमभाव सुखाचा सर्व साठा आहे. हेच पूर्ण सुख आहे. पूर्णसुखात सुखाचा अनुभव नसतो तर 'केवळ सुखच' असते. ज्ञानोबाराय काय म्हणातात,

**"तें वेगळेपण भोगिजे। जैसे पक्षिये फळ चुंबिजे। तैसे नव्हे; एथ विसरिजे। भोगितेपणहि।।"** भक्तिप्रेमसुखातही याचप्रमाणे जाणीव हरपते. जाणीवेत सुख वेगळे पडते आणि म्हणूनच ते कमी पडत असते, ते सर्वसुख नसते.

म्हणून **"जाणीव-नेणीव भगवंती नाही।"**

जाणीवेशिवाय जाणायचे तेच भक्तिप्रेमसुख. खर ना??? मग त्यात, क्षमा-अपराध-विचारण काहीच नसत. असत आणि नसत याच्या पलीकडला फक्त अढळ, अतूट, नि:सिम भक्तिप्रेमभाव.

* * * *



# चिंतन १२८

बाह्य विषयाचे ज्ञान थांबले तरी आपली बाह्यवृत्ती काही नि:शेष जात नाही. ती बाहेर धावतच असते. कारण स्वरूपस्थितीला सोडून बाहेर धावण्याचाच अभ्यास, परिपाठ, सवय वृत्तीला झालेली असते. मग सद्‌वस्तूच्या; म्हणजे भगवंताच्या नामस्मरण अभ्यासानेच ती बंद होते. दास्य, वात्सल्य आदी प्रकारच्या नवविध भक्तिच्या वाटांची वाटचाल तर यासाठीच करावयाची आहे; पण या सगळ्या नवविधा भक्तिमध्ये एका माधुर्यभक्तीने ती धाव नि:शेष नाहीशी होते. माधुर्यभक्तीत एकपणाच्या पलीकडील एकरूपता प्राप्त होऊन आपणच भगवंताला सर्वसुख समर्पण करणे अखंड सुरू असते. इतकी एकरूपता असते की आपण पूर्वी देव-भक्त असे दोघे होते, आता तो दोनपणा संपून एकरूपता झाली याचेच भान उरत नाही. द्वैत निरपेक्ष अद्वैत.

कोरान्न म्हणजे भिक्षा. श्रीमंताची पत्नी अशी भिक्षा मागत नाही. तशी भक्ताला संसाराची चिंता नसते. ‘‘**येऱ्हवी तरी माझिया भक्ता। आणि संसाराची चिंता। काय समर्थाची कांता। कोनान्न मागे।।**’’ भगवंतासारखा/श्रीगुरूंसारखा स्वामी लाभल्यावर भक्ताची दीनताच उरत नाही. ‘‘**राजयाची कांता काय भीक मागे?**’’ प्रपंचाची, दृष्य विश्वातील घडामोडीची काळजी वाटत राहणे हाच दीनपणा आहे. तो भक्ताच्या ठिकाणी अजिबात नसतो. यालाच भक्त म्हणतात. आपल्या भक्तांसाठी काहीही करण्यास हा भक्तजनवत्सल भगवंत यत्‌किंचितपण लाजत नाही. म्हणजे भक्तांची अगदी हलकी-सलकी कामे, अगदी नीच दर्जाची कामे करावयाससुद्धा त्याला जरासुद्धा लाज वाटत नाही. ‘‘**धूत असे घोडी**

**अर्जुनाची; झाला महार पंढरीनाथ; जनाबाई संगे दळू कांडू लागे;''** खर ना? आणि म्हणूनच मुळी भक्ताला भगवंत/श्रीगुरू हेच स्वामी आहेत. भगवंत तोच श्रीगुरू आणि श्रीगुरू तोच भगवंत. या ऐक्यप्रतीतीने त्याच्याच ठिकाणी स्वामीभाव.

रूक्मिणी तर काय भगवंताची पत्नीच. तिचे भगवंतावर नितांत प्रेम. प्रश्नच नाही ना? पण पुरूषांना पण भगवंतावर असेच प्रेम करता येते. नरसी मेहता, प्रज्ञाचक्षू, स्वत:ला ज्ञानेश कन्या मानणारे - नाही तर प्रत्यक्ष अनुभवणारे श्रीगुलाबराव महाराज असेच प्रेम करत असत. त्या भक्तमानसमराळ, भक्तचित्तचकोरचंद्र अशा भगवंतावर. ''**वासुदेव पुमान् एक:; स्त्रीरूप इतरं जगत्**'' असे भक्तिशास्त्रात एक नितांतसुंदर प्रमेय आहे. गीता पण असच सांगते. तोच फक्त एकमेव क्षराक्षरापेक्षा पलिकडला असा उत्तम पुरूष आणि बाकी सर्व जगत् ही प्रकृतिच. ज्ञानोबाराय अमृतानुभवात म्हणतात, ''**अहं देऊनि शंभू। शांभवी झालो.**'' म्हणजे अहं हा शंभूमहादेवाला देऊन आम्ही पार्वती म्हणजे अहंकाररहित होऊन परमेश्वराशी अभिन्न असणारे शक्तिस्वरूप होऊन राहिलो. जीव ही त्या परमात्म्याचीच शक्ती आहे. शक्ती ही जशी केव्हाही, कुठेही, कशानेही शक्तिमानापेक्षा कधीच वगेळी नाही; नसते, त्याचप्रमाणे भक्त काय तर जीवच स्वरूपत: शिवापेक्षा कधीच यत्किंचित्पण वेगळा नसतो.

संतश्रेष्ठ मीराबाईंच्या जीवनचरित्रात एक मोठा छान प्रसंग आहे. भक्तिशास्त्राच्या प्रमेयांची अत्युत्कृष्ट चर्चा ज्या ग्रंथात आहे, अशा ''उज्ज्वलनीलमणि'' व ''वैष्णवतोपणी'' या ग्रंथाचे कर्ते व श्रीचैतन्यमहाप्रभूंचे अंतरंग शिष्योत्तम श्रीरूप व जीवरूप गोस्वामी हे तीर्थयात्रा करता करता वृंदावनात आले तेथील सर्व महावैष्णवांची भेट-दर्शन त्यांनी घेतले आणि

त्यांचा मुक्काम तेथे झाला. मीराबाई तेथे आल्या. त्यांना या दोन महान्वेष्णवांच्या दर्शनाची मोठी तळमळ, पण त्यांना कळल की हे महात्मे स्त्री मुख अवलोकन करत नाहीत. तरी त्या गेल्या. कवाडं बंद. त्यांनी सांगितल ''मीरा आली आहे'' ते म्हणाले ''आम्हास स्त्रीदर्शन वर्ज्य आहे.'' मीराबाई म्हणाल्या, ''या विश्वात पुरूष फक्त एकमेव आणि तो म्हणजे ''श्रीकृष्ण!'' तुम्ही आम्ही सारे प्रकृती.''

हे ऐकले मात्र, कवाड उघडून दोघे बाहेर आले. मीराबाईंच्या पायावर लोळण घेतली. म्हणाले ''आज आमचे डोळे उघडले. तोच एक भगवान, उत्तमपुरूष, योगयोगेश्वर.''

* * * *

# चिंतन १२९

पारमार्थिक/आध्यात्मिक नीतीचे अंतीम तत्व म्हणजे ऐक्य; मोक्ष, किंवा भगवंताशी असलेल्या सामरस्याचा अनुभव घेणे, सदैव त्या सामरस्याच्या रसामधेच बुडी देऊन राहणे. भगवंताचे यथार्थ ज्ञान वाढण्यास व त्या ज्ञानाच्या द्वारा त्याचा साक्षात्कार करून घेण्यासाठी ज्या ज्या गोष्टी; व्यक्ती, प्रसंग, देश, कालामुळे जी जी मदत होईल ती ती सर्वच नीती असे नीतीचे आध्यात्मशास्त्रकारांनी, साक्षात्कारशास्त्रांनी व्याख्यान केले आहे. भगवंताच्या आड येणाऱ्या सर्व गोष्टींना त्यांनी अनीती असे म्हटले आहे.

सर्वात मोठी अनीती म्हणजे आपला अहंकार. अहंकार हा फार सूक्ष्म आणि चिवट-चिकटगुंड्यासारखा असतो. तो संपूर्ण जाणे अशक्य नाही; पण फार-फार कठीण मात्र आहे. आपण तो घालवण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा तो जास्तीत जास्त चहू अंगानी कसा फुलेल याचाच नकळत-प्रसंगी अगदी जाणून बुजून प्रयत्नच करीत असतो. अहंकार जितका सूक्ष्म तितका तो जास्त बळकट आणि म्हणून सहजासहजी निघणे कठीण. ‘‘मला अहंकार नाही’’ हा पण एक अहंकारच आहे हेच कळत नाही.

मग हा अहंकार नाहीसा होण्याचे साधन, उपाय काय? तर सर्व काही एक भगवंताचेच आहे, ही भावना सतत जागृत ठेवून साधन करावयास हवे. ‘‘मी’’ नाम घेतो ही अहंकाराची भावना गेल्याशिवाय नामस्मरणांत प्रेम, उत्कटता, तीव्रता येणार नाही. तो देवच

आमच्याकडून नामस्मरण करवतो, अशा श्रद्धेने नाम घेतले की प्रथम-प्रथम अगदी अत्यल्प प्रमाणात का होईना थोडा आनंद उत्पन्न होतो व तो अनुभवास येतो.

नामस्मरण सोडून उठून जाऊ नये असे वाटले पाहिजे; असे ज्या दिवशी/क्षणी वाटेल ना? तो क्षण-दिवस नामधारकाच्या जीवनात महद्‌भाग्याचा. हे एक अहंकाराच्या त्यागाने शक्य होते. चिंता, हळहळ, काळजी ही परमार्थाला सर्वथैव वर्ज्य आहेत. नामस्मरणारने अध्यात्मशक्ती निर्माण झाली म्हणजे ज्या प्रमाणे रूप, नाद, प्रकाश इत्यादी अनुभव येतो त्याप्रमाणेच वरील गोष्टी कमी होत होत पूर्णत्वाने संपल्याचे लक्षात येते. असा अनुभव हा नामसाधनेतील एक अत्यंत अनन्यसाधारण महत्वाचा असा अनुभव आहे.

नामस्मरणास बसले की, त्यावेळी अनेक कुकल्पना (नामाखेरीज ज्या ज्या कल्पना त्या साऱ्याच्या साऱ्या कुकल्पनाच, हा कुकल्पनांचा व्यापक अर्थ आहे) येतात. सर्व नामधारकांना प्रारंभी या कल्पनांचा त्रास होतो. मात्र धुराच्या लोटाप्रमाणे तेज, प्रकाश, अग्नी यांचेच सामर्थ्य असते हे मात्र नामधारकाने लक्षात ठेवले पाहिजे. आपण फक्त अनन्य होऊन त्याच्या नामस्मरणात राहाणे. बाकी सर्व तो करतो आपण फक्त त्याचे (भगवंताचे/सद्‌गुरूंचे) होऊन रहावे. बस !!!

अशा प्रकारे अनन्य योगाने नामस्मरण करणाऱ्यांचा उध्दारकर्ता भगवंतच आहे. यात तिळमात्र शंका नाही. ‘‘**निजनिष्ठे नाम गावे ।।**’’ निष्ठा परिपक्व झाली की भगवंताचे रूप डोळ्यासमोर झगमगू लागते. ज्ञानोबाराय म्हणतात, ‘‘**नाम आठविता रूपी प्रगट पै झाला ।**’’ केव्हा तर अचिरात म्हणजे तात्काळ.

अशा नामस्मरणाने अंगी भूतदया, प्रेम वैराग्य, नम्रता, निर्भयता आदी सद्गुण तसेच कारुण्य, आश्चर्य, आनंद, हळवेपणा आदी भावना उत्पन्न होतात आणि वाढीस लागतात. नि:स्पृहता आणि वैराग्य हे सद्गुण साक्षात्कारामुळेच दृढ होतात.

नीतीच्या सर्व दृष्टिकोनापेक्षा अध्यात्मिक दृष्टिकोन महत्वाचा. भक्तिप्रेमास पोषक असे जे जे काही असेल तीच नीती. रूढ नीती म्हणजे आचारपरंपरा/रूढी. भक्ती ही रूढीने बांधलेली नाही व नसते, असे गुरूदेव नेहमीच अवर्जून सांगत.

* * * *




आपल्या देहातच आत्माराम आहे. तेजोरूपाने, वायुरूपाने, प्रवाहरूपाने, उष्णतारूपाने, प्राणरूपाने हा आत्माराम जसा विश्वात भरून आहे, तसाच तो आपल्या देहात भरून राहिलेलाच आहे. देह ही आत्म्याची खोळ आहे. आवरण आहे. पण देह म्हणजे आत्माराम नव्हे. जसे म्यान म्हणजे तलवार नव्हे; अलंकाराची डबी म्हणजे अलंकार नव्हे; तिजोरी म्हणजे धन नव्हे, तांब्याच्या तारेत वीज आहे; पण तार म्हणजे काही वीज नव्हे. तर तार हे विजेचे माध्यम आहे. हा आत्माराम स्वयंप्रकाश, स्वयंभू, स्वसंवेद्य, आणि तसाच आनंदघन आहे. डोळे बंद, घट्ट मिटल्यावर, अंधकाराचे ज्ञान ज्या प्रकाशाने होते तो आत्मप्रकाश.

शरीरात आत्माराम आहे, पण शरीर म्हणजेच आत्मा नाही. देहात असणारा आत्माराम हा शरीरापेक्षा सर्वस्वी वेगळाच आहे. देहाचे येणे-जाणे सारखे चालू आहे. इतकेच काय तर प्रत्येक क्षणाला देहातील एक पेशी जाते, तर दुसरी पेशी येते. तसेच शरीराचे!!! एक येते, एक जाते; पण याउलट आत्माराम अगदी नित्य, अविनाशी, शाश्वत आहे. शरीर अपूर्ण आहे. तर आत्मा परिपूर्ण आहे. अगदी सर्वतोपरी; आणि सर्वांगाने.

याच आत्मारामाच्या ताकदीने, सत्तेने देह चालतो. पण असा सर्वज्ञ, सर्वशक्तिमान आत्माराम अदृश्य आहे; इतकेच काय तर तर्काच्या, बुद्धीच्या, इंद्रियांच्या, मनाच्या पलीकडे आहे. मन दिसत नाही, पण त्याचा विचार करणारे मानसशास्त्र आहे, तसेच या आत्मारामाचा विचार करणार शास्त्र

आहे; त्यालाच अध्यात्मशास्त्र अस म्हणतात.

या आनंदस्वरूप, आनंदघन आत्मारामाची प्रचीती या देहात असतानाच घ्यावयाची आहे. पण या देहाच्या माध्यमातून नाही. देहबुद्धी नष्ट झाली तरच ही आत्मबुद्धी जागृत होते. आपल्या देहातला आत्माराम कळला, त्याची प्रचीती आली तर बाहेरच्या दृश्य जगतातील परमात्म्याचा साक्षात्कार होतो. आत्मारामाचे एनलार्जमेंट म्हणजेच परमात्मा.

हा परमात्माच हंस स्वरूपाने (म्हणजेच आत्मरूपाने) सर्व जीवमात्रांचे ठिकाणी विराजमान आहे. तो अखंडत्वाने ओतंच-प्रोतंच व्यापून असतानासुद्धा, अज्ञानी जीव हा देहाशी तादात्म्य पावल्याने या आपल्या मूलभूत अशा शब्दात, आत्मस्वरूपाला, आपला-आपणच ओळखत नाही.

आत्मसुख, आत्मानंद, आपल्या आतच आहे. पण तो आनंद-स्वानंद-निजानंद. नित्यानंद अनुभवण्यासाठी तशी दृष्टी प्राप्त व्हावयास हवी आणि ही दृष्टी श्रीसद्‌गुरूंच्या कृपादृष्टितूनच प्राप्त होते आणि अशी गुरूकृपादृष्टी प्राप्त होण्याचे साधन म्हणजे एक श्रीगुरूउपदिष्टित सबीज नामाचे स्मरण.

मूळ परमात्मा हा विज्ञान स्वरूप आहे. विज्ञान म्हणजे तरी काय? तर अज्ञान आणि त्याच्या सापेक्ष असणारे ज्ञान यांच्या पलीकडील अज्ञान-ज्ञान रहित अशी स्थिती. एकाच नाण्याच्या जशा दोन बाजू, एक छाप-एक काटा. तसे एकाच परमात्मतत्वाच्या बाजू म्हणजेच जीव आणि शिव. म्हणजे परमात्मवस्तूला येणाऱ्या उपाधीअंती जीव आणि शिव ही केवळ भाषा; नाहीतर आत्मा-परमात्मा हे एकच तत्व आहे. दिसायला छाप-काटा; दोन बाजू; पण नाणे एकच. तसेच या जीवा-शिवाचे. तीच गत देव आणि भक्त, अगर श्रीगुरू आणि शिष्य यांची.

जीव हा शिवाचा आभास आहे. हा आभास अज्ञाननिर्मित आहे. अज्ञान

म्हणजे ज्ञानाचा अभाव असा अर्थ नसून स्वरूपाचे विपरीत ज्ञान असा आहे. अज्ञानाच्या उपाधीने जीव; तर साक्षी चैतन्य सत्-चित्-आनंद स्वरूप ज्ञानाच्या उपाधीने शिव.

नामस्मरणाने बहिर्मुख असणारा जीवच अंतर्मुख होतो. एकमेकाकडे पाठ असलेले जीव-शिव सन्मुख होतात. जीवा-शिवाची दृष्टादृष्ट होते; तेव्हाच जीवात्मा आणि शिवात्मा हे दोघे एक परमात्मस्वरूपात जाऊन, त्याच्याशी मूळची असलेली एकरूपता, समरसता अनुभवतात. हीच गोष्ट पंधराव्यात क्षर-अक्षर आणि उत्तमपुरूष ह्या शब्दांनी भगवंतानी सांगितली आहे.

ही ''**जीवा-शिवाची जडली समाधी**'' अशा उत्तमपुरूष/पुरूषोत्तमाच्या अमृतस्वरूप अशा अखंड नामस्मरणाने साधते.

* * * *




श्री तुकोबाराय म्हणतात, ''**आम्ही अळीकरे। प्रेमसुखाची लेकूरे।।**'' बाळांनी हट्ट करावा आणि आईने तो पुरवावा.

परमार्थात मनाला फार महत्वाचे स्थान आहे. मन हे नुसते जड नाही; तसेच ते नुसते चैतन्यही नाही. तर मन हे जड व चैतन्य यांनी बनलेले आहे त्यामुळे त्यात जडाचे तसेच चैतन्याचेही गुणधर्म आहेत. जडाचे आकर्षणामुळे ते स्व-रूपाला-स्वानंदघनाला सोडून बाहेर जाते. या मनाच्या चंचलतेमुळे, गतीमुळे सर्व व्यवहार घडतात. या मनामुळेच संवेदना, संवेदनेतून ज्ञान/ जाणीव, ज्ञानातून प्रेरणा व प्रेरणेतून कर्म अशी मालिका निर्माण होते.

दुसऱ्या भाषेत सांगावयाचे झाले तर, असे म्हणता येईल की, ''**देहाचे-मार्फत दृश्याशी होणारे इंद्रियांचे तादात्म्य म्हणजे मन.**'' हे मन असंख्य कल्पना करून जीवाला हैराण करते. मग या मनाचे परिणाम आपल्या शरिरावर पण होतात ना??? काही जण तर बिचारे या मनालाच आत्मा मानतात!!! पण ते सर्वस्वी चूक आहे. मनापेक्षा आत्माराम वेगळा आहे. मन आणि आत्मा एक नव्हेत.

आपल्या प्राणशक्तीच्या हातात या मनाची नाडी आहे. मनाची गती प्राणाच्या गतीशी तादात्म्य पावली की दृश्य मावळते. म्हणजे त्याच्या मिथ्यत्वाचे ज्ञान होते. या मन, आणि प्राण यांच्या संमीलनासाठी एकच उपाय. तो म्हणजे नामस्मरण. नामस्मरणाने मन, प्राण, नाम, नामी एकरूप होतात. म्हणजेच मनोलय होतो. म्हणजेच मन हे मन न राहता रामरूप होऊन जाते

आणि रामरूप होऊन पुन: रामकृष्ण शिल्लकच राहते.

मन चंचल आहे. मन दृश्यामागे धावते; आपण मनामागे धावतो. ती धावाधाव धावून संपतच नाही. तर न धावता, मनाचे साक्षी होऊन मनाचे ज्ञान झाले, म्हणजे मनातील संकल्प-विकल्पाचे स्वरूप समजते आणि अशा भूमिकेनंतरच खऱ्या परमार्थाच्या वाटचालीस सुरवात होते. या वाटचालीत खरी खरी सोबत असते; ती श्रीगुरूंकडून मिळालेल्या सबीज नामाची.

या नामाने काय होते? तर या मनाला दृश्यापेक्षा, दृश्याला आधार असणाऱ्या चैतन्याची-आनंदस्वरूपाची ओढ लागते. स्वानंदाचे आकर्षण निर्माण होते. एकदा का मनाला स्वानंदाभिरामाचे असे आकर्षण लागले की मग या खुळ्या-वेड्या मनाचे मनपणच कमी होऊ लागते. नामाने मनाचे असे परिवर्तन होता-होताच "**मन हे राम झाले-मन हे राम झाले। प्रवृत्ति ग्रासुनि कैसे निवृत्तिसी आले।।**" त्यासाठी नामस्मरण.

मन हे भगवंताचे नामाशी एकरूप होणे हे स्मरणात/नामस्मरणात फार-फार महत्वाचे आहे. या मनाचे संकल्प-विकल्प जर साममय झाले तर निर्विकल्प स्थितीला नेणारी ती एक सोपी युक्ती आहे. नाम हे काम करते मग "**संकल्प तो नाही दुजा**" भगवंतावाचून तो अशी स्वरूपस्थिती लाभते.

मन स्वरूपी असे मुरल्यानंतर जे उरते, तेच देवाचे दर्शन आणि तोच आत्मसाक्षात्कार. सगुणप्रेमी भक्ताला या दर्शनातूनच सगुण-साक्षात्कार होतोच होतो. सगुणाच्या विलक्षण प्रेमसुखासाठी तळमळणाऱ्या, भुकेल्या भक्तासाठी निराकाराला, निर्गुणाला, साकार आणि सगुण व्हावेच लाभते. ही नामाची ताकद.

* * * *

# चिंतन १३२

आपल्या असण्याचा उगम व वाढ भगवंतापासून आहे. आपल निर्माण होणे (निर्मिती), अस्तित्व, ह्या साऱ्या साऱ्या घटनांना, अवस्थांना, स्थितीला एक देवच आधारभूत आहे. भगवद्भक्त हा मातेच्या गर्भातील मुलासारखा आहे. गर्भाशयातील तो गर्भ आपल्या आईचे तोंड पाहू शकत नाही; तरी ती जननी मात्र या आपल्या बालकाची, जन्माला येणाच्याही आधीपासून शेवटपर्यंत काळजी घेत असते. ज्ञानी भक्ताला देव, वाढलेल्या, मोठ्या, शहाण्या, शिकल्या-सवरलेल्या मुलाप्रमाणे वागवतो. स्वत: त्याला त्याच्या स्वत:च्याच जबाबदारीवर राहण्यास मोकळा सोडतो. मग अशा ज्ञानी भक्ताला आपल्या जीवनातील कष्टाच्या, अडचणीच्या, दु:खाच्या प्रसंगांना व अपघातांना एकाकी तोंड द्यावे लागते. "**सागर पोहत बाहुबलाने। नाव जरी मिळो न मिळो रे।।**" अशी त्याची अवस्था असते. आपले प्रयत्न निष्फळ ठरल्यावर, तो ज्ञानी देखील शेवटी अगतिक होऊन भक्त होऊन राहण्याची इच्छा करतो. ज्ञानी हा मोठ्या जाणत्या मुलासारखा तर भक्त हा अजाण बालकासारखा आहे.

विश्वरूपदर्शन घडल्याचे श्रेय, अर्जुनाला आहे, यशोदा मातेला आहे, कृष्णाला नाही. भगवंत तर विश्वरूपाने नटलेला आहेच मात्र पाहण्यासाठी, अनुभवण्यासाठी उघडी दृष्टी पाहिजे. भगवंत त्याचे नामधारकाला ही दृष्टी देतात. अर्जुनाला, यशोदामातेला दिली. पहावयाचे ज्यांनी त्यांनीच. भगवंताचा अनुभव एखादी वस्तू (जड) उचलून देण्यासारखा नाही. श्रीगुरू फक्त शिडी देतो. वर चढून जाण्याचा प्रयत्न नामधारकानेच करावयाचा. सबीज नाम हीच ती शिडी.

भक्त, भगवंत व नाम यांचा त्रिवेणीसंगम आहे. त्यातील दोन प्रकट गंगा आणि यमुना; आणिक एक गुप्त सरस्वती. सामान्यत: भक्त व नाम प्रकट व भगवंत गुप्त. त्यानंतर भक्त व भगवंत राहतात. नाम गुप्त होते (म्हणजेच परावाणीपर्यंत जाऊन पोहचते) व त्यानंतर नाम व भगवंत राहतात, भक्त हा गुप्त होतो (म्हणजे भगवंतापेक्षा वेगळा न राहता, भगवंतात विलीन होऊन जातो)

वरील तीनही अर्थांनी भगवंत, भक्त आणि नाम यांचा त्रिवेणी-संगम सिद्ध होतो. श्रीतुकोबाराय पण सांगतत, **''कक्षा त्रिवेणीसंगम। देव भक्त आणि नाम। तेथीचे उत्तम। चरणरज वंदिता।।''** भक्त भगवत्स्वरूप होऊन राहतो त्यावेळी देव आणि नाम एवढेच प्रकट उरते. ही सर्वश्रेष्ठ अवस्था अगर पायरी आहे. आपले श्रीगुरूज्ञानोबारायच प्रमेय सांगतात, **''ऐसे मीची होऊन पांडवा। करिती माझी सेवा।।''** (म्हणजेच नामसंकीर्तन) अशा सेवेत आंत चिन्मयस्वरूप/आनंद प्रकट झाल्याने गंगा, यमुना, सरस्वती, वगैरे नद्या याच्या म्हणजे नामधारकाच्या चरणसलिली मज्जन म्हणजे स्नान केल्याने पावन होतात. **''तीर्थ तया ठाया। येती पुनीत व्हावया। पर्वकाळ पाया। तळी वसे वैष्णवा।।''** एवढा नामाच्या पुण्याईचा प्रताप नाथराय सांगतात.

साधनकाळात होणारे दर्शन हा भाग आपला मनोभाव व मनोवृत्ती आपल्याला दाखविणारा आरसाच आहे. पण आपण नामधारकांनी त्यापासून मिळालेल्या सूचना ओळखून आपल्या साधनाच्या प्रगतीकरिता, त्यांचा उपयोग करून घ्यावयास हवा नाही का? अनुभवाला येणारा प्रकाश, सुगंध यांचा जास्तीत जास्त उपयोग करून घ्या. याने काय होईल तर नामस्मरण, साधनेला परिपक्वता येईल. रामस्मरणाचे वेळी आलेले अनुभव, त्याचे श्रेय साधकालाच आहे. दृष्टांताचे बाबतीत हेच प्रमेय खरे आहे. भविष्याची कल्पना

अशा दृष्टांतात येऊ शकते व त्या पारमार्थिक घटना त्या दृष्टांताप्रमाणे घडूनही येतात.

नामधारकांनी अनन्य शरण असावे. भगवंताला/श्रीगुरूला अंत:करण पाझरले की भगवंत लवकर भेटतो बर!!! तेरा कोटी यातला तेरा शब्दाचा लक्षार्थ १३ हा आकडा नसून हिंदू भाषेत **''तेरा हूँ, तेराही हूँ।''** असा आहे. **''तुझा आहे, फक्त तुझाच आहे''** अशी अवस्था अंत:करणाची झाली, मग देव दिसतोच दिसतो. नुसत्या १३ कोटी जपाने काय पण त्याहून अधिक कोटी जपाने देव दिसणार नाही. भाव महत्वाचा आहे. 'तेरा' हा भाव ज्या क्षणी त्याच क्षणी भेटतोच भेटतो. नुसता भेटत नाही, तर हसतो, बोलतो, डोलतो, नाचतो आणि सुखसंवाद साधतो. दोवरी दोन भुजा घेऊन उराउरी आलिंगन देतो.

हे आगळे वेगळे भक्तिप्रेमसुख हीच वैष्णावांची श्रीमंती, संपत्ती, धन. ते कोणी चोरू शकत नाही; ते वेचून कमी होत नाही तर नित्य निरंतर वेचत राहिल्याने म्हणजे अनुभवत राहिल्याने वाढतच जाते. **''प्रतिक्षण वर्धमानम्।''**

* * * *




भगवंताचे दर्शन आणि तद्व्यतिरिक्त अन्य पदार्थ पहाणे यात महदंतर आहे. भगवंत आतून प्रकट होतो. तर इतर जड वस्तू मात्र दिसत/पहात असतानाही बाहेरच असतात. भगवद्दर्शनाचे मात्र तसे नाही. **''बाहेरि भितरि तुजच मी देखे''** अगर **''आंत हरि, बाहेर हरि। हरिने घर कोंदले''** असे ते दर्शन आहे. श्रीगुरूज्ञानोबाराय हरिपाठाची फलश्रुती सांगताहेत ती अशीच, **''भरला घनदाट हरि दिसे।।''**

बाह्य इंद्रियजन्य (डोळ्यांच्या माध्यमातून) पाहण्यात दृश्य, पांचभौतिक वस्तूची नितांत आवश्यकता असते; एवढ्यानेपण भागत नाही, दृष्टी चांगली हवी; प्रकाशाचेपण माध्यम हवे; जागृत अवस्था पाहिजे; बुद्धी हवी आणि अशा कितीतरी गोष्टी; परंतु भगवद्दर्शनाची गोष्टच वेगळी.

भगवद्दर्शनात वस्तू निर्माण करावयाची अथवा व्हावयाची हा प्रकार नाही; तर तो ओतंच-प्रोतंच आहेच; एवढेच नाही तर स्वयंप्रकाश आहे. त्याला पाहाण्यासाठी, जड प्रकाशाची गरज नाही; चर्मचक्षूंची आवश्यकता नाही. म्हणून तो भगवंत अंधारात (जड), दिसतो; डोळे मिटलेले असतानाही दिसतो. भगवंताच्या सत्यस्वरूपासंबंधी हा एक महत्वाचा मुद्दा नेहमी लक्षात ठेवला पाहिजे. भगवंताच्या अस्तित्वाचे ज्ञान हे जड बुद्धीला नाही तर ऋतंभरा प्रज्ञेला होते. नामाशी मन तादात्म्य पावल्यावर, जो अनाहत नाद, अनुसंधानाने ऐकू येतो तो भौतिक चामड्याच्या कनांनी नाही. आत्मारामापासून निर्माण होणाऱ्या आंतरिक प्रेरणास्त्रोतांतून तो ऐकू येतो.

"**यद् दृष्टम् तन्नष्टम्**" या न्यायाने पाहू जाता मग भगवद्दर्शन पण नाही का संपणार? असे कोणी बिचारा जर विचारील तर त्या बिचाऱ्याला काय माहीत की या जड आणि चेतन दृष्टम्‌चे स्वरूपच मुळात अगदी भिन्न आहे.

मानवाचा सगळाच्या सगळा मेंदू (लहान) पहातो; ऐकतो व विचारपण करतो; असा एक आगळा-वेगळा सिद्धांत पाश्चात्य शरीरशास्त्रवेत्यांनी प्रचलित केला आहे. त्यांच्या मते या लहान मेंदूतील प्रत्येक पेशी-पेशीत पाहण्याची, ऐकण्याची, विचार करण्याची शक्ती आहे. ते एका विशिष्ट केंद्राचेच काम नाही; तर मेंदूचा इतर भाग ते काम अंगावर घेऊ शकतो. या सिद्धांतानुसार मग कानांनी पहाणे; डोळ्यांनी ऐकणे हे काहीच अशक्य नाही. (गुरूदेवांच्या जीवनातील बिनसाखरेच्या शिऱ्याचा प्रसंग) आपले श्रीगुरूज्ञानेश्वर महाराजांचे एक असेच वचन आहे. ते म्हणतात, "**अंधळ्याने देखिले, बहिऱ्याने ऐकिले।**" हा अध्यात्मिक अनुभव विश्वमान्य आहे. या अनाहत नादाच्या अनुभवाबाबत आपलेच आत्मसाक्षात्कारी संत काय? पण महंमद पैगंबरही म्हणतात, "**माझ्या बरगड्या-बरगड्यातून एक अनाहत नाद सारखा अखंडपणे घुमत आहे.**"

आता हा भगवंत सगुण का निर्गुण? कशाला हवा वाद ना? खरे पाहिले तर मुळी सगुण-निर्गुणाचा भेदच खोटा आहे. देव केवळ सगुण नाही तसाच तो केवळ निर्गुणही नाही. तर तो सगुणनिर्गुण आहे. आपले ज्ञानोबाराय सांगतात नां!!! अगदी निर्णयात्मय आणि स्वानुभवातून की, "**सगुण निर्गुण एक गोविंदु रे।**"

मग आपण नामधारकांनी उपासना कशाची करावयाची? चार हातांच्या मूर्तीची की विश्वरूपाची? केवळ निर्गुण-अव्यक्त स्वरूपाची उपासना अवघड. त्यात आनंदापेक्षा क्लेशच अधिक ना??? मग उपासना सगुणनिर्गुण अशा

गोविंदाची. आत्मारामाची प्रकाशकता सगुण आणि त्याचा अनाहत नाद निर्गुण नाम हे प्रकाशस्वरूप असून नादमय आहे. प्रकाशापेक्षा नादात तल्लीन होण्याची शक्ती जास्त आहे. म्हणून या अखंड चालणाऱ्या अनाहत नादाकडे लक्ष-अनुसंधान राखणे म्हणजेच परावाणीतून होणारे नामस्मरण.

* * * *




परब्रह्मपरमात्माच षड्गुणैश्वर्यभगवंत म्हणून नटतो. भक्ताकरता तो नटवर, लीलापुरूषोत्तम होतो. जो क्षराक्षरापेक्षा वेगळा उत्तमपुरुष तोच हा नटवरवपू, नंदलाल, यशोदातनय आणि गोपीजनवल्लभ, बन्सीधर गोपीमानसमनरंजन आणि गोपीमानसमराळ कन्हैय्या.

या गोपींची अशा या चित्तचोराच्या ठिकाणी भक्तिप्रेमवृत्ती जडली. त्यांना एका कृष्णाशिवाय दुसरे काहीच आवडेनासे झाले. आठवेनासे झाले. काम करताना, उठताना, बसताना, देता, घेता, जेवता, झोपता, घरी, दारी, एकच एक चिंतन ''**श्रीकृष्ण**'' असे त्यांच्या चित्तात एकच चिंतन; मनांत एकच ध्यान; बुद्धिचा एकच निश्चय, अहंकाराचे आलंबनसुद्धा एक कृष्ण आणि कृष्ण. अशा त्या गोपी आपले मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार या सगळ्या स्तरावर केवळ कृष्णमयच झाल्या होत्या.

त्यांना ''**मनमोहन मुरलीवाला, नंदाचा अलबेला**'' अशा नंदलालाचा वेणूनाद सतत ऐकावयास मिळायचा. त्यांच्या हृदयात तो नाद सतत घुमतच राहावयाचा.

अशा या दिव्य वेणूनादात गोपींचा देहभावच विरला होता. त्या कौतुकाने विचारावयाच्या, ''कान्हा, ए सावळ्या, घननीळा, घनश्यामा कशी रे इतकी गोड बासरी वाजवतोस???'' तर कधी पुन:पुन: आग्रह करावयाच्या, ''**कान्हा बजाव बजाव मुरली.**'' कधी या गोपी एकमेकीस या वेणूनादाची, वेणूमाधुरीची मधुरता कथन करावयाच्या. अशा वेणूनादात त्या थंड, उष्ण, पाऊस, पाणी,

भूक, कष्ट सार-सार विसरावयाच्या. अस सर्वांगांनी स्वत:ला विसरल्या होत्या, म्हणूनच ही वेणूमाधुरी सातत्याने अनुभवत होत्या.

त्या गोपींसारखा, आपण आपला काळ, अखंड भगवंताच्या अमृताहून मधुर असणाऱ्या नामात-नामस्मरणात-नामचिंतनात म्हणजे काय तर एका भगवत्‌चिंतनातच घालवला तर निश्चितच प्रभुदर्शन, प्रभुभेट, प्रभुशी प्रेमळ सुखसंकर, वार्तालाप झाल्याशिवाय राहात नाही. मग अशाच चिंतनकाळात तो वेणूनाद!!! मुळी नामधारकाला आपल्या हृदयाच्या गाभाऱ्यात सातत्याने ऐकू येतो. ह्यालाच, ह्या नादालाच योगशास्त्रकार साक्षात्कार शास्त्र, अनाहत नाद असे म्हणतात.

अशी ही बासरी किती भाग्यवान् ना??? गोपी म्हणत, पहा ही बासरी, अनेकजणांच्या उपस्थितीत, डोळ्यांसमोर, या श्रीरंगाच्या ओष्टद्वयात विलसत असते; काय साधन केल असेल या बासरीन? सतत या रंगनाथाच्या अधरामृताचे प्राशन करते. साक्षात् लक्ष्मीनाही हीच्या या भाग्याचा हेवा करावा ना???

आपल्याला अस बासरीसारख होता आल पाहिजे. बासरी आतून पोकळ असते. आपल्या अंत:करणात विती-वितीला गाठ!!! आणि बासरी? या टोकापासून त्या टोकापर्यंत अगदी मोकळी आणि सरळसोट. वक्रता नाही. आपल्या मनबुद्धीत अनाठायी विविधप्रकारचे जडाचे ज्ञान; जडाची सत्यता; जडाचे प्रेम. ते सर्वच्या सर्व हृत्कमलनिवासी आनंदकंदास समर्पित करून मोकळ, रित, पोकळ होता आल की मग तो प्रभूच ती पोकळी भरून टाकतो. आपल्या वेणूनादातून; अनाहत संगीतातून आपल्याला प्रेमभराने थोपटून स्वानंदसुखशय्येवर झोपवत असतो. आपले ज्ञानोबाराय याच वर्णन छान करत आहेत. श्रीगुरू म्हणजेच परब्रह्मपरमात्माश्रीकृष्ण **''सतरावियेचे स्तन्य देसी।**

**अनाहताचा हल्लरू (म्हणजे अंगाई गीत) गासी। समाधि बोधे निजविशी। बुझाहूनी ।।**''

बासरी स्वत: वाजत नाही. तर ती ''**वाजवितियाचेनि वाजे**.'' तिला वाजवणारा लागतो आणि हा वाजवणारा आहे श्रीकृष्णपरमात्मा वंशीविभूषित आणि त्याचे हे बासरीवादन आहे ते फक्त गोपी आणि गोपीभाव (म्हणजे गोपींसारखा भक्तीप्रेमभाव ज्यांच्या ठिकाणी आहे) असणाऱ्या भक्तांकरता. अशा भक्तांकरताच तो वाजवतो, त्यांनाच ऐकवतो.

हा वंशीनाद ऐकण हा स्थूल अशा श्रवणेंद्रियाचा विषय नव्हे; तर तो सप्रेम हृदयाचा भाग आहे. आपल हृदयकमळ या प्रेमळजनप्रांजळ श्रीकृष्णाच्या, लालाच्या हाती सोपवल्याशिवाय हे मधुर बासरीवादन ऐकता येत नाही.

हा वेणूनाद, नादब्रह्म आहे. हा नाद जडातही चैतन्य प्रकट करत असतो. वृक्षवेली डोलतात; हिंस्त्र पशू आपली क्रूरता विसरले असा हा दिव्य नाद. हा नाद सच्चिदानंद आहे.

नामस्मरणाने हा नाद आपल्या रंध्रारंध्रात भरून उरतो. अशा नादाने भारावल्यावर मग कृष्णदर्शन नित्य, अखंडत्वाने आणि कस? तर हलणारा, डोलणारा, नाचणारा, मनमोहन आनंदकंद देवकीनंदन, आपल्याला पण या भक्तिप्रेमसुखात हलायला, डोलायला, नाचायला लावणारा अशा चिदानंद स्वरूपात!!!

* * * *

# चिंतन १३५

आत्माराम अंगठ्याएवढा आहे व तो अखंड दंडायमान असून सदैव भूतमात्राच्या हृदयात वास करून असतो. याला कित्येक उपनिषद्वाक्ये प्रमाण आहेत. हा सच्चिदानंद, आनंदघन, स्वयंप्रकाश ''आत्मा'' हेच आपल सर्वांच निजस्वरूप आहे. बघा ना!!! अगदी साधी गोष्ट आहे पहा!!! 'मी' 'मी' म्हणत असताना आपणा सर्वांचा हात कोठे जातो? तर आपल्या हृदयस्थानी ना? का तर उपनिषद्वाक्याप्रमाणे आत्मारामाचा चिदाभास आपल्या हृदयात आहे म्हणून.

अत्याधुनिक तत्ववेत्ते अस म्हणतात की मेंदूच्या कार्याचा, माणसाच्या आचार-विचारांवर व भावनांवर प्रत्यक्ष मोठाच प्रभाव असतो. या विचार-भावनांचा संबंध, घनिष्ठ संबंध शरीराच्या ज्या भागाशी निगडीत असतो; तेथे आत्मारामाचे वास्तव्य असते असे जर मानले तर मग आत्मारामाचे स्थान मेंदूमध्ये आहे असे मानावयास हवे. आत्माराम हृदयातून एक गोलकातून मेंदूकडे जातो असे उपनिषदात म्हटले आहे. हा गोलकाकार अवयव म्हणजे पिट्युइटरी ग्लॅंड असू शकेल.

ह्या सगळ्याचा निष्कर्ष एवढाच की आत्माराम व्यापक आहे. ही व्यापकता निरपेक्ष आणि अमर्याद आहे.

नामस्मरणाने अशी व्यापक आत्मारामाची व्यापक अध्यात्मशक्ती शरीरात निर्माण झाली म्हणजे आतून त्या शक्तीच्या सर्व ज्ञानेंद्रियांवर सर्वांगीण स्वरूपाचा असा परिणाम होतो आणि यामुळेच नाद, बिंदू, कला व प्रकाश-ज्योती असा परमात्मवस्तूचा अनुभव यावयास लागतो. ही जागी व कार्यरत झालेली आत्मशक्ती अनंत असल्यामुळे या अनुभवांना अंतच नाही. ही शक्ती

अमर आहे. तिचा लाग लागत नाही. याच शक्तीतून विश्व आकारास येते व तिथेच त्या शक्तीतच त्याचा लय होतो. ही शक्ती आपल्यामध्ये उत्पन्न होण्याचा, वाढण्याचा व दृढ होण्याचा एकमेव मार्ग म्हणजेच एकमेव नामस्मरण **Absolute, God, Dinvinity** हे सगळे एकच.

तीर्थक्षेत्रास जाणे म्हणजे मोठे पुण्य आहे असे फार लोकांना वाटत असते. ''**तीर्थी धोंडा पाणी। देव रोकडा सज्जनी।।**'' या श्रीतुकोबांच्या किंवा ''**उगाच वणवण हिंडोनी। काय होते?।।**'' या श्रीसमर्थ वचनानुसार देव सापडण्यास तीर्थक्षेत्री जाण्याचे काही कारण नाही. ''**ठायीच बैसोनि करा एकचित्त**'' या श्रीतुकोबारायांच्या सांगण्याप्रमाणे देव आपल्या आतच शोधावयाचा आहे की जो आपल्यातच आहे. आतल्या देवाचा शोध लागला की मग तो बाहेरही सर्वत्र दिसू लागतो. ''**आंत हरि, बाहेर हरि.**'' आतला देव पाहण्यासाठी नामाचा दिवा. न्यायशास्त्रात एक ''**देहली दीप**'' न्याय आहे. त्याचा अर्थ असा, उंबऱ्यावर दिवा ठेवला की ''**आंत-बाहेर**'' प्रकाश पडतो. असा नामाचा नंदादीप आपल्या परावाणीच्या ठिकाणी लावावयाचा. मग ''**अवघा जनी प्रकाश.**''

भगवंताचा असा अनुभव आतून येतो. तो बाहेरून आत घालता येत नाही आणि या अनुभवाचा महापूर उपयोगाचा नाही. तर पाझर हवा. महापूर येतो तसा ओसरतो पण पाझर अखंड स्त्रवत असतो.

असा पाझर/निर्झर, अखंड स्त्रवण्यासाठी आपण भगवंताचे अमृतस्वरूप नाम अखंडच घ्यावयास हवे नाही का? अशी नामामृताची अखंड धार धरल्यावर सतत अमृतानुभव प्राप्त होत असतो. काया, वाचा, मन, बुद्धी या स्तरावरील कोणतेही कार्य/क्रिया अमृतपानच असतात.

* * * *

# चिंतन १३६

गुरूशिष्याचे नाते अखंड, अद्वय आणि अतूट असेच असते. या अत्यंत हृद्य आणि परमपवित्र, श्रेष्ठ अशा नात्याची कधीच समाप्ती होत नाही. याचे कारण फक्त एकच. देहात्मभाव हा विचार त्यात संभवतच नाही. प्रथम अज्ञानकार्य असलेला देहभाव, गुरुशरण्यभावातून हळूहळू तरल होता होता, विरूनच जातो. तो कोठे विरतो? तर एक श्रीगुरूस्वरूपी, श्रीगुरुतत्वातच. श्रीगुरूंच्या अगाध स्वरूपात अलौकिक, अद्वितीय, निरपेक्ष, निरलय, निरामय आणि अगदी निरूपचार असा प्रेमभाव अनुस्यूत असतो.

या भक्तीप्रेमभावातून निर्माण होणारा अनुराग शिष्याला विरागी करतो. विरागी म्हणजे अत्यंत साक्षेपाने राहण्याचे अफाट सामर्थ्य त्याच्यात निर्माण करतो. श्रीगुरूंची सद्‌गुणविषयक प्रेरणा ही अत्यंत श्रेष्ठ फलदायी असते. एक सर्वोत्तम भगवंतच त्यांना अभिप्रेत असतो. आपल्या शिष्याला स्वरूपस्थितीचा आत्मप्रत्यय प्राप्त व्हावा अशीच त्यांची धारणा असते. हीच धारणाशक्ती शिष्याला शिष्योत्तम, अंतररंगशिष्य आणि श्रीसद्‌गुरूमय करून टाकते.

श्रीगुरु जरी एखाद्या संप्रदायाचे असले तरी ते सांप्रदायिकत्व हे शिडीसारखे असते. त्यामुळेच ही स्थूल सांप्रदायिकत्वाची चौकट गळून पडते. ''गुरु-शिष्य'' एकरूपच होतात. त्यातून एक महाभक्तिप्रेमभाव आकारास येतो. या महाभावातूनच सत्‌शिष्य कर्मातीत, देहातीत, सांप्रदायातीत, विकारातीत, विचारातीत होतो. निजबोधाने ऐश्वर्यसंपन्न होतो. शिष्याला आत्मप्रतीती प्राप्त होते. सर्व जीवनरसात त्याला मग एका ब्रह्मरसाचा, आनंदरसाचाच अनुभव अखंड येत असतो.

सर्व संतमहात्म्यांनी या श्रीगुरूंचेच चरण आधी धरावेत असे अवर्जुन सांगितले आहे. **"धरावे ते पाय आधी आधी ।।"** असे श्रीतुकोबाराय द्विरुक्तीने सांगतात. या पाय धरण्यातच ब्रह्मचैतन्याच्या, सदानंदाच्या अनुसंधानाची खरी गुरूकिल्लीच आहे. कृतज्ञता, विनय, शालीनता आणि दृढ अशी शरणागतता यातूनच श्रीगुरुप्रसाद मिळतो. गुरुकृपेचा अखंड वर्षाव होतो. श्रीगुरूचरणच कसे प्रसादरूप होतात याची प्रचिती गुरूसेवेतून प्रत्यक्ष अनुभवास येते.

श्रीगुरूंचा अनुनय, सेवा म्हणजे आपल्या आत्मस्वरूपाचाच अनुनय. याला म्हणजे अनुनयाला स्तरच नाहीत. यात सर्वात्मकभाव व्यापकपणे असल्याने कमी-जास्तपणा संभवतच नाही.

या सेवेची सुरवात जरी काल्पनीक द्वैतभावातून वाटत असली तरी ती अद्वैतभावाला, व्यापकतेलाच जाऊन पोहोचते. या विकसीत, उन्नत, अद्वैतस्थितीत, आसक्तीविरहित भोग, संघर्षविरहित जीवन, शत्रूविरहित जगमैत्री, आपल्यातील सच्चिदानंदस्वरूपाची जाणीव, या प्रत्ययाची लयलूट होते.

श्रीगुरूकृपाप्रसादातून प्राप्त होणारा आत्मबोध हा वेदशास्त्रांच्याही पलीकडील असतो. जे परमतत्व (म्हणजे भगवंत) अगम्य आहे, अनंत आहे, अबाधित आहे, शाश्वत आहे, निरंजन आहे, ते भावगम्य होते, सुखावते, बोध करते, आनंद वाढतो. या सर्वांतून भक्तिप्रेमभाव वाढतो.

श्रीगुरूंना माऊली म्हणतात. या शब्दात वात्सल्य, प्रेम, अविरत शिष्यकल्याणाची काळजी, त्याच्या परमार्थसंकल्पाची जपणूक या आणि अशा कितीतरी शिष्यकल्याणाचाच निरंतर ध्यास असतो. यासाठी ते शिष्याच्या शुद्ध हृदयातच वास करून असतात. आपले ज्ञानोबाराय म्हणतात ना, **"मज हृदयी सद्गुरू ।"** मग आपण काय अनुभवावे? तर श्रीगुरूंचेच अखंड सान्निध्य. निकटवास, सहवास, संगती.

* * * *

# चिंतन १३७

राग-लोभ हे सगळे एका मर्यादेपर्यंतच असतात. जीव आपला आपण आपल्यावर थोडाच रागावतो. "**जीभ दातांनी चावली। कोणे बत्तीशी तोडिली?।। हात आपला आपणा लागे। त्याचा करू नये खेद।।**" रागवायला थोडे तरी द्वैत हवे ना? अद्वैतानंदात राग उरतच नाही. शिल्लक राहिलेला असतो तो फक्त अनुराग-भक्तिप्रेमभाव.

"**दसरा सण मोठा-आनंदा नाही तोटा.**" खर तर आनंद आपल्या सर्वांच्या अंतर्यामीच असतो; तरी पण मनुष्य आनंदाचा शोध बाह्य जगतामध्ये करत असतो. आनंद तर वास्तविक आपल्या स्वत:च्या स्व-रूपातच आहे. ह्या स्वरूपभूत आनंदास कसे प्रकट करावयाचे, आनंद कसा अनुभवावयाचा हे भागवतशास्त्र आपल्याला शिकवते. दूधात लोणी असतेच; तरी ते आपल्याला दिसत नाही; पण जर त्याच दूधाचे विरजून, दहीमंथन केल्यावर लोणी हाताशी येते ना? अगदी याच प्रमाणे मानवमात्राने आपले-आपले मनोमंथन करून आनंद-स्वानंद अनुभवावयाचा आहे.

महाभागवत, वैष्णव, योगीजनांजवळ कोणतेही बाह्य सुखसाधन नसतानाही ते नेहमीच आनंदात असतात. हा स्वयंसिद्ध असा आनंद आहे. सत्-चित्त् आणि आनंद भगवंतात परिपूर्ण भरलेले आहेत. तो प्रत्यक्ष आनंदस्वरूप-आनंदघनच आहे.

आता श्रीकृष्णच बघा ना!!! सर्व यदुकुळाचा संहार होत असतानादेखील त्यांचा आनंद कायमच आहे. कारण तो स्वत: आनंदस्वरूप आहे. मनुष्य

आपल्या स्व-रूपात स्थित होत नाही. म्हणून मग त्यास आनंद मिळत नाही. मनुष्य बाहेर समाजात वागताना जसा गोड बोलतो, विवेक ठेवतो, प्रसन्न असतो, तसा घरात ठेवत नाही; घरात जरा धुश्शातच. का बाबा असं?आत एक बाहेर एक. पण भगवंत पहा. उत्पत्ती, स्थिती एवढंच काय संहारलीलेत सुद्धा त्याच्या स्वरूपात काहीच परिवर्तन होत नाही. आनंदकंद-नंदनंदन संहारदेखील आपली लीलाच समजतो. भगवान तिन्हीतही आनंदातच असतात आणि आपल्या निजानंदात निमग्न असतात.

ज्याचे ज्ञान नित्य टिकते त्यासच ह्या निजानंदाचा-स्वरूपानंदाचा प्रत्यय येत असतो. जीवास जर आपल्या मूलभूत निजानंदस्वरूपी एकरूप व्हावयाचे असेल तर त्याने सच्चिदानंदाचा आश्रय घेतला पाहिजे, त्या आनंदघनश्यामाशीच अनन्य, एकरूप, एकरस, समरस झाले पाहिजे. आनंदकंदास सोडून जीव कसा परिपूर्ण आनंदी होणार सांगा बरे!!!

परिपूर्ण आहे एक भगवान् नारायण, या नारायणाशी जो जीव परिचय करून घेतो, परिचय वाढवतो, नाही-नाही नारायणाशी जो आपले मन तदाकार करतो तोच या नारायणस्वरूपी एकरूप होतो. म्हणजेच मुळी आनंदघनराम होतो.

श्रीकृष्ण चरित्राचा, लीलांचा हेतू काय आहे? त्याच्या लीलांचे, चरित्राचे चिंतन-स्मरण करणाऱ्या गोपी स्वतःच्या स्वरूपातसुद्धा एका भगवंताचा-श्रीकृष्णाचाच अनुभव घेत असत. "**लाली देखन मैं गई, मैं भी हो गई लाल ।।**" गोपींना आपल्या स्वचे विस्मरण होऊन त्या म्हणत असत "**मीच श्रीकृष्ण आहे.**"

ज्यास आपल्या स्वतःतच भगवंताचे दर्शन होत असते तोच भगवत्स्वरूप होऊन जात असतो. (श्रीरामकृष्णपरमहंस आठवा). असं श्रीकृष्णरूप

आनंदरूप होऊन जाण ही श्रीमद्‌भागवताची फलश्रुती आहे.

या भक्तिप्रेमरसामुळेच अंत:करणात प्रेमाचा झरा आणि डोळ्यात प्रेमपाझर असा महाभाव निर्माण होते. हे प्रेमाश्रू गंगोदकापेक्षाही पवित्र असतात. अशा अश्रूंनी चरणकमळ प्रक्षालन करणे हे अतिरुद्रापेक्षा कितीतरी पटींनी श्रेष्ठ.

याच भक्तिप्रेमपाझराने माणसातील क्षुद्रत्व, पशुत्व आणि निचत्व दूर होऊन भव्यत्व, देवत्व आणि उच्चत्व निर्माण होते. शुद्ध, अकृत्रिम आणि निष्काम भक्तिप्रेमभावानेच जगन्नाथ, ब्रह्मांडनायक, रमाकांत, बांधला जातो. आपला होतो. आपणच येऊन आपण होऊन राहातो.

* * * *

# चिंतन १३८

सत्कर्मामध्येसुद्धा अनेकानेक विघ्ने ही येतच असतात. त्या सर्वांच्या निवारणार्थ भगवंताच्या मंगलाचरणाची म्हणजेच प्रार्थनेची नितांत आवश्यकता असते. शास्त्र तर सांगते की स्वर्गातील देवदेखील आपल्या-साधकाच्या सत्कर्मात व्यत्यय आणीत असतात; कां? तर त्यांना ईर्षा वाटू लागते की, हा नारायणाचे ध्यान करून आपल्या समान (?) झाला तर? आपल्या सुखोपभोगात वाटेकरी होणार!!! पण वैष्णवांचे ध्यान-भजन-पूजन-सेवा स्वर्गीय सुखासाठी नसून एक केवळ भक्तिप्रेमसुखासाठीच असते नाही का? पण स्वर्गातल्या देवांना याची काय आणि कशी बरे कल्पना येणार? म्हणून त्यांची पण प्रार्थना करावयाची. **''हे देवांनो, आमच्या सत्कर्मात विक्षेप करू नका, बाबांनो; सूर्य आमचे कल्याण करो. वरूणानेही आमच्यावर कृपाच करावी.''**

देवांचे काय, पण ज्याचे आचरण मंलमय असते त्याचे ध्यान केल्याने, त्याला वंदन केल्याने, त्याचे स्मरण केल्याने, मंगलाचरण होत असते. परमात्मा तर मंगलधाम आहे. भगवान् श्रीकृष्णाचे नाम आणि धाम दोन्ही पण मंगलमयच आहेत. म्हणून त्याचे नाम आणि त्याचेच ध्यान करावे. कोणत्याही संसारिक जीवाचे किंवा वस्तूचे चिंतन कधीच करू नये. भगवंताचेच चिंतन-स्मरण-ध्यान जर मनुष्य करेल तर त्याला भगवंताचीच प्राप्ती होईल ना?

भगवंत पूर्णत: निष्काम आहे, निरामय आहे; नित्य आहे. म्हणून त्याचे नाम त्याचेच स्मरण आणि चिंतनपण त्याचेच. भगवान श्रीकृष्णाचे सतत

चिंतन-स्मरण-ध्यान एक वेळ सातत्याने न होऊ शकले तरी काही हरकत नाही; पण या दृष्य जगाचे, जगांतील अनित्य वस्तूंचे, जीवाचे ध्यान कधीही करू नये बरं!!! यांचे चिंतन केल्याने मन विकृत, जड, बधीर, सैरभैर होते तर भगवंताचे मंगल चिंतन केल्याने मन सुधारते, सत्-चित् आणि आनंदस्वरूप होते.

व्यासांसारख्या महात्म्यांनी आपल्या ध्यानचिंतनातील अनुभवातून सांगितले की भगवंताच्या एकाच स्वरूपाचे (आपल्याला अत्यंत आवडणाऱ्या) सातत्याने वारंवार चिंतन करा. मनाला त्या भगवंताच्या मधुर स्वरूपात स्थिर करा. एकाच स्वरूपाचे वारंवार चिंतन घडल्याने, मन लवकरात लवकर एकाग्र होते आणि ती एकाग्रता भगवत्‌चरणारविंदी झालेली असते. परमात्म्याच्या आपल्याला अत्यंत प्रिय असणाऱ्या सगुण स्वरूपास इष्ट मानून त्याचे ध्यान करा. ध्यान म्हणजे, प्रभूचे मानसदर्शन. परमेश्वराच्या ज्या सगुणस्वरूपाने आपल्याला परमानंद होतो तेच स्वरूप आपल्याला उत्तम श्रेयस्कर.

भगवंताची अनेक रूपे आहेत; परंतु तत्व एकच आहे. दिव्याच्या समोर ज्या कोणत्या रंगाची काच धरावी त्याच रंगाचा प्रकाश दिसतो. कोणाही परपुरूषाने राधेच्या महालात प्रवेश करता कामा नये अशी वृषभानूची आज्ञा!!! मग श्रीकृष्णाने चंद्रावलीचा शृंगार करून राधेची भेट घेतली. जरी चंद्रावलीच्या रूपाने नटला तरी श्रीकृष्णच नां? "**एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति।**"

नमस्कार सगळ्याच देवांना करावा; पण ध्यान मात्र एका कोणा इष्ट-प्रिय देवाचेच करावे. नाम एकाचेच आणि एकच घ्यावे. ज्या कोणच्या स्वरूपात विशेष आस्था, रूची, प्रेमभाव असेल त्याचेच ध्यान करावे नां? ध्येय, ध्याता आणि ध्यान यामध्ये एकत्व असणे फार मोलाचे, महत्वाचे आणि अत्यावश्यक

आहे आणि असे एकत्व साधल्यानेच परमानंदाचा लाभ होत असतो. तेव्हा चैतन्यमय अशा श्रीपांडूरंगाचे ध्यान करा, नाम घ्या (रामकृष्णहरि), चिंतन-स्मरण करा.

अनेक जन्मापासून या मनाला भटकत राहण्याची सवय/चटक लागलेली आहे. ध्यानात प्रथम-प्रथम संसाराचे विषय येतातच. ते मनात येऊ नयेत म्हणून ध्यान करतांना भगवंताच्या अमृतस्वरूप गोड नावाचे सतत स्मरण करावे, म्हणजे त्यायोगे मन स्थिर होते. ‘‘**आता कोठे धावे मन? । तुझे चरण देखिलिया ।।**’’ त्या भगवंताला डोळे भरून पहा; वाचेने त्याचे नाम आणि चित्तात त्याचे स्मरण.

* * * *

# चिंतन १३९

भक्तिप्रेमभावाच्या आरंभी द्वैत असते. परमप्रेमास्पद भगवंत आणि भक्तिप्रेमभावांनी आतुर झालेला भक्त वेगवेगळे असतात. जसजसा काळ जातो, तसतसे भक्तिप्रेम वाढत जाते. भक्त आणि भगवंत दोघांनाही एक होण्याची इच्छा होते. 'मी' आता 'तू' होण्याची इच्छा करू लागतो. मग अद्वैताची भावना उदयास येते, वाढीस लागते. अखेर अद्वैतसिद्धी होते. 'मी' नाहीसा होऊन 'तू' होऊन राहणे, स्वत:ला परमप्रेमास्पद भगवंताशी कायमचे मिळवून टाकणे, परमप्रेमस्वरूप परमात्म्याशी सायुज्यसिद्ध होणेच म्हणजेच परमभक्तिप्रेम.

परमानंदस्वरूप परमात्म्याला नुसते पाहून, भेटून केवळ दर्शनमात्रे प्रेमळभक्त तृप्त होत नाही; त्याला भगवंताशी एकरस, एकाकार, एकरूप होण्याची ओढ असते.

दर्शनात द्वैत असते. अनुभवात अद्वैत असते. गंगा सागराला नुसती पहात नाही; नुसती भेटत नाही, तर त्याच्याशी एकरूप होऊन राहाते. "**तुका म्हणे गंगा–सागर संगमी। अवघ्या झाल्या ऊर्मि एकमय।।**"

पतीविरहात ज्याप्रमाणे पतिव्रता जळत असते, त्याचप्रमाणे भगवंताच्या, सच्चिदानंदाच्या विरह जीवाला (जो जीव भगवंताच्या आनंदकंदाच्या भक्तिप्रेमाने नटला आहे, शृंगारीत झाला आहे) जाळत असतो.

जीव असा भक्तिप्रेमाने नटून भगवंताला भेटायला आतुर झाल्यावर मगच रासलीला. जीवा–शिवाचे मिलन म्हणजे रास. भक्तितीर्थात सुस्नात होऊन

शुद्ध झालेल्या भक्ताचे भगवंताबरोबर ऐक्य म्हणजेच रास. रास म्हणजे रस. रसरूप, रसराज एक फक्त आनंदकंदच . या रसामध्ये आत्मारामाचे आणि परमात्म्याचे निर्लेप, निर्विकार मीलन आहे. असा महारस अनुभवण्यासाठी की ज्या अनुभवात द्वैत उरतच नाही; अतिशय व्याकूळता, उत्कटता पाहिजे.

रामकृष्ण परमहंस नेहमी दृष्टांतासह सिद्धांत सांगत. एकदा एका शिष्याने विचारले, ''कशी ओढ पाहिजे?'' तेव्हा राकृष्ण म्हणाले, ''हा विषय वर्णनाचा नव्हेच. शब्दातीत असा अनुभवाचा आहे. रामबाण ज्याला लागला असेल तोच त्याची वेदना जाणू शकतो नां!!!'' एकदा ते दोघे स्नानाला गेले. शिष्याने पाण्यात बुडी मारल्यावर श्रीगुरूंनी त्याचे डोके बळेच पाण्यात दाबून धरले. श्वास घ्यावयास त्रास होऊ लागला तसा शिष्य कासावीस झाला; तडफडू लागला. पाण्याबाहेर येण्यासाठी व्याकुळ झाला. श्रीगुरूंनी हात उचलला; तेव्हा हा शिष्य पाण्याच्या वर येऊन सुखाने श्वासोश्वास करू लागला. श्रीगुरूंनी विचारले, ''कसा आला अनुभव?'' हा म्हणाला, ''अहो, माझे तर प्राणच निघून चालले होते. वाटत होते की प्राणवायुशिवाय मी आता मरणार.'' श्रीगुरू म्हणाले, ''हं! बाबा, ईश्वरप्राप्तीसाठी सुद्धा तशीच तडफड, व्याकूळता, आतुरता पाहिजे रे!!!''

तेव्हा रासलीला ही देहाध्यास नष्ट झालेल्या गोपींची कथा आहे. गोपीभाव हा हृदयाच्या शुद्ध, निर्विकार, निर्लेप, निरागस, निर्मळ, निरामय भावभक्तिचा-भावशक्तिचा मानदंड आहे.

दर्शनाला, भेटीच्यावेळी आपले स्त्रीत्वाचे आणि पुरूषत्वाचे भान विसरून, देहभान विसरून आत्मभाव प्रकट होणे म्हणजेच गोपीभाव. परमभक्तिप्रेमभावात या भक्तीच्या तन्मयतेत, तद्रूपतेत, तदाकारतेत देहभान मिटतेच बघा.

रासलीला हा भक्त आणि भगवंत यांचा रसाविष्कार आहे. भक्ताची परीक्षा केल्यावरच भगवंत भक्तकामकल्पद्रुम श्रीहरि भक्ताला आपलेसे करून घेतो. गोपींची अशी सर्वप्रकारे परीक्षा केल्यावरच गोपीमानसमनरंजन श्रीकृष्णांनी त्यांना अमृतपान, दिव्यरस, अद्वैतरस, अधररसाचे दान-पान दिले. (अधर म्हणजे अ-नाही धर. धरा म्हणजे पृथ्वी म्हणजेच जडता म्हणजेच अर्थ असा झाला की ज्यात देहभावाची जडता/कटुता नाही असा भक्तिप्रेमरस)

भगवंत स्वत: तर आनंदरूपच आहे. त्यांनी आपल्या आनंदासाठी नाही तर गोपींना (म्हणजे श्रेष्ठ अशा भक्तांना) आनंददान करण्यासाठी रासलीलेचे आयोजन केले. गोपीच मग परमानंदस्वरूप झाल्या. रासलीला हा महायोग आहे. योग शब्दाचा अर्थ आहे भक्त आणि भगवंताचे ऐक्य.

या रासलीलेत भक्तिप्रेमाची यशोगाथा आहे. भक्तिप्रेम अंतरंगात असते. ब्रह्माचा परब्रह्माशी नटनाच-म्हणजेच रास. आश्विन पौर्णिमेस (म्हणजे भक्तिचंद्राचा पूर्ण उदय) ही महारास लीला झाली.

* * * *

# चिंतन १४०

मनुष्यमात्र म्हणला की त्याला कशाची ना कशाची तरी आवड असतेच; छंद असतोच. आवडच नाही असा माणूस नाही. काहीच न आवडण ही सुद्धा एक आवडच आहे नां? आवड कशाची तरी असण्यापेक्षा भगवंताची, त्याच्या रूपाची, गुणांची, नामाची, लीलांची, कथांची-अमृतपानाची!!! मग ती आवडीची धणी पूर्ण होण्यासाठी एकच आवड असलेली माणस एकत्र आली तर आनंदाला उधाणच येते. श्रीतुकोबाराय सुद्धा म्हणतात, "**माझिये जातीचे मज भेटो कोणी। आवडीची धणी फेडावया।।**" येथे जातीचे म्हणजे 'एकाच आवडीचे' असा अर्थ आहे.

गोपींना श्रीकृष्ण दर्शनाची ओढ. कान्हा नंदाच्या घरी प्रकट झाल्याची वार्ता गोकुळात सर्वत्र कळली, सर्वच गोकुळवासीय निघाले. नंदनंदनाला पहावयास; गोपी तर सर्वांच्या पुढे. आतूर होत्या दर्शनासाठी. जणूकाय नवविधाभक्तीच भगवंताला भेटायला निघाल्यात.

त्या गोपींचे अंग-प्रत्यंग श्रीकृष्णाचे दर्शन होणार या नुसत्या कल्पनेनेच आंदोलित होत होते. त्यांचे डोळे म्हणत होते की, "आमच्यासारखे भाग्यवान कोणीच नाही. आम्हालाच प्रत्यक्ष बाळकृष्णदर्शनाचा आनंद मिळणार." तर हात म्हणत होते, "अरे डोळ्यांनो तुम्ही तर नुसतं त्या नंदलालाला पहाणारच फक्त. आम्ही तर त्याला उचलणार, त्याला स्पर्श करणार." कान काय म्हणाले माहित आहे? कान म्हणत होते, "अरे तुम्ही सर्वजण आमच्यामुळेच भाग्यवान आहात बरं, तुमच्यापेक्षा आम्हीच खरे पहिल्या क्रमांकाचे भाग्याचे

मानकरी; कारण की कृष्ण प्रकट झाल्याची वार्ता आम्हीच तर सर्वांच्या आधी ऐकली ना?'' हृदय म्हणाले, ''बाबांनो तुमच्या सर्वांच्या बोलण्यात काहीच अर्थ नाही; जो पर्यंत भक्तिप्रेमभावाने मी विरघळत नाही ना तोपर्यंत तुम्हाला कोणालाच आनंद प्रत्ययास येत नाही. तेव्हा तुम्हा सर्वांना झालेल्या आनंदाचे परमसौख्य, तो परमानंद मलाच झाला आहे, नाही नाही.... मीच आनंदस्वरूप झालो आहे; अस पण नाही!!! मग मी नाहीच, आनंदच उरला आहे. कळल का आता तरी? उगाच बोलू नका. आनंद फक्त अनुभवा.''

गोपींच्या सुंदर केशभूषेतून फुले खाली पडत आहेत; त्यांची भाषा तर फारच प्रेमामृताची आहे. खाली पडत असताना ती म्हणत आहेत, ''तुम्ही तर साऱ्याजणी कृष्णदर्शनासाठी अत्यंत आतुरतेने धावत आहात; तुम्ही सर्वजणी मोठ्याच भाग्यशाली आहात, तुमच्या मस्तकावर विराजमान होण्यापेक्षा आम्ही तुमच्या चरणकमळीच पडतो. तुम्हाला धरणीमातेची कठीणता सोसणार नाही; म्हणून तुमच्या पायाखालीच आम्ही पडून राहू. तुम्ही मस्तकी धारण केलेली पुष्पं प्रभूला कशी समर्पण करणार. मग तुमच्या पायाखाली पडूनच आम्ही समर्पित होऊ ना? काय भाव आहे पहा ना!!!

अशा आनंदाने वेड्या झालेल्या गोपी बालकृष्णाचा जयजयकार करीत आहेत. त्याला पाहात आहेत. कुखंडी करीत आहेत; त्याला दृष्ट लागू नये म्हणून अलाबला घेत आहेत. भेटी देत आहेत. यशोदा त्यांना सप्रेम प्रतीभेटी देत आहे. एक गोपी म्हणाली, ''यशोदा माय, मला दुसरे काहीच नको, द्यावयाचेच असेल तर एक कन्हैय्याच दे.'' यशोदेने बाळाला तिच्या मांडीवर ठेवले. आनंद! आनंद!! आनंदी आनंद!!! जन्मजन्मांतरापासून तुटलेला जीव भगवंताला भेटला. भगवंताची भेट झाली. मग काय? जीव आनंदाने डोलू लागला. आनंदकंदाचे दर्शन, सच्चिदानंदाची भेट.

हा बाळकृष्णदर्शनाचा आनंदोत्सव आपल्याला रोज साजरा करता येतो. रोज ब्राह्ममुहूर्तावर (पहाटे ४ ते ५।।) हा आनंदोत्सव करावा ना!!! 'उत'चा अर्थ येथे आहे भगवंत, आणि 'सर्व'चा अर्थ आहे प्राकट्य. उत्सव म्हणजे भगवंताचे प्राकट्य. हा उत्सव आपल्या हृदयमंदिरात साजरा व्हावयास हवा.

भगवंताला/श्रीगुरूला आपल्या हृदयात बसवाव, तो हृदयात प्रकट झाला (नामस्मरणाने) मग भूक-तहान त्रास देत नाहीत. दररोज असा उत्सव साजरा केला की सगळा दिवस, आठवडा, महिना, वर्ष-जीवनच आनंद होते. या उत्सवाला तन, धनापेक्षा मनच लागते.

* * * *

# चिंतन १४१

मनुष्याचा हा स्वभाव आहे की सगळ्या दिनचर्येत आणि दिनचर्येतून निवृत्त झाल्यावर बिछान्यावर आडव होण्याच्यावेळी सुद्धा त्याला प्रिय वस्तू, स्थळ, काळ आणि व्यक्तीची आठवण होत असते.

अंथरूणावर पडल्यावर सुद्धा जर भगवंताची/आनंदकंदाची आठवण झाली तर निश्चितपणे समजावयास हरकत नाही की आपले मन भगवत्स्वरूपातच अडकले आहे; त्या नंदनंदनाच्या चरणी स्थिर झाले आहे. कित्येक लोक बिछान्यावर निजल्या-निजल्या पुढच्या दिवसाचा कारभार, देणे-घेणे, हिशोब-ठिशोब, याचाच विचार करीत असतात. लोभ्यांचे मन द्रव्यात, दुष्टाचे मन परघातातच अडकलेले असते. निदान अंथरूणावर हाड आडवी केल्यावर तरी हे सर्व विसरून जाऊन, झोप लागेपर्यंत तरी "**रामकृष्ण हरि-राकृष्ण हरि**" करीत राहावयास पाहिजे. नाही का?

एक गोपी यशोदेला सांगत आहे, "आम्हाला गृहकृत्यात उठता-बसता, आत-बाहेर, सकाळ-दुपारी-संध्याकाळी एक कान्हाच आठवतो; तोच दिसतो. स्वप्नातसुद्धा तोच येतो. आमच्या डोळ्यातून त्याची छबी जातच नाही.

या कान्होबाचे नाव तर अमृताहूनही गोड आहे. त्याचे रूप गोडच आहे. अधर मधुर, वदन मधुर, नाही नाही तर मधुराधिपती कृष्णाचे सगळेच काही अमृतपानाहूनही अमृतमधुरच आहे.

सदासर्वकाळ आपल्या दिनचर्येत या अधरामृत रसस्वादरस रसाधिराज नंदलालालाच आठवावे. कृष्ण-कृष्ण म्हणत असता आणि त्याचेच रसदर्शन

घेत निद्रेच्या स्वाधीन झाल्यावर, मग स्वप्नातही तोच येत राहतो. ज्या कोणत्या वस्तूत आपले मन अडकले-गुंतले-स्थिर झाले असेल तीच वस्तू मग स्वप्नातपण आठवते. श्रीगुरू ज्ञनोबारायांची साक्षच आहे, ''**जागृति-स्वप्न-सुषुप्ति नाठवे। पाहता रूप आनंदी आनंद साठवे।।**'' का तर, ''**पांडूरंगी मन रंगले**.''

खऱ्या वैष्णवांचे मन कृष्णालाच बांधले गेलेले असते. म्हणून वैष्णवाच्या स्वप्नी-मनी-ध्यानी तोच असतो. स्वप्नातसुद्धा श्री दर्शन होईल तेव्हा निश्चित समजा की भगवत्‌दर्शन झाले, भगवंत-आनंद अनुभवला आणि आपण आनंदघन असे वैष्णवच आहोत. नामधारकाला प्रभूचे पहिले दर्शन स्वप्नातच होत असते बरे!!!

एक गोपी सांगत होती, ''माय, मला आज सारखे असे वाटत होते की लाला आज आपल्या घरी नक्की येणार. तो येणार या विचाराने मी वेडी झाले. तो येणार या कल्पनेनेच इतकी वेडी-खुळी-बावरी होऊन गेले की, लाकडाबरोबर सर्पण म्हणून मी लाटणेही जाळून टाकले ग!!!''

दुसरी एक गोपी म्हणत होती, ''यशोदामाई, हा सावळा कुणाला आवडत नाही? सगळ्यांच्या गळ्यातला ताईत. माझ्या भावोजींनी, जेवताना माझ्याजवळ मुरंबा मागितला; शिंक्यावरून बरणी काढली; त्यांना वाढू लागले. मुरंबा फारच सुंदर-सुमधुर-रसभरित. कोणतीही सुंदर-चांगली-छान वस्तू या मनमोहनाला द्यावीशी वाटते. याला तर मुरंबा किती आवडतो? कान्हा जर यावेळी आला तर किती बरे होईल ना? मी त्याला मुरंबा देईन. अजून त्याला दिलाच नाही; मग मी तरी कशी खाणार ना??? आज त्याला देईन मग मी खाईन!!! माय, आपण आज त्याला त्याचा आवडता मुरंबा देणार या कल्पनेनेच मी इतकी विभोर आहे की मुरंब्याची बरणी शिंक्यावर

ठेवण्याच्या ऐवजी माझ्या मुलालाच शिंक्यावर ठेवून दिले. बस्!!!

आपल्या चित्तरूपी माठात जर असा नंदलाल सामावला तर प्रत्येक ठिकाणी त्याचेच दर्शन होत राहील. आपल्या डोक्यात, हृदयात, बुद्धीत जर बन्सीधर बसला, तर कणाकणात तोच प्रत्ययास येईल.

गोपी गृहकृत्यातसुद्धा त्यालाच आठवतात. त्याचेच स्मरण, त्याचेच गुणगान, त्याच्याशीच संवाद. भीड-भाड न बाळगता ह!!!

मोठमोठ्या महात्म्यांनासुद्धा, भगवंताचे नित्य स्मरण राहण्यासाठी प्रयत्न करावे लागतात. पण व्रजांगना!!! त्याला विसरावयाचा प्रयत्न करूनही विसरू शकत नाहीत. कदाचित् काय, अगदी नक्कीच तो गोपीमानसमनरंजन कृष्णसुद्धा त्यांना विसरू शकत नव्हता. असा आठव, असा भक्तिप्रेमा; अशी उभयभंगाने भक्तिप्रेमवृत्ती.

* * * *

# चिंतन १४२

आज दीपावली. वर्षातील सर्वात मोठा आनंदाचा सण. आनंदोत्सव. दीपज्योती-प्रकाश-उत्तम वस्त्रप्रावरणे, अलंकार, पक्वान्ने, फराळ, फटाके, मंगल-अभ्यंगस्नान; आप्त-इष्ट यांच्या गाठी-भेटी, सडे-रांगोळ्या आणि बरच काही-बाही.

आजकाल वर्षातून एकदाच हा मोठा आनंदोत्सव साजरा करतात. तोपण उपचारातून, उपाधीतून, अधिभौतिक स्तरावर. धंदा-व्यवसाय-उद्योग, चांगला झाला, नोकर-चाकरांना बोनस मिळाला तर!!! नाहीतर पंचांगात दीपावली पण प्रत्यक्ष मात्र "........." नाही कां?

आनंद हा देश, काल, सण ह्यावर अवलंबून नाही तर आपल्या चित्ताची ती मूलभूत स्वरूपस्थिती आहे. नंदबाबा स्वत: सदासर्वदा आनंदच अनुभवत असत आणि समस्तांनाही आनंदच देत असत. अशा नंदगृहीच परमानंदाचा पुतळा, कृष्णसावळा येतो. मग परमानंद प्रकट झाल्यावर आनंदास काय तोटा ना???

आनंदोत्सवात धन, धान्य आदी महत्वाचे नाही, तर भक्तिप्रेमभाव मुख्य. असा आनंदोत्सव आपल्या आतच खरा साजरा केला पाहिजे-आपल्या हृदयातच तो साजरा व्हावयास हवा. आनंद-भगवंत हृदयमंदिरात प्रकट झाल्यावर, मनुष्यमात्राला देहात असूनही देहभान राहात नाही; मग भयाची काय कथा? आनंदाच्या अनुभवात 'भय' शिल्लकच राहात नाही. आपले तुकोबाराय सांगता, "**हुं तो थकित भईरे तुका। भागारे बस मनका धोका।।**" का, कशामुळे, तर, "**कान्हा रे मन-मोहन लाल। सबही विसरूं देखै गोपाल।।**" कळल का?

भक्तिप्रेमभावात, आनंदकंदाशिवाय बाकी सर्वांचा विसर पडल्यावरच उत्सव खरा-खुरा सफल होत असतो. पण, आपण भगवंताच्याही उत्सवात लौकिकच जपत असतो, सांभाळत असतो, कुरवाळत असतो.

उत्सवात आपण देवता-श्रींची स्थापना करतो; मंडपात, चौरंगावर, देव्हाऱ्यात, पण आपला हृदयाचा गाभारा मोकळाच!!! श्रीकृष्णाला/श्रीगुरूंना आपल्या हृदयसिंहासनावर बसवावा. भगवंत हृदयात असल्यावर भूक-तहानसुद्धा हरपते बघा. निर्धन माणूस सुद्धा हा आनंदमहोत्सव साजरा करू शकतो. या उत्सवात धन नाही तर भक्तिप्रेमयुक्त मनच प्रधान आहे. म्हणून तर तुकाराममहाराज म्हणू शकले, "**तुका म्हणे खातो आनंदाचे लाडू.**" लौकिक दृष्ट्या त्यांच्यापाशी काय होते? पण आनंद केवढा? "**आनंदाचे डोही आनंद तरंग। आनंदचि अंग आनंदाचे।।**" खरं ना?

आपण दीपोत्सवाची तयारी करतो ना? तशीच या आनंदोत्सवाची तयारी करावी लागते. आपल्या शरीराला मथुरा करावं आणि हृदयाला गोकुळ. अशा तयारीने उत्सवाला सुरवात झाली की मग या हृदयगोकुळात भगवंत प्रकट होतो. उत्सव म्हणजे काय? 'उत'चा अर्थ आहे भगवंत आणि 'सव'चा अर्थ आहे प्रागट्य.

शरीर मथुरा आहे, हृदय गोकुळ आहे, पटल, पण मग यमुना कोठे आहे? यमुना तर भक्तीचेच एक नाव आहे. भक्तीयमुनेच्या तीरावरच गोकुळ-मथुरा आहे बघा. आपण यमुनेच्या-भक्तीच्या तीरावर सदासर्वदा वास करावा.

मथुरा शब्द उलटा करून, मग त्यातून 'थु' अक्षर वजा केल्यावरच या जीवनात राम उरतो. कृष्ण उरतो. 'थु' काढून टाकला नाही तर मात्र जीव मथुरेचा अधिपती कंस, म्हणजे अहंकाराचा ओतीव पुतळा होतो आणि मग अहंकाराने ग्रासलेल्या जीवावर सगळेच यमदूत 'थू-थू' करतात.

वसुबारसेपासून सुरू झालेला आनंदोत्सव गोपाष्टमीला पूर्ण होतो. इंद्रियस्वरूप गायींना भक्तिरसात मंगलस्नान घालावे. वैराग्याचे उटणे करावे; आत्मरसाचे तेल लावावे. आत्मानात्म विचारांनी मर्दन करावे. या इंद्रियरूपी गायींचे स्वामी भगवान् गोलापकृष्णच आहेत. गायी त्यांच्या मालकीच्या आहेत. त्या गायींना गोवर्धनगिरीधारीच्या स्वाधीन करावे आणि आपण आपल्या अंत:करणामध्ये अखंडत्वाने त्याचेच स्मरण करावे. अशा स्मरणाने चित्त अंतर्बाह्य मृदू नवनीत झाल्यावर तो नवनीतप्रिय नवनीतभोजी आपल्या चित्तरूपनवनीताची चोरी करतो. त्याने चित्त केव्हा चोरले, तर कधी, कसे, काही कळतच नाही.

* * * *




आत्मचिंतनाने माणसाचा जसा जसा विकास होतो, तसे तसे त्याच्या जीवनविषयक कल्पना उन्नत होतात, विकसित होतात. आज आपला पाडवा. दीपावलीचा. तुकोबाराय म्हणतात, ''**दसरा दिवाळी तोची आम्हा सण। सखे संत जन भेटतील।।**''

लौकिकदृष्ट्या ह्या संतांच्या जवळ काय आहे? तर जे आपल्याला हवे आहे,पण ते आपल्याजवळ नाही असे अपूर्व समाधान, आनंद आणि निर्भयता, नाही तर अभय.

श्रीगुरुज्ञानेश्वर महाराज तर संतकुळीचे सम्राट. स्वानंदानुभवाचे अनभिषिक्त चक्रवर्ती राजे.

काय अनुभवाचे तेज असतो पहा!!! ज्ञानराज म्हणतात, ''भगवान शंकर म्हणोत की वैकुंठीचा सुजाण म्हणजे भला श्रीकृष्ण म्हणो, मी म्हणतो ते माझा अनुभव तसाच आहे म्हणून, त्यांचा अनुभव आहे म्हणून मी म्हणत नाही.''

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ''**ज्ञानापेक्षासुद्धा भक्ती हा पंचम पुरूषार्थ आहे.**'' हा त्यांच्या अनुभवाचा विषय आहे.

आता अस बघा की हा पुरुषार्थ काय आहे बाबा? तर पुरुष म्हणजे माणूस असा अर्थ आहे. माणसाने जे कमावले असताना त्याला आणखी काही कमावण्याचे उरत नाही त्याला पुरुषार्थ अस म्हणतात. साधु-संतांच्या जवळ काय होते? लौकिक विद्या? का पैसा? का काही कला? का सत्ता? तर यातले काही नाही; पण त्यांना भगवंताचे आत्मत्वेकरून दर्शन झालेले होते. त्यामुळे

त्यांना जे समाधान मिळाले ते जगातल्या मोठमोठ्या राजे लोकांना नव्हते. त्यांच्या जवळ होते, त्यांना अनुभवता येत होते भक्तिप्रेमसुख.

ज्ञानेश्वर महाराज तर मोठे वैष्णव. काय चमत्कार आहे बघा. वय वर्षे सोळा. ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ लिहितांना त्यांना ते कसे सुचत असेल!!! आपल्याला तर काही कळतच नाही बाबा आणि ते तर म्हणतात की, "**ही सारी केवळ गुरूकृपा.**" मला सांगा, आपण किती शिकण्यासारखे आहे ना यात ???

आपण काय शिकावयाचे त्यांच्याकडून? जर पहिली गोष्ट असेल तर त्यांच्याचसारखे सद्गुरूंच्या चरणी लीन होणे हे प्रथम शिकण्यासारखे आहे. आपण काहीही कितीही करा; पण श्रीसद्गुरूंशिवाय ज्ञान नाही. महाराज म्हणावयाचे, "चोरी करावयास येण्यासाठी सुद्धा गुरू लागतो. असे जर आहे तर आत्मज्ञानाला कोणी गुरू नको का? परमार्थात खरे काय ते सांगणारा लागतोच. नुसता ग्रंथ वाचून होत नाही." म्हणून श्रीज्ञानोबारायांचे पासून जर काही पहिला धडा घ्यावयाचा असेल तर श्रीगुरुशरणागती.

काय आणि किती सांगू? पदोपदी-पदोपदी श्रीगरुंचा विषय आला की ज्ञानोबारायांना भानच रहात नाही. शेवटी त्या गुरुंनाच सांगावे लागते की, ज्ञानोबा, आता पुरे रे. आता प्रतिपाद्य प्रमेय सांग आणि इतके गुरुवर्णन-स्तुती करून शेवटी म्हणाले, "**स्तुति काही न बोलणे। पूजा काही न करणे।**"

आपण जीवनात सर्वोच्च महत्व जर कशाला द्यायचे असेल तर ते श्रीगुरुला-गुरुवाक्याला. आपल्या जीवनात ते जर नसेल तर सारा अज्ञान-अंधकार. दीपावली म्हणजे अंधकारातून प्रकाशाकडे जाण्याचा सण. हे गुरु-शिष्यांतील भक्तिप्रेम सनातन आहे. **Eternal** आहे. हे भक्तिप्रेम आजकालचे नव्हे.

आपल्याला परमार्थ साधायचा आहे ना??? आपल्याला स्वत:ला तो

साधता येत नाही. त्यासाठी श्रीगुरुंची शक्ती लागते. ती शक्ती, कृपा, आशीर्वाद जिथे मिळतो, ज्यांचा मिळतो, त्या श्रीगरुंचे गुणगान काय करावे? ज्ञानोबारायांना हे ठाऊक होते.

मी करीन म्हणून होणार नाही; त्याला तुमची सत्ता हवी, तुमचे पाठबळ पाहिजे. अशी मनापासून प्रार्थना करणे म्हणजे शरणागती. श्रीगुरु/सद्गुरु, ज्ञानोबाराय आपल्या समोरच नाहीत तर आपल्या पाठीशी तेच आहेत.

आपली अशी श्रद्धा हवी की ते माझ्याकरता सगळे काही करतील. त्यांनी मला आपले म्हटले आहे. तेच माझा सर्वस्वी सांभाळ करतात. "**भागलिया मज वाहतील कडिये।**" कडे खांद्यावर घेतात. हाती धरतात. लळे-कोड-कौतुक पुरवतात.

* * * *




परमार्थाची मोठी खूण म्हणजे भगवंताचा अनुभव. परमार्थाचा अनुभव म्हणजे माडीवर चढून जाण्याच्या पायऱ्याच आहेत अशी बऱ्याच जणांची समजूत असते. भगवत्‌तत्वाच्या स्वानुभवाला अशी पायऱ्यांसारखी क्रमवारी लावता येत नाही. जेथे आत्मा आहे, तेथे परमात्मा आहेच. तसेच परमात्म्यात आत्माराम सामावलेला असतोच. परिमाणाच्या दृष्टीने ते भिन्न भिन्न दिसले तरी त्या देघांतील गुण एकच आहेत पहा. **"There is qualitative unity, but there may be quantitative plurality."** परमार्थाच्या प्रवृत्तीत देखील एक क्रमबद्धता लावता येत नाही, मग पारमार्थिक अनुभवात क्रमवारी लावणे तर दूरच राहिले ना??? परमार्थ मार्गावरून जाणाऱ्या साधकाची पायरी त्याच्या पारमार्थिक अनुभवावरून लावता येत नाही.

एका सामान्य नामधारकाची जी पायरी असते तीच पायरी साक्षात्कारी अशा नामधारकाची असते. दोघांचे अंत:करणात नामरूपी एकच शक्ती असते. आपली अध्यात्मशक्ती नामात घालून श्रीगुरु शिष्याच्या अंत:करणात नामाचे बीज पेरतात. प्रत्येकाच्या नामात एकच शक्ती कार्य करते. ज्या दिवशी अथवा ज्या क्षणी श्रीसद्‌गुरूंनी नाम दिले, त्याच क्षणापासून तो शिष्य ब्रह्मस्वरूप बनू लागतो. ‘‘**ज्या क्षणी अनुग्रह झाला। तेचि क्षणी मुक्त झाला।।**’’ मग असा शिष्य कितपत ब्रह्मस्वरूप झाला हे ठरवता येत नाही; का? तर देव अनंत आहे. अनंताचा मार्ग देखील अनंतच आहे, असा गणितशास्त्राचा सिद्धांत आहे. अनंताचा शेवट गाठलेला कोण आहे? अस संत विचारतात पहा. का तर अनंताचा शेवट गाठला तर अनंत हा अनंत न राहता

सांत होईल ना? मग अनंताचा अनुभव घेणाराच अनंत होतो असे ह्यातील वर्म आहे, म्हणजेच अनंत परमात्मा कायम अनंतच राहातो बघा!!! आहे ना मौज???

**''डोळयांनो सत्य गुरुची खूण। आपले स्वरूप घ्या ओळखून।।''** अस नाथरायांनी सांगीतले. नाथांसारखे महात्मे तर आपल्या अनुभवावरूनच बोलतात. नाथ डोळे असणाऱ्यांना अनुलक्षून हे सांगत आहेत. नाथ डोळस कुणाला म्हणतात? तर ज्यांनी आपल्या डोळ्यांनी आत्मस्वरूपाची खूण पाहिली त्यांना. ज्यांनी ती पाहिलीच नाही, अथवा ज्यांना ती दिसली नाही, इतकच काय तर ही खूण पाहण्याचा ज्यांनी साधा प्रयत्नपण केला नाही त्यांना आत्मसाक्षात्कारी संत अंध म्हणतात. ज्यांना थोडा तरी आत्माराम कळला, ज्यांनी नाम घेतले आहे अशांना ते डोळस म्हणतात.

खूण हा शब्द अध्यात्म साहित्यात बऱ्याच ठिकाणी आणि बहुतेक सगळ्या संतांनी वापरला आहे. श्रीगुरु आत्मारामाची खूण (म्हणजे अनुभव) दाखवून मोठी गम्मत करत असतात. डोळ्यांना ही खूण पटते; पण भगवंताचे केवळ सगुण रूप इतकाच अर्थ ''डोळ्याची खूण'' या शब्दाचा नसून, रुपाबरोबरच रस, नाद, गंध व स्पर्श अशा भगवंताच्या सर्व खुणांचा समावेश या शब्दात आहे.

येथे डोळा हा शब्द नाथांनी, ज्या डोळ्याचा उपयोग आपण, बाहेरचे दृष्य जग पाहण्यासाठी करतो, एवढ्या अर्थाने केला नाही. तर खूण म्हणजे अनुभव अनुभवणाऱ्या शक्तीला, अर्थात दृष्टी, श्रवण, नाद, वास घेण्याला लागणाऱ्या शक्तीला 'डोळे' असे म्हटले आहे. डोळ्यांच्या भोकांनी आपण पहात नाही, तर पाहणारा जसा वेगळाच असतो, तीच तऱ्हा सर्वच ज्ञानेंद्रियांची आहे. इंद्रियांच्या आत, मागे, पुढे, बाहेर तो नसेल तर या सगळ्या इंद्रियांचा काहीच

उपयोग नाही. या सर्व इंद्रियांच्यामधे वेगवेगळ्या रीतीने काम करणारी शक्ती एकच आहे. त्यालाच आत्माराम म्हटले आहे. तो आत्माराम सर्वांच्या देहात व्यापून आहे. आत्मारामाचे डोळे (म्हणजे शक्ती) रोमा-रोमांत आहे. डोळे (स्थूल) मिटलेले असले तरी तो आपले मूलभूतस्वरूप म्हणजे परमात्मा जाणू शकतो. हा अनुभव (आत्मारामाला परमात्म्याचा अनुभव) म्हणजेच खूण.

अशी खूण श्रीगुरूनी अनुग्रहासहीत दिलेल्या एक दिव्य नामात असते. अशा नामाला श्रवण-कीर्तन इ. भक्ती ही अत्यंत पोषक असते. एवढ लक्षात घ्यावे.

* * * *

# चिंतन १४५

श्रीगुरुंची खूण सत्य असल्याची खात्री झाल्यावर मग आपल्या जीवनाविषयी आपल्या संसाराबद्दल तक्रार करण्यास थोडासुद्धा वावच उरत नाही. माझ काही खर नाही, मला फार-फार दु:ख झाल असे म्हणण्याचे कारणच उरत नाही. गुरुची खूण सत्य आहे असे कळल्यावर तेच **चित्स्वरूप** आहे याची पण जाणीव झाली पाहिजे आणि जे सत्य व चित् आहे तेच **आनंदस्वरूप** आहे हे पटले पाहिजे. नव्हे नव्हे तर सतत अनुभवता आले पाहिजे. असा अखंड आनंदाचाच अनुभव (मग माध्यम, प्रसंग, काळ, वेळ, स्थळ काही का असेना) आल्यावर असत्याचा विचारच राहत नाही. म्हणून मग चित्तात दु:खाचा अंशच उरत नाही. आनंद व दु:ख तम:प्रकाशवत आहेत. म्हणजे अंधार हा प्रकाशासमोर येतच नाही. तसे दु:ख आनंदाच्या हरीमुरी उभेच राहत नाही. **''आठव तो ब्रह्म आणि नाठव तो भवभ्रम''** याचा अर्थही तोच आहे. **आनंदाच्या** अनुभवात दु:ख नाही आणि आनंदाच्या विसरात दु:खावाचून काहीच नाही म्हणून अखंड आनंदाचेच स्मरण आणि आनंदच अनुभवावा. **आनंद** म्हणजेच **नाम** आणि **नाम** म्हणजेच **आनंद**.

आपला सर्वांचा अंतरात्मा सत्य आहे. सत्य हेच त्याचे स्वरूप आहे. गुण नाही. गुण हे आगमायी असतात. म्हणजे कमी जास्त होणारे, येणारे जाणारे असतात. आत्मारामाचे स्वरूप आत्म्यापासून दूर, वेगळे राहूच शकत नाही. सत्य वस्तू ही नेहमीच काळातीत व स्थळातीत असते. म्हणून आनंदाला देश-काळ-मर्यादा नाही. कितीतरीवेळा आत्मारामाला पाहिले, बोलले, ऐकले,

स्मरण केले, अनुभवले तरी पुन:पुन: अनुभवावा अशी इच्छा असते. का? तर तोच **आनंद** आहे म्हणजेच आपले **निजस्वरूप** आहे.

आपल्याला चोवीस तास आनंद अनुभवास येत नाही, अस म्हणताना आपण दिवसातून किती वेळा नाम विसरतो, किती वेळा आपली दृष्टी जीवभावातच असते याचा विचार करावयास हवा आणि तरीसुद्धा आनंदस्वरूप भगवंत आपल्याला अधून-मधून ??? अनुभवाला येतो आणि नामाची/ आनंदाची आठवण आपोआप होते. ही केवढी त्याची कृपा ना ??? नाम हा भगवंताच्या सगुणरुपाचा उगमच आहे. नाम हेच **ब्रह्मबीज** आहे.

गुरुची खूण दुसरे तिसरे काही नसून ते आनंदाचेच स्वरूप आहे. आनंदाचे सत्यस्वरूप आहे. श्रीगुरुंचे म्हणजे "अंतरात्म्याचे/स्वत:चे रूप पहा" रूप पहावे म्हटल्यावर काहीतरी सुंदर, भव्य, दिव्य असे पाहावयाचे अशी सामान्यत: समजूत. अशी समजूत तरी का? तर आपल्या मनावर झालेल्या दृश्याच्या व ऐकण्याच्या संस्कारामुळे तयार झालेली कल्पना. मग तीच कल्पना साकार होते. त्या कल्पनेलाच आपण सुरवातीस भगवंत समजतो म्हणून आत्मारामाचे रूप म्हणजे कवींच्या कल्पनेतून जन्मल्यापासून ऐकत असलेल्या संस्कारातून निर्माण झालेल रूप नव्हे. आपल्याला सगुण परमात्मा/सगुण साकार दिसला नाही असे म्हणणे म्हणजे श्रीगुरुकृपेचा अपमान.

स्वरूप म्हणजे देहाचा आकार नव्हे. स्व + रूप यातील **स्व** कोण ? सत्-चित्-आनंद जो आहे तोच **स्व**. असा **स्व** मुळी आपले रूप आपणच पाहातो. म्हणून तर त्याला **स्वरूप** म्हणतात.

आपल्या नामसाधनेत डोळ्याशिवाय पाहायचे आहे. कानाखेरीज ऐकावयाचे आहे. जीभेशिवाय चव घ्यावयाची आहे तसेच वासाचे. म्हणजे इंद्रियांशिवाय आत्मारामाचा अनुभव घ्यावयाचा आहे. हा जो अतिंद्रिय

अनुभव तोच स्वरूपाचा म्हणजे आनंदाचा अनुभव. हा आनंद डोळ्यात, कानात, मुखात, नाकात, मनात, अवघ्या शरीरात साठवावयाचा. त्याला घट्ट **कव** घालावयाची. आनंदाला आनंदाचीच मिठी. अशी आनंदाची आनंदाशी झालेली गाठ-भेट.

अशा आनंदरूपाची ओळख पटवून देण्यास एक श्रीगुरुच समर्थ असतात. श्रीगुरुवर अपार-अव्यभिचारी श्रद्धा ठेवून आनंदस्वरूपाची सत्यता खात्रीपूर्वक अनुभवावी. नामस्मरणाने आनंदस्वरूप अनुभवास येते आणि ही आनंदस्वरूपता हाच भगवंत, हेच देवाचे स्वरूप हे श्रीगुरुच बजाऊन सांगत असतात.

* * * *

# चिंतन १४६

श्रीगुरुंचे सांगणे, मागे होऊन गेलेल्या संतांनी आपल्याला लाभलेल्या भगवंताच्या अनुभवाचा शब्दांच्या माध्यमातून केलेला अविष्कार व आपला स्वत:चा, नामस्मरणाच्या योगाने आलेला आत्मानुभव यांची एकवाक्यता झाली की काय होते ? तर आपली श्रद्धा जास्तीत जास्त बळकट, दृढ, प्रगाढ होत जाते आणि मग भगवत्स्वरूपाच्या अनुभवात वाढ होते, सातत्य येते, अखंडितता येते. जीवनांत घडणाऱ्या हरएक गोष्टीतून आपल्याला एका परमात्म्याचीच, त्याच्या असीम कृपेचीच जाणीव होत राहते.

निर्मळ अशा शुद्ध परमात्म/आत्मस्वरूपाच्या भोवती पसरलेली देहभावाची माया जशी जशी कमी-कमी होत जाते त्या-त्या प्रमाणात परमात्मस्वरूपाचा अनुभव जास्तीत जास्त प्रमाणात येत असतो.

सिंधूएवढ्या आत्मारामात म्हणजे **नामात** ऐक्य पावले की आत्मा-परमात्म्याचे, भगवंत आणि भक्ताचे ऐक्य सिद्ध होते.

परमात्मस्वरूपाचा असा साक्षात्कार म्हणजे जीवभावाचा देहभावाचा, अस्तच. नामसाधन करत असताना देहभावाचा असा अस्त होऊन ''**मी**'' संपला की दृश्याची जाणीव नष्ट होते. दृश्य उरत नाही, द्रष्टा उरत नाही, इतकेच काय पण दर्शनदेखील उरत नाही. मग अहो काहीच उरत नाही म्हणाना !!! तर तसे मात्र म्हणता येत नाही, का तर दृङ् मात्र उरते !! कसे तर ''**कापूराची वाती उजळल्या ज्योती। ठायिच समाप्ति झाली जैसी।।**'' अशा प्रकारे. या उरण्यालाच दृङ् मात्राला आपले तुकोबाराय ''**अणू रेणूया थोकडा। तुका**

**आकाशा एवढा।''** असं म्हणतात. मग आपल्याला आपल्या, अनंत, अज, अव्यय, अमर, अच्युत, **आनंद** स्वरूपाची खात्री पटते आणि म्हणूनच सद्गुरुंच्या शब्दावर नितांत विश्वास ठेवावा आणि **नामसाधन** करावे असाच सगळ्या संतांचा आवर्जून आग्रह आहे.

श्रीसद्गुरुंवरील नितांत अढळ श्रद्धा हाच एकमेव आत्मसाधनाचा म्हणजे ओघातच **नामसाधनाचा** पाया आहे. परंतु ही श्रद्धा अधिकाधिक बळकट होण्यास श्रीसद्गुरुंवर आणि त्यांनी अनुग्रहपूर्वक दिलेल्या नामावर नितांत प्रेम जडले पाहिजे. एवढेच नाही तर क्षण-प्रतिक्षण, दिन-प्रतिदिन हा भक्तिप्रेमभाव सातत्याने चढता-वाढता होत गेला पाहिजे.

अनेक जन्म-जन्मांतराच्या सवयीने प्राणीमात्राचे प्रेम दृश्यावर अर्थात या देहावर जडलेले असते. या देहभावआधारीत प्रेमभावाने सुख होत नाही. या देहभावात सुख नाही याची जाणीव होणेच मुळात कठीण. बर यात ''सुख नाही'' हे कळले, तरी खऱ्या, शाश्वत सुखाचा मार्ग कळणे, सापडणे व त्या मार्गाचे पांथस्थ होणे तर त्याहूनही कठीणच. बर सापडला तरी त्या मार्गावर **(नामावर) भक्तिप्रेमभाव** बसणे आणिकच कठीण ना ??? एका वस्तूवरील भाव-भक्ती कमी झाल्याशिवाय दुसऱ्यावरील अनुराग म्हणजे भक्तिप्रेमभाव वाढत नाही. म्हणून नाथराय म्हणाले, **''भक्तीस मूळ विरवित''**, पण वैराग्य म्हणजे अंगाला राख फासणे नव्हे तर **आनंदकंद** सच्चिदानंदघन भगवंतच एक शाश्वत सुखरूप आहे, तो आपलासा करून घेतल्याशिवाय जीवमात्रास शाश्वत सुखरुपता प्राप्त होणार नाही असा निश्चय होणे आणि त्या भगवंतास आपलासा करण्याचे प्रयत्न, अथक प्रयत्न म्हणजेच वैराग्यातून निर्माण झालेला **भक्तिप्रेमभाव**.

येथे भक्ती म्हणजे परम ऐक्याची अवस्था. प्रेमभावाची अत्यंत उत्कट

अवस्था म्हणजेच भक्ती. श्रीगुरुंच्या कृपाप्रसादऐश्वर्याने आपल्या **दर्शनात आलेल्या देवाच्या रुपाशी** तन्मय, तदाकार, तल्लीन, तद्रूप होऊन राहणे म्हणजेच भक्ती. अथवा भगवंताचा उगम ज्या नामातून, अशा सद्‌गुरुकृपेने मिळालेल्या **दिव्य नामात**, नामस्मरणात देहभाव विसरणे म्हणजेच परमप्रेमभावभक्तीची अवस्था. दिव्यातिदिव्य अवस्था म्हणजेच परमसुखाची परमावस्था. जेथे **परमप्रेमभावभक्ती** आहे तेथेच परमसुखाची परमावस्था आहे.

अशी परमावधीची परमसुखरूपता प्राप्त करून घेण्याचे एकमेव साधन म्हणजे श्रीगुरुंनी आपल्या आत्मशक्तिसहित दिलेले दिव्य नाम, त्या नामाचे स्मरण - **नामस्मरण** म्हणजेच **आनंदस्मरण**.

* * * *

# चिंतन १४७

श्रीगुरुंची भेट होणे, गाठ पडणे व आपणास पाहिजे असलेला सत्मार्ग मिळणे ह्या साऱ्या-साऱ्या गोष्टी पूर्वपुण्याईने घडतात. पूर्वपुण्य कमी पडत असेल तर मात्र सद्गुरुंची भेट होऊनही गाठ पडत नाही. मग सत्मार्ग ??? **(म्हणजे नाम)** मिळणे दूरच राहिले.

आपल्या तळमळीचे कारण आपल्याला सहसा कळत नाही. मुमुक्षूचा जीव भगवद्दर्शनासाठी, **स्वानंदानुभवासाठी** तळमळत असतो. आत्मज्ञानी अशा सत्पुरुषांना अशा जीवांची जाणीव होत असते. अशा स्वानंदासाठी-स्वरूपदर्शनासाठी तळमळत असलेल्या जीवाला **शांत-आनंदस्वरूप** करण्यासाठीच श्रीसद्गुरु अशा जीवाला आपणहून भेटतात, मग त्यांची गाठ पडते आणि ते एकरूप होतात.

अशा निर्गुणस्वरूपी रममाण झालेल्या सद्गुरुंचे सगुण शब्दांत वर्णन करणे कसे शक्य आहे ??? पूर्णत्व हा त्यांचा प्रथम गुण आहे. जागृती, स्वप्न, सुषुप्ती आणि तुर्या या चारी अवस्थेत त्यांना एका आत्मारामाचा, **आनंदघनाचाच** अनुभव असतो. ते सतत जागेच असतात. चारी अवस्थात दर्शन, स्पर्शन व संवादाचा अनुभव घेत असतात आणि अनुभवाचा केंद्रबिंदू भगवंतच असतो. आपल्या सत्शिष्याला अक्षरब्रह्म देऊन **ते** सतत मार्गदर्शन घडवितात. अशा या अक्षरब्रह्मासच **नाम** अशी संज्ञा आहे.

आधी काठी ढोसून-ढोसून श्रीसद्गुरु पाहतात. काय पाहतात ? माती काय कसाची आहे. आपले ज्ञानोबाराय म्हणतात, ''कोंभाची लवलव ही भूमीचे मार्दव सांगत असते. शिष्याच्या अंतरंगातील मऊपणा, कसदारपणा,

पोत पाहून मग **ते** नामाचे बी पेरतात. नुसते पेरुनच थांबत नाहीत तर आपल्या कृपेचा पाऊस पाडतात. **नामाच्या** अक्षररुपाने श्रीसद्गुरुंची आत्मशक्ती शिष्याच्या अंतरंगात उतरते. श्रीगुरु आणि शिष्य यांच्यातील आत्मचैतन्य नामाच्या अक्षराने एकमेकाशी जोडले जाते. गुरुशिष्य **एकरूप** होतात. आत्मानंदाच्या अत्युच्च अशा लोकोत्तर स्तरावर.

श्रीगुरुंच्या आज्ञेनुसार साक्षात्काराच्या धवलगिरीवर/शिखरावर पोहोचू पाहणाऱ्या शिष्याचा **योगक्षेम** सद्गुरुच पाहतात. आपल्या प्राणाहून प्रिय असणाऱ्या शिष्याच्या साधनपथावर जर काटे पसरले असतील तर ते आपल्या हाताने दूर सारून, सत्शिष्याची वाट श्रीगुरु स्वत: कष्ट सोसून साफ करतात. एकदा शिष्याला बोटाशी (आणि पोटाशीसुद्धा) धरल्यावर ते त्याला कधीच अंतर देत नाहीत. अगदी शिष्याने बोट सोडले तरी सुद्धा. वाट चुकून आपल बाळ मार्गावरून बाजूस जातय अस वाटली की माऊली त्या बाळाचा हात धरून त्याला पुन: वाटेवर आणून सोडते ना ??? अगदी तसच.

अशी कृपा लाभण्यास काही नियम पाळावयास लागतात. श्रद्धा, सेवा, साधन आणि शरणागती. गुरुवचनावर अत्यंत कमालीचा विश्वास. ते सांगतील तोच वेद, तीच नीती-आचार-धर्म प्रमाण. आपले श्रीगुरु म्हणजेच प्रत्यक्ष आपला भगवंत ही श्रद्धेची पहिली पायरी.

गुरुअनुभवाने भक्तिप्रेम वाढते. भक्तिप्रेमाने श्रद्धा वाढते, श्रद्धेने पूर्ण शरणागती साधते. पूर्ण शरणागती म्हणजे अहंकारबुद्धीचा लोप.

श्रीगुरुंनी दिलेल्या नामाच्या पाठी-पोटी सद्गुरु सदैव असतात. अशा श्रद्धेने नामस्मरण करावे. मी नामस्मरण करतो असा अहंकार नसावा. श्रीगुरुच आपल्याकडून नामस्मरण करवून घेतात.

* * * *




साधू, संत, महात्मे, योगी हे सगळे आपल्या हृदयस्थ परमात्म्याचे ध्यान करतात. (ध्यान म्हणजे भगवंत, त्याचे नाम, रुप, गुण, लीला इत्यादींचे चिंतन) आणि या ध्यानावस्थेत ते परमसुख-परमानंद अनुभवतात. आपल्या सगळ्या इंद्रियांचा निग्रह करून ही मंडळी त्यांना परमात्मस्वरूपाकडे वळवतात. इतका सगळा खटाटोप करून हे भगवद्भक्त जो आनंद अनुभवतात तो कोणत्या प्रकारचा ? कोणत्या स्तरावरचा ?

हा आनंद अनंत आहे, नित्य आहे, निरंतर आहे आणि निरुपाधिक असून निरुपचार आहे. तसाच तो निरामय पण आहे. हा स्वरूपानंद आहे, स्वानंद आहे, आत्मानंद आहे.

आत्माराम हा सत्-चित्त् आणि आनंद आहे. अशा सच्चिदानंद आत्मस्वरूपाशी असणाऱ्या मुलभूत तादात्म्यालाच भागवतकार रासलीला असं म्हणतात. भगवान् श्रीकृष्णाच्या व्रजगोपींसमवेत झालेल्या रासलीलेविषयी आपण नेहमी वाचतो, ऐकतो. ही रासलीला म्हणजे आत्मारामाची परमात्म्याशी होत असलेली क्रीडा, जीवा-शिवाची गाठ, स्वानंद साम्राज्याची अनुभूती.

भौतिक सुखाच्याच मागे लागलेल्या बद्ध जीवाला या स्वानंदघनतेचा अनुभवच नसतो. एक गमतीदार कथा आहे. एका माणसाला पुंड्या जातीचा ऊस कसा असतो, काय असतो हे ज्ञातच नव्हते. त्याला कोणीतरी सांगितले की ऊस चघळला की गोड लागतो. तेव्हा हा म्हणाला, ''तो ऊस कसा

असतो ?'' तेव्हा दुसऱ्याने उत्तर दिले, ''ऊस बांबूप्रमाणेच दिसतो.'' झाले. ह्याने हे ऐकले आणि बांबूची कांडकीच चघळण्यास सुरवात केली. आता ऊसासारख्या दिसणाऱ्या बांबूची कांडकी चघळून त्याला ऊसाचा रस, गोडी कशी कळणार ना ? बहिर्मुख बद्ध जीव असाच भौतिक गोष्टी चघळून आनंद मिळवण्याचा प्रयत्न करीत असतो, मग नित्यानंद कसा लाभणार ना ? त्याचा आनंद हा आकाशातील वीजेच्या लपंडावासारखा आहे. ज्ञानोबाराय म्हणाले, **''वीजेचा उदय तोचि अस्त''**. आकाशातील वीज तात्पुरती चमकते, पण या ''विद्युत्स्फुरणे'' कायम प्रकाश नाही. मूळ विद्युतशक्ती ही यापलीकडील अगदी वेगळ्यास्वरूपाची आहे. जीवालाही आपल्या मुलभूत आनंदस्वरूपाची ओळख नाही आणि त्यामुळेच या शाश्वत आनंदापासून तो पथभ्रष्ट होतो.

ह्या शाश्वत अशा निजानंदस्वरूपात नित्य स्थित राहण्यासाठी, कृष्णभावना म्हणजेच निखळ भक्तीप्रेमवृत्ती. हीच एक उपयोगी आहे. भक्तीप्रेमभावामुळे हळूहळु बुद्धी स्फटिकासारखी स्वच्छ होते, विकसित होते, उन्नत होते, सूक्ष्म होते. गीतेच्या भाषेत सांगावयाचे तर ती **व्यवसायात्मिका** होते.

ही भक्तिप्रेमभावना जसजशी वाढत जाईल तसा स्वाभाविक असणारा स्वानंद अनुभवास येतो, जास्तीतजास्त प्रमाणात येतो आणि या निजानंदाविषयी रस अधिकच वाढत जातो. अशा प्रगतीमुळे भौतिक आनंदातील क्षणभंगुरता कळू लागते. परमसत्य, परमानंदाच्या या मार्गावरून जसजसे पुढे जाऊ तसतसा साक्षीभाव स्थिर होतो व ही भक्तीप्रेमवृत्ती, म्हणजे नवविधाभक्ती म्हणजेच, ''भक्ती गोकुळी नवविधा नारी.'' श्रीकृष्णस्वरूप आनंदघन आत्मारामाशी तद्रूप झाल्यावर मग त्याचा काय परिणाम होतो ?

तर गीता सांगते -

**''यं लब्ध्वा चापरं लाभं, मन्यते नाधिकं ततः ।।**
**यास्मिन्स्थितो न दुःखेन, गुरुणापि विचाल्यते ।।''** (६-२२)

हा भक्तिप्रेमभाव, हे भक्तिप्रेमसुख, ही भक्तीभावना इतकी शक्तिशाली आहे, की ती आपल्याला अतिभयानक संकटामधूनही तारू शकते. ह्या भक्तीभावाचा रस जो जो कोणी चाखू लागेल त्याला भयच राहणार नाही. हा भक्तिप्रेमभाव दृढ, बळकट झाला मग माणूस डगमगत नाही. भक्तिप्रेमसुखापुढे महाभागवतांना मोक्षसुद्धा तुच्छच वाटतो.

अशा भक्तिप्रेमवृत्तीमुळे भगवंताशी तद्रूप झालेला भक्त भौतिक दोषांतून मुक्त होतो आणि भगवंताच्या दिव्य भक्तिप्रेममय सेवेमध्ये परिपूर्ण अशा परमानंदाच्या परमोच्च स्थितीत अखंडपणे आनंदच अनुभवतो. भगवान् श्रीकृष्ण सर्व जीवांचा सखा आहे. या सख्यत्वाच्या नात्याला दृढ करण्याची एकच पद्धती ''कृष्णभावनामृत'' म्हणजेच ''दिव्यभक्तीप्रेमभावधारा.'' ही दिव्यभक्तीप्रेमधारा भगवंताच्या/श्रीगुरुंच्या नेत्रकमलातून आपल्यावर सतत परमानंदाचाच वर्षाव करीत असते. आपली दृष्टी मात्र त्यांच्या दृष्टिशी-नित्य सम्मिलीत असली पाहिजे.

* * * *




श्रीतुकोबारांच्या चार-साडेचार हजार अभंगांच्या गाथ्यामध्ये जी काही थोडी लहान मोठी प्रकरणे आहेत त्यात "विराण्या" हे पंचवीस अभंगांचे एक लहानसे प्रकरण फार-फार महत्त्वाचे आणि अतिशय "**भावमधुर**" असे आहे.

विराणी म्हणजे विरहिणी. लौकिकदृष्ट्या व्यभिचारी विरहिणी. हिच्या तोंडचे रुपकात्मक उद्गार श्रीतुकाराम महाराजांनी या रचनेत मोठ्या कौशल्याने गुंफलेले आहेत. हे शब्द वरवर दिसावयास अति विचित्र आहेत; पण त्यातील गूढ अर्थपूर्णपणे पारमार्थिक आणि उच्चतम कोटीच्या भक्ताच्या मनोवृत्तीचे वर्णन करणारे आहेत. मधाच्या पोळ्यातून ओथंबलेला मध पाझरावा तसा परमोत्कर्षाचा भक्तिरस या अभंगांतील ओळीओळींतून, शब्दांशब्दांतून पाझरत आहे. अशा या विराण्या समजून घेण्यापूर्वी त्यामागची श्रीतुकोबारायांना अभिप्रेत असलेली भूमिका जाणून घेण अत्यावश्यक आहे.

विराण्या हे व्यभिचारिणीवरचे रुपक आहे. व्यभिचारिणी म्हणजे लौकिकार्थाने पतीस सोडून परपुरुषावर प्रेम करणारी स्त्री. गोकुळातील गोपी आपल्या सर्व आप्तेष्टांनाच काय पण पतीलाही सोडून श्रीकृष्णावर अतिशय भक्तिप्रेम करीत असत. तो संदर्भ या वर्णनाच्या मागे आहे. हे सर्व रुपक आहे. रुपक हा साहित्यरसशास्त्रातला एक फार सुंदर रसाळ असा अर्थालंकार आहे. भक्तिप्रेमातील एक उत्कटता लक्षात आणून देण्यासाठीच या रुपकाचा श्रीतुकाराम, श्रीगुरुज्ञानोबाराय या संतश्रेष्ठांनी मोठा सुंदर उपयोग केला आहे,

हे प्रथम लक्षात ठेवले पाहिजे. म्हणजे विचारांचा गोंधळ, घोटाळा होणार नाही. याचे सतत भान हवे.

परमार्थ मार्गात स्वत:चे अध्यात्मिक अनुभव स्पष्ट अशा शब्दात कुणी कधी सांगत नाही, पण पुष्कळवेळा **"अंतरीचे धावे स्वभावे बाहेरी।"** अशी स्थिती होते आणि प्रतिभासंपन्न अशा महावैष्णवांची तर होतेच होते. या विराण्यांच्या माध्यमातून श्रीतुकाराम महाराजांच्या लौकिक निरपेक्ष अशा एकनिष्ठ भक्तिप्रेमवृत्तीत पूर्ण अंतर्बाह्य रंगलेल्या अंत:करणाची अवस्था उत्तम प्रकारे प्रगट झाली आहे. नारदांनी ज्यांचा भक्तिप्रेमाचा आदर्श म्हणून नामनिर्देश केला आहे अशा गोपींच्या गोपीभावावर आरुढ होऊन महाराजांनी भक्तिशास्त्रातील श्रेष्ठभक्तिभावमूल्यांचा, प्रमेयांचाच विचार यातून केला आहे.

भगवंताची जी भक्ती केली जाते तिच्या मुळाशी भक्ती करणाऱ्यांच्या प्रकृतीप्रमाणे आणि पात्रतेप्रमाणे भावा-भावांची विविधता असते. नारदभक्ति-सूत्रामध्ये या सगळ्या भावांचे एकूण अकरा प्रकार वर्णन केले आहेत. उदाहरणार्थ सख्य, वात्सल्य, दास्य इत्यादी. तसाच कांतासक्ती हाही एक भक्तीचा प्रकार/भाव आहे. तिला संतश्रेष्ठ प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज, श्रीचैतन्यमहाप्रभू, मीराबाई इत्यादी महाभागवतोत्तम संत मधुराभक्ती असेही म्हणतात. भक्तीच्या सगळ्या भावांत हा भाव अतिशय श्रेष्ठ आहे.

कांतासक्ती म्हणजे कांतेच्या (हिचे पण रसशास्त्रकारांनी आठ प्रकार केले आहेत) भूमिकेतून भगवंताची उपासना करणे. भक्तीचा हा प्रकार सर्वश्रेष्ठ म्हणण्याचे कारण असे की स्त्री ही पत्नीच्या भूमिकेतून आपल्या पतीसाठी जे आणि जितके करू शकते ते तितके इतर कोणत्याही नातेसंबंधात अन्य कोणीही करू शकत नाही. **"भोज्येषु माता, शयनेषु रंभा, कार्येषु दासी, करणेषु मंत्री"** असे जे स्त्रीविषयी म्हटले जाते ते संपूर्ण अर्थाने सत्य आहे.

सख्य, दास्य, वात्सल्य ह्या भावात एक मर्यादा आहे आणि त्यामुळेच या सगळ्या भावप्रकारात समर्पणामध्ये परिपूर्णता-संपूर्णता येऊ शकत नाही. पण कांताभक्तीचे तसे नाही. म्हणून समर्पण ह्या स्तरावर ही कांताभक्ती/मधुराभक्ती सर्वोत्कृष्ट-सर्वश्रेष्ठ आहे.

श्रीगुरुज्ञानदेवांनी कांत शब्द वापरला आहे. नारदपण हाच शब्द वापरतात. भक्तीप्रेमातील उत्कट समर्पण दाखवण्यासाठी भक्त ज्यावेळी स्वत:चा अहंकार आणि तज्जन्य द्वैत संपूर्णपणे विसरुन भगवंताशी एकरुप होतो त्याचवेळी तो भक्तीच्या उत्कट अशा सर्वोच्च अवस्थेला पोचतो. गुरु-शिष्य संबंध/भावही याच एका प्रकारात उत्कृष्ट रितीने शोभतो. आपल्या ज्ञानोबारायांनी याचे वर्णन फार सुंदर केलेले आहे. विराणीची भूमिका फक्त इथे मांडली आहे. कधीतरी एखादीतरी विराणी चिंतनातून प्रकट होईल.

* * * *

# चिंतन १५०

भक्तीयोगाची सर्वोत्तम व्याख्या एका संस्कृत श्लोकांत फार सुंदर रीतीने मांडली आहे. त्याचा भावार्थ असा आहे, मनुष्यमात्राच्याच काय पण अवघ्या प्राणीमात्राच्या ठिकाणी मुलभूत असा जो अमर प्रेमभाव आहे तोच भक्तीप्रेमभाव जो मी तुझ्या प्राप्तीसाठी, भगवंता सारखा तळमळत आहे, अशा माझ्या हृदयातून कधीही लुप्त न होवो.

या भक्तीयोगात सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे भगवद्दर्शनाची, भेटीची तीव्र ओढ. सामान्यत: आपण भौतिक आनंदाचा/सुखाचा परिपूर्ण उपभोग घेऊन, त्याचा कंटाळा आल्यानंतर ? मग भगवद्सुखाचा/आनंदाचा विचार करू लागतो; पण हा निव्वळ बालीशपणा आहे. या बालीशपणातून स्वत:स जितक्या लवकर आपण मोकळे होऊ तेव्हाच भक्तीसोपानाची पहिली पायरी गाठली असे म्हणता येईल.

या भक्तीयोगाच्या तत्त्वप्रणालीवर मानवी हृदयातील विविध मनोभावना, मनोविकार यात मूलत: काहीच गैर नाही. फक्त या भावभावनांचे योग्य प्रकारे नियमन करून व त्यांचे उन्नयन करून त्यांना पूर्णत्वाकडे नेणे हेच भक्तीयोगाचे मूलभूत सुंदरसे रहस्य आहे. सर्वोत्तम दिशा ती की जी आपणास भगवंताकडेच नेते. अन्य सर्व मार्ग हे सर्वथैव दुय्यम प्रतीचे आहेत. भारताचे अमृतपुत्र स्वामी विवेकानंद यांचा हा विचार भक्तीशास्त्राला अतिशय पोषक आहे.

या भक्तीच्या प्रकारातील परमश्रेष्ठ कांतभक्ती. पुरुषांच्यादृष्टीने ही अनैसर्गिक आहे असे वाटेल. काही फार शहाणे मानसशास्त्रज्ञ तिला

विकृतीसुद्धा मानतील; पण तत्त्वज्ञानाच्या परमोच्च दृष्टीने ती स्वाभाविकच आहे, नव्हे-नव्हे तीच अत्यंत नैसर्गिक आहे. कारण भगवंत हाच एकटा प्रकृतीच्या पलीकडील आहे. तोच उत्तम पुरुष, गुरुरूपाने नटतो. स्त्रीचे मुख न पाहण्याचे व्रत घेतलेल्या जीवगोस्वामीस श्री मीराबाईंनी हेच सांगितले. यावरून तर सहजच लक्षात येईल की कांत-भावाने भक्ती करणे अगदी स्वाभाविकच आहे. अगदी सर्वांना.

भक्ती हे सर्वश्रेष्ठ असे भावजीवन आहे. आगतिकपणाने राहिलेल्या-जोडल्या गेलेल्या नातेसंबंधांचा या अलौकिक, अद्वितीय, लोकोत्तर आणि जगावेगळ्या नात्याशी काही संबंध नाही म्हणून कांतभक्तीतील जीवाचा भाव श्रेष्ठतम आहे.

भक्तिप्रेमभावामध्ये लौकिकापेक्षा **उत्कटतेचा** अंशच अधिक असतो; कारण त्यात **व्यवहार** नसतो; आणि या भक्तिप्रेमभावामध्ये उत्कटतेचेच महत्त्व अति आहे. **सर्वस्वाचा** त्याग करण्याची वृत्ती अधिक महत्त्वाची आहे.

भक्तिमार्गामध्ये उत्कटता, निष्ठा, श्रद्धा, विश्वास, आग्रह, अभिलाषारहितता या भावभावनांना फारच मूल्य आहे. यामुळेच कांताभक्ती ही श्रेष्ठ भक्ती ठरली.

श्रीतुकाराम महाराज, नैष्ठिक ब्रह्मचारी ज्ञानेश्वरमहाराजच काय पण शुकाचार्यांसारखे वैराग्यशील महात्मे रासक्रीडेचे वर्णन करण्यात तन्मय होऊन जातात याला फार-फार महत्त्व आहे. संत विरहिणींचे गुणगान करतात, ते त्यांतील निरपवाद उत्कटतेसाठी, कारण गोपीप्रेमामध्ये स्वसुखसुखित्वाची अभिलाषा मुळातच नाही. श्रीकृष्णाच्या सुखातच त्यांचे सुख समाविष्ट आहे. श्रीकृष्णाच्या भक्तीप्रेमसुखासाठी त्यांनी स्वत:ला पूर्णपणे समर्पित करून स्वत:ला राबविले. सगळे महावैष्णव, महाभागवत, वैष्णवाचार्य

भागवतोत्तमोत्तम गोपींच्या भक्तिप्रेमभावाचे कांताभावांतून वर्णन करतात ते या अंतर्गत असणाऱ्या **तत्सुखसुखित्त्व** निष्ठेसाठी.

गोपकन्यांचे चिरहरण ही एक अशीच लीला. लौकिक जीवनात दंभ स्वीकारावाच लागतो. भक्तिप्रेमभावांत लौकिकाची पर्वा सुटल्यामुळे दंभ नाहीसा होतो. भक्तिप्रेमभावात/परमार्थात या दंभाचे अगदीच वावडे आहे. आपण देवाकडे उघडे जातो, देवपूजा उघड्याने करतो. (पुरुष अर्चक/साधक) या उघडे राहण्यातला भाव नितांत सुंदर श्रेष्ठतम आहे. आम्हाला भगवंतापासून काहीच लपवावयाचे नाही असा हा भाव आहे. उघडेपणा हे एक प्रतीक आहे.

असा या सगळ्याच रुपकांचा विचार (अंतरंग विचार) भक्तिभावप्रेमाला फार पोषक आहे.

* * * *

# अपरोक्षानुभूती

हे जे काही कागदावर उतरतय ते केवळ शब्दपंक्ती नाहीत, साहित्य नाही, अक्षरांची जुळवाजुळव, शब्द रचना, प्रमेयांची मांडणी नाही तर आहे एक प्रांजळ, प्रखर, तेजस्वी, दैदीप्यमान, नेत्रदीपक, अविस्मरणीय, अत्यंत महद्अद्भूत असा भक्तिभावप्रेमाच्या आत्मिक अनुभवाचा अविष्कार.

भगवंताच्या कृपेने जे थोडेफार चिंतन आहे, त्यातन काय हाती आल, की सगळी संतमंडळी, मग ती कोणत्याही जाती-धर्म-पंथ-संप्रदायाची असोत, कोण्याही देशकाळातली असोत, कोणतीही भाषा बोलोत, एकच सांगत आहेत. एकाच परमात्मवस्तूचा अनुभव/स्वानुभव सांगतात हं!!! आता भाषा ज्याची त्याची निराळी असेल! असेना का? ज्याची त्याची अविष्काराची पद्धत वेगळी असेल, पण त्यात कुठ बिघडल? अवघ्यांच्या अनुभवाचा विषय एक भक्ती, आणि भक्तजनवत्सल, प्रेमळजनप्रांजळ भगवंत एकच.

जो "**योगियांचे ध्यानी ध्याता नातुडसी**", असा अवाङ्मनगोचर, आवडला; मनाला भावला; जीवाला त्याचा छंद लागला. कुणाचा? तर त्या गोविंदाचा. तो जीवाचा जीवलग, जीवीचा जिव्हाळा झाला.

गुरूवर्यांच सांगणं मोठ नेटक ! म्हणायचे "अरे आपण स्वतंत्र न राहता त्याच होऊन जाव. त्याच होऊन राहण्यात मोठा आनंद असतो. गंमत असते. एकदा त्याच होऊन राहिल ना मग आपण बिनधास्त. लेकरू कुठ काळजी करत का? आपल्या तहान-भूकेची? कपड्यालत्त्याची? बसण्या-उठण्याची? जे निर्धास्त असत. काळजी वाहत असते त्या लेकराची माय-माऊली.

ही विठाई  तर अवघ्या जगाची माता; नुसती माताच नाही **''पिताऽहमस्य जगतो माता-धाता-पितामह:''**

भगवंताच्या कृपेने ही कुडी लाभली. पाचांची इस्टेट. पंचभूतांचा गोंधळ, नवाठायी फाटलेल, काम-कर्म-अविद्या त्रिगुणांनी उभ-आडव विणलेल!!! रक्त-मांस-अस्थिंचा सापळा असेना का? पण या क्षेत्रात क्षेत्रज्ञाचा/आत्मारामाचा वास आहे. महाराज म्हणावयाचे, **''देह देवाचे मंदिर.''**

मग हा देव दिसेल का? दिसलाच पाहिजे अशी उत्कट इच्छा निर्माण झाली बघा. दिवसेंदिवस ती तीव्र होऊ लागली. जीव त्याच्या दर्शनासाठी व्याकूळ होऊ लागला.

पण काय उपयोग? जीवाची नुसती उलघाल व्हावयाची, माशासारखा जीव तडफडावयाचा? **''भेटी लागी जीवा लागलीसे आस। पाहे रात्रंदिवस वाट तूझी ।।''**

यातून प्रार्थना, विनंती, अर्ज, अर्जव, मिनत्या, काय न् काय. अवघे प्राण नेत्रात गोळा व्हावयाचे. दर्शनोत्सुक भक्ताच्या जीवनात अशी निराशेची काळीरात्र येतेच. **''वाटूली पाहता शिणले डोळुले''** अशी व्याकूळ अवस्था. जीव जाईल का राहील अशी परम उत्कट दर्शनोत्सुकता, मात्र आताशा त्याच्याच कृपेने ही तळमळ, ही व्याकूळता संपली. त्याच रूप साकार झाल. प्रकट झाल. वेदांना कानडा असणारा, आगम-निगमांना न वर्णिता येणारा, शब्दांच्या पलीकडील, इंद्रियांच्याच काय बुद्धीच्या अवाक्यापलीकडला तो दिसू लागला, बोलू लागला, हसू लागला. नाही नाही गुजगोष्टी बोलू लागला.

काय त्याच रूप??? सावळा, सुकुमार, जैसा कर्दळीगाभा, मस्तकी दैदीप्यमान रत्नजडीत मुकूट. त्याला मोत्यांचा तुरा जडवलेला. गळा घवघवीत वैजयंती माळा शोभणारी. कंठी कौस्तुभमणी. भव्य-नितळ असा भालप्रदेश, त्यावर गोल उभट श्रीचंदनाचा टिळा, मध्ये कस्तूरी रेखलेली, धनुष्यावर भृकुटी. शांत, भक्तिप्रेमामृताचा वर्षाव करणारे अर्धोन्मिलीत कमल नेत्र. सरळ धारदार नासिका, नाजूक जिवणी, अष्टमीच्या चंद्रासारखी हनुवटी, करकटावरी ठेऊन उभा, पितांबर नेसलेला, छान भरजरी अंगी ल्यालेला, कासेचा हिरवा भरजरी शेला घट्ट बांधलेला, बाहु बाहुवटे, कानी मकराकार कुंडले. दंडात रत्नजडीत बाजूबंद, पावलावर घोट्याच्या ठिकाणी कडी, तोरड्या, पैंजणे, प्रशांत पोल्हार, आनंदाने न्हालेली, विश्वाला मोहिनी घालणारी प्रसन्न मुद्रा.

किती आणि काय वर्णन करणार? कस करणार? शब्दांच्या पलीकडील सारे काही. मात्र अनुभव शंभर टक्के नाही तर एकशेपंचवीस टक्के खरा बर !

या दर्शनाने, दृश्य, द्रष्टा आणि दर्शन यातल अंतरच नाहीस झाल. शब्दांनी सांगता आलं नसते. "**बोलेना, बोलू देईना**" अशीच सगळी स्थिती.

एवढच म्हणतो की, "**आनंदाचा कंद हरि हा। देवकीनंदन पाहिला.**" पाहतो, आणि पाहिला नाही, पहावयाचा नाही म्हटल, तरी तो दिसतोच.

साहित्य, लेखन वगैरे तांत्रिक प्रपंचाला फाटा देऊन हा आनंदानुभव तुम्हा सर्वांसाठी कसा तरी उतरवण्याचा या कागदावर बापुड्या शब्दांचेद्वारा एक तोटका प्रयत्न ! हा आनंद महासागराएवढा आणि शब्द अळवावरच्या थेंबाएवढे.

* * * *

प. पू. आण्णांचा स्थायीभावच असा आहे की,
प्रसिद्धी माध्यमांपासून ते दूर राहणेच पसंत करतात.
माऊलीची शिकवणच पहा ना –



पूज्यता डोळा न देखावी । स्वकीर्ती कानी नायकावी ।
हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोकां ।।

ज्ञाने. अ. १३–१८८

प.पू. आण्णांची अध्यात्मिक बैठकच अशी आहे की,
माऊलींनी ज्ञानेश्वरीत अत्यंत चपखल असे त्याचे
वर्णन केले आहे ते असे –

तरी जयाचे चोखटे मानसी । मी होऊनि असे क्षेत्रसंन्यासी ।
जया निजेल्याते उपासी । वैराग्य गा ।। ज्ञाने.अ.९–१८८
जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता जेऊनि धाले ।
जे शांतीसी झाले । पल्लव नवे ।। ज्ञाने.अ.९–१९०

अप्रतीम अशा या ग्रंथातील अपरोक्षानुभूती हे अखेरचे चिंतन आहे. वै. सोनोपंत दांडेकर म्हणत, माझ्या मनात विठ्ठलाशिवाय दुसरा विचार नाही. हे तसेच ! या चिंतनांचा कळस, हिमालयाचे एव्हरेस्ट शिखर म्हणजे "अपरोक्षानुभूती" नावाचे चिंतन, सालंकृत पांडुरंग-मूर्तीचे आण्णांना झालेले दर्शन, जागेपणीची अनुभूती, ध्यानावस्थेत येणारी अतिशय उत्कट अनुभूती जणू आलीच. त्याचे बहारदार, भावविवश करणारे वर्णन या चिंतनात पू. आण्णांनी केले आहे. "सावळे सुंदर रूप मनोहर" असा पंढरीचा विठोबा प्रत्यक्ष पुढे उभा करणारा त्यांचा चिंतनक्षण आपण जपून ठेवावा असा!